भारतीय इतिहासाँतील

एक अमर गाथा



# गोकणीदुगी

प्रकाशित ऐतिहासिक

कादंबऱ्या

- बजाजी निंबाळकर
- रावबाजी
- रत्नगड
- शनिवारवाडा
- छत्रसाल

# गोकर्ण दुर्ग

लेखक—अज्ञात

मूल्य ८ रुपये

सुरस ग्रंथमाला सोलापूर

## १

एक हजार वर्षांपूर्वी भागिरथीची अवस्था एवढी शोचनीय नव्हती; त्या वेळीं भागिरथीच्या हृदयावर आजच्यासारखें वाळूचें ढीगच्या ढीग महिनेच्या महिने दिसत नसत, कारण कीं त्या वेळीं गंगेचा विपुल जलप्रवाह भागिरथींत मिळून तो अफाट जलौघ समुद्राला मिळत असे. त्या वेळीं आरमारी काफले भागिरथीच्या पात्रांतून जात येत असत. भरतखंडांत उत्पन्न होणारा सर्व प्रकारचा माल गंगा आणि भागिरथीच्या मार्गानें देशोदेशी पाठविला जाई. भागिरथीचा किनारा निरनिराळ्या जातींच्या तारवांनीं आणि नौकांनीं नेहमीं गजबजलेला असे.

पद्मेच्या उत्पत्तीस्थानाच्या नजिकच व भागिरथीच्या पश्चिम किनाऱ्यास लागून सप्तग्रामाहून गौडापर्यंत जाणाऱ्या विशाल राजमार्गाच्या बाजूस एक फार जीर्ण देवालय होते. शेंकडों वर्षांपूर्वी हें देवालय बांधण्यांत आलें होतें. कालचक्रानुसार आज तें अगदींच जीर्णावस्थेप्रत पोहोंचलेलें होतें आणि त्यांत जी देवाची मूर्ति स्थापन केलेली होती ती सुद्धां पुष्कळ वर्षांपूर्वी नाहींशी झाली होती. देवालयाच्या अंगणांत एक पिंपळाचा वृक्ष उगवून हळूहळू वाढत वाढत देवालयाच्या तुटून गेलेल्या घुमटावर आपल्या शाखाप्रशाखा फैलावीत होता. हें देवालय कोणाचें आहे व त्यांत कोणत्या देवतेची मूर्ति स्थापन केलेली होती, तें अद्यापिही कोणी सांगू शकत नव्हतें. तरी आजूबाजूच्या प्रदेशांत या देवालयाची फार प्रसिद्धी होती. गौडहून सप्तग्रामापर्यंत जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरूंना तें एक विश्रांतिस्थान होते.

गंगा ओलांडून या देवालयापर्यंत येईतों संध्या होत असे, त्यामुळें वाटसरू या जीर्ण देवालयांत अगर त्या पिंपळाच्या वृक्षाखालीं रात्र घालवीत असत.

देवालयाच्या जवळूनच दक्षिण दिशेनें भागिरथी नदी वहात असे. जुन्या काळीं देवालयापासून नदीपर्यंत एक विशाल रस्ता गेलेला होता; कालक्रमानें आज तोहि जीर्ण झालेला होता; परंतु अद्यापिहि तो उपयोगांत आणण्यांत येई. फार प्राचीन काळापासून गौडाच्या मार्गात हें ' जीर्ण देवालय ' प्रवाशांना विश्रांतिस्थान होतें. परिवर्तनशील भागीरथीनें कां म्हणून त्याचा नाश केला नाहीं, या विचारानें लोक आश्चर्यचकित होत. अनेक वर्षांपूर्वी जीर्ण देवालय, पिंपळाचा वृक्ष आणि गौडाचा राजमार्ग येथपावेतों भागीरथीचें पात्र होतें.

ज्या स्थळीं जीर्ण देवालय होतें; त्या स्थळीं एका काळीं भागिरथीचा जलप्रवाह कलकल ध्वनि करीत वहात होता. परन्तु आतां या जागीं हिरवीगार शेतें दिसून येतात, अरेरे ! कालाची गति खरोखरीच कुटिल आहे !

या वेळीं देशोदेशीं प्रवास करण्यासाठीं जलमार्गहि विशाल होता. पण ज्यांना उतावळीनें प्रवास करण्याची जरूरी भासे, ते रथांत किंवा घोड्यावर बसून प्रवास करीत.

सुमारें एक सहस्र वर्षापूर्वी दोन घोडेस्वार या राजमार्गानें सप्तग्रामाहून गौडाकडे चाललें होतें. त्या वेळीं भाद्रपद महिना होता. भागिरथीच्या किनाऱ्याकिनाऱ्याने दोघेहि घोडेस्वार आपापल्या घोड्यांना चालवीत होते. थोड्या वेळापूर्वीच पाऊस पडून गेल्याकारणानें रस्त्यांत सर्वत्र चिखलच चिखल झालेला होता. या वेळीं सूर्यनारायण अस्तंगत झाल्याकारणानें, चोहों दिशास हळूहळू अंधःकाराचें साम्राज्य पसरत चाललें होते. दोघांहि अश्वांकडें नजर फेकली तर तत्काल असें दिसून येई कीं, त्यांनीं फार दुरून प्रवास केलेला असावा. ते अश्व थकलेलें पाहून स्वारहि त्यांना हळूंहळूं चालवीत होते.

त्या दोन घोडेस्वारांपैकीं एक वयानें तरुण होता आणि त्याचे वय

वीस वर्षांहून अधिक क्वचितच असेल. दुसरा घोडेस्वार वयानें प्रौढ होता. नुकतेंच त्याचे केस पांढरे व्हावयास सुरवात झालेली होती. वयानें तो अजमासें पन्नास वर्षांचा असावा. दोघेहि सशस्त्र असून त्यांनीं अंगावर चिलखतें चढविलीं होतीं. त्यांच्या डोकीस जरतारी किंमती शेलें गुंडाळलेलें होतें. दोघांच्या पुढ्यांत घोड्यांच्या जिनांना दोऱ्यांनीं बांधलेलीं शिरस्त्राणें होतीं.

तरुण आपल्या घोड्याला पुढें चालवीत होता. आणि प्रौढाचा घोडा त्याच्या मागून आस्ते आस्ते मार्ग कांपीत होता. जीर्ण देवालयाच्या समीप येतांच तरुण प्रौढाकडे वळून म्हणाला, " येथें जवळपास मनुष्यवस्तीचें चिन्हहि दिसत नाहीं; आणि अंधार तर अधिकाधिक पडत चालला, आतां कसें करावें ? "

प्रौढानें उत्तर दिलें, " बेटा ! खरोखरीच देशाची स्थिति फार भयंकर होत चाललेली आहे. वीस वर्षांपूर्वी या राजमार्गाच्या दोन्ही बाजूंस शेंकडों गांवें बसलेलीं होतीं; त्यांच्या चारी बाजूस असलेली हिरवीगार शेते पाहून मनाला किती तरी आनंद वाटत असे--पण अरेरे ! प्रभो ? पाहतां पाहतां त्यांचा सगळ्यांचा नाश झाला. सुमारें पंधरा गांवें आपण चालून आलों, पण रस्त्यांत पाहावें तो सगळा शुकशुकाट ! नाहीं मनुष्यवस्ती की, एकादी झोंपडी ! पहावे तेथें सर्वत्र घनदाट जंगलच जंगल ! रात्रींच्या वेळीं मनुष्यवस्ती पाहून रहाणें फायदेशीर असतें. तो पहा, धर्मपाळ ! दूर एक पिंपळाचा वृक्ष दिसत आहे. तेथें एक जुनें देवालय आहे. जेव्हां जेव्हां मी एकटा या मार्गानें प्रवास करीत असे, तेव्हां तेव्हां कित्येकदां रात्रीचा मी त्या ठिकाणीं मुक्काम करी. "

" पिताजी ! पिंपळाचा वृक्ष तर दिसतो, परंतु देवालय कुठें दिसत नाहीं ते ? "

" तर मग चल, आपण त्या पिंपळाच्या वृक्षाखालींच आजची रात्र काढूं."

थकून गेलेले दोन्ही अश्व अगदीं सावकाश चालूं लागले. प्रौढ चोंहीकडे नजर फिरवीत फिरवीत पिंपळाच्या वृक्षापाशीं येतांच म्हणाला,

" धर्मपाळ ! मी सांगत होतों तें हेंच स्थळ ! या पहा चोंहीकडे दगडांच्या आणि विटांच्या राशी पडलेल्या आहेत. या वृक्षांच्या मागील बाजूच्या झाडींत तें देवालय होतें हें मला पक्कें आठवतें."

दोघेहि जण घोड्यांवरून खालीं उतरले; आणि घोड्यांना वृक्षाच्या बुंध्याला बांधून त्या झाडींत शिरले. रस्त्याच्या दुतर्फा गर्द झाडी असल्या-कारणानें या स्थळीं फार दिवसांत कोणीहि मनुष्य फिरकलें नसावें असें स्पष्ट दिसून येई. लहान लहान झुडपांनीं जमीन झांकून गेलेली होती, आणि लता या झाडावरून त्या झाडाकडे दूरवर पसरल्या कारणानें जमीन आणि आकाश यांची परस्पर क्वचित्‌च दृष्टिभेट होई. सूर्यचंद्राचा प्रकाशहि झाडीच्या आंतल्या भागांत प्रवेश करूं शकत नसे. रस्त्यांत आडव्या येणाऱ्या लतांचें जाळें इतके घनदाट झालें होतें कीं, त्या कांपून काढल्याशिवाय पुढें जाणेंच अशक्य होतें हत्यारानें रस्ता मोकळा केल्याशिवाय पुढें सरकणें दुरापास्त असल्याकारणाने व त्याशिवाय झाडींत शिरण्यास अन्य मार्ग नसल्यामुळें दोघांनाहि तसें करणें भाग पडत होतें. याप्रमाणें मार्ग कांपीत कांपीत थोड्या अंतरावर आल्यानंतर ते देवालयाच्या अंगणांत येऊन ठेपले. या देवालयांत जरी कोणी मनुष्य आढळून आला नाहीं, तरी देवालयाच्या अंगणाचा कांहीं भाग कोणी तरी नित्य साफसुफ करीत असावा असें स्पष्ट दिसून आलें. शरीराला कांटे बोंचल्याकारणानें प्रौढाला बराच त्रास झाला होता. देवालयांत शिरल्यानंतर तो म्हणाला, " यांत तर कोणी मनुष्य दिसत नाहीं. जा, तूं दोन्ही घोड्यांना येथेंच घेऊन ये. "

पिता देवालयाच्या द्वाराजवळ एका शिलाखंडावर बसला व पुत्र पिंपळाच्या वृक्षाकडे निघून गेला. कांहीं वेळानंतर जेव्हां तो अश्वांना घेऊन परत आला, तेव्हां प्रौढानें त्याला म्हटलें, " येथें जवळच नदी आहे, तेव्हां तेथें नेऊन तूं या घोड्यांना पाणी पाज. "

नदीकडे जात असतांना तो रस्ता कोणी तरी नुकताच साफ केलेला आहे, असें त्या तरुणाच्या लक्षांत आलें. तो आपल्याशींच विचार करूं लागला, " या जनशून्य अरण्यांत हा रस्ता कोणीं बरें साफ केला असेल ? येथें जवळपास तर मनुष्यवस्तीचें चिन्हहि दिसत नाहीं. मला वाटतें, खास

माझ्याखातर कोणीतरी हा रस्ता साफ केलेला आहे. आडव्या आलेल्या या लता जरी कापून काढल्या आहेत, तरी त्या किती सुंदर दिसताहेत ! या ओलसर जमिनीवर माणसांची पावलेंहि उमटलेलीं दिसतात, अंधारामुळें तीं पावलें कोणत्या दिशेकडे वळलीं आहेत हें सांगतां येणें कठीण ! ''
याप्रमाणें विचार करीत दोन्ही हातांत दोन्ही घोड्यांचे लगाम धरून तो तरुण चालला होता. थोडा रस्ता चालून गेल्यावर तो नदीतीरीं येऊन पोहोंचला.

पाऊस पडल्याकारणानें रस्ता नदीच्या पाण्यांत बुडून गेलेला दिसत होता. किनाऱ्याजवळ एक मोठा आम्रवृक्ष होता. त्या वृक्षाखालीं अंधारांत सफेद रंगाचा कसलासा एक पदार्थ पडला होता. तो तरुण त्या पदार्थाकडे बराच वेळ टक लावून पहात राहिला. इतक्यांत अत्यंत दीन वाणीनें व अगदीं क्षीण आवाजांत कुणीसें म्हटलें, " पाणी ! "

एका लहानशा झाडाच्या बुंध्याशीं दोन्हीं घोड्यांना बांधून तरूण हातांत तरवार घेऊन त्या दिशेकडे वळला. वृक्षाखालीं येऊन पहातों तों तेथें एक मनुष्य पडलेला आहे. त्या तरूणाच्या पावलांची चाहुल लागतांच तो पडलेला माणूस कातर स्वरांत म्हणाला, " कोण आहे तिकडे ? मला थोडे पाणी पाहिजे. "

त्या पडलेल्या माणसाचें सारें शरीर रक्तानें माखलें असल्याचें तरूणाला आढळून आलें. विशेष बारकाईनें पाहतां तो आतां थोड्या वेळाचाच सोबती आहे. ही गोष्टसुद्धां त्याच्या लक्षांत येऊन चुकली. तो एकदम धांवत नदीकडे गेला आपला शेला पाण्यात भिजवून परत आला आणि त्या घायाळ व्यक्तीच्या मुखांत थोडथोडे पाणी घालूं लागला. पाणी पोटांत जातांच त्या व्यक्तीला अंमळ हुषारी वाटली. नंतर ती व्यक्ति मंद स्वरांत म्हणाली,—

" मला वाटतें माझ्या आयुष्याचें दिवस आतां संपलें. खरेंच, आपलें मजवर फार उपकार झालें आहेत. थोडे आणखी पाणी द्या ! "

तरूणानें पुन: त्या जखमी माणसाच्या तोंडांत थोडें पाणी घातलें. तें पिऊन झाल्यावर तो घायाळ मनुष्य म्हणाला

" माझें नांव मणिदत्त. गौडांत माझ्या घरी देवमंदिराखालीं अगणित द्रव्य आहे--आणखीन थोडें पाणी देतां का ?"

पुन: तरूणाने त्याच्या मुखांत थोडें पाणी सोडलें. घायाळ मणिदत्तानें तें प्यायल्यावर थोडा वेळ विश्रांति घेतली. नंतर कांहीं वेळानें तो पुढें म्हणाला,

" तें द्रव्य तुम्हीं घ्या–पाणी–"

तरूणानें त्याला आणखी पाणी पाजलें. त्यानंतर कांहीं वेळपर्यंत मणिदत्त स्तब्ध राहिला. त्याचा अंतिमकाल अगदीं नजिक आलेला आहे हें तरूणानें ताडलें. इतक्यांत मणिदत्त बोलूं लागला,

" गौडांत आतां कोणी राजा नाहीं–धर्माचेहि नांवनिशाण उरलेलें नाहीं म्हणून तुम्ही राजे व्हा–पाणी–"

पुन्हां तरुणानें त्याच्या तोंडांत पाणी घातलें; पण तें त्याच्या गळ्याखालीं उतरलें नाहीं. थोड्या वेळांतच त्याचा श्वासोच्छ्वास बंद झाला. त्याच्या शवावर एक वस्त्र टाकून तरूण दोन्ही घोड्यांना पाणी पाजून देवालयांत परत वळला.

आतां देवालयांत अग्नि पेटलेला आहे असें त्याला येतांना झाडींतून दिसलें. त्यासरशीं त्याला फार आश्चर्य वाटलें. लक्ष्यपूर्वक पहातां आपला पिता अग्निजवळ बसून त्यांत थोडथोडें सर्पण टाकीत असल्याचें त्याला दिसून आलें. पुत्राला परत आलेला पाहतांच पिता म्हणाला,

" हें पहा, धर्मपाळ ! आपण येण्यापूर्वीं देवळांत कोणीतरी मनुष्य आलेला दिसतो. कारण जवळपास हीं सुकीं लांकडें जमा करून अग्नि पेटविला होता. फार करून तो एव्हांना परतेलसें वाटतें."

तरूणाने त्या मृत माणसाची हकिकत आपल्या पित्याच्या कानांवर घातली. ती ऐकून प्रौढ म्हणाला,

" खरोखर राजाच्या आणि धर्माच्या अभावामुळें देशाचा सत्यानाश होत चालला आहे. ही शोचनीय दशा आणखी किती दिवस चालणार कोण जाणें ! मला वाटतें, हळूंहळू या भरतखंडांतून गौड देशाचे नांवहि लुप्त होणार. चल, रात्रींची वेळ आहे आणि चोर, दरोडेखोर यांचा असल्या

जागीं सुळसुळाट आहे. म्हणून दोन्हीं घोड्यांना देवालयाच्या आंत आणून कशीबशीं एकदांचीं रात्र काढू या. उदईक मणिदत्ताच्या शवास अग्नि देऊं म्हणजे झाले."

पित्याची आज्ञा होतांच तरूणानें घोड्यांसह देवालयाच्या आंतील बाजूस प्रवेश केला. त्यानंतर हातांत नग्न तरवार घेऊन देवालयाच्या द्वारापाशीं त्या तरूणानें सारीं रात्र जागून काढली.

दुसऱ्या दिवशीं पहांटेस दोघेहि पितापुत्र घोड्यांसह देवालय तून बाहेर पडलें. नदीकिनाऱ्यापाशीं येऊन पाहतात तों त्या ठिकाणीं एक संन्याशी बसलेला आहे असें त्यांस आढळून आले. त्यानें भगवी वस्त्रें धारण केलेलीं होतीं. त्याचा दीर्घ बलिष्ट देह आणि काळ्या भ्रमरासारखा जटाभार पाहून तो तरूण दिसत होता.

त्याच्या जवळच एक पोलादी त्रिशूल व कमंडलु पडलेला होता. जलशून्य अरण्यांत त्या संन्याशाला पाहतांच दोघेहि भारी आश्चर्यचकित झाले. प्रौढानें विनीत भावानें प्रश्न केला, " प्रभु ! आपण या स्थळीं केव्हां आलां ? "

संन्याशानें उत्तर दिलें, " गोपाळदेव ! मी तुमचीच वाट पाहात सारी रात्र याठिकाणी बसून आहे."

प्रौढानें अधिकच विस्मयचकित होऊन प्रश्न केला " आपण मला ओळखतां का ? मीं तर आपणांला कोठें पाहिल्याचे आठवत नाहीं."

संन्याशी म्हणाला, " तुम्ही मला पूर्वीं कधीं पाहिलेलें नसल्यामुळें ओळखत नाहीं; पण मी तर तुम्हांला उत्तमप्रकारें ओळखतों. तुम्ही मणिदत्ताच्या शवास अग्नि द्याल ना ? "

" होय, त्यासाठींच आम्ही दोघेहि या जागीं आलों आहोंत. पण तें आपण कसें जाणलेंत ? "

" जाणून घेण्याची आवश्यकता नसतांहि अनेक गोष्टी माझ्या कानांवर येत असतात. पण हें सर्व आपणांला हळूहळू समजून येईल. देवालयाच्या मागील बाजूस पुष्कळ सुकी लांकडे जमा केलेलीं आहेत. ती आणून अगोदर चिता पेटवा. "

संन्याशानें सांगितल्याप्रमाणें देवालयाच्या मागील बाजूस असलेलीं सुकीं लांकडें आणून दोघांनीहि घाटावर चिता रचली. त्यानंतर मणिदत्ताचे शव आणून त्या चितेवर ठेवून अग्नि पेटविला. या कार्यात त्यांना संन्याशानें साह्य बिलकुल केलें नाहीं. तो चितेपासून थोडा दूर घाटावरच बसून राहिला. पाहतां पाहतां मणिदत्ताचा देह जळून भस्मीभूत झाला चिता धडधड पेटूं लागल्यावर दोघेहि संन्याशाजवळ येऊन बसले नंतर गोपाळदेवानें प्रश्न केला, " प्रभु ! जवळपास एखादें गांव आहे का ? आमच्यापाशीं असलेलें फराळाचें कालच संपून गेलें. "

" तुम्हांला गांवांत नेण्यासाठींच मी आलों आहे. "

" आम्ही येथें आलों आहोंत हें आपणांला कसें समजलें ?"

" तें मागाहून सांगेन. "

मणिदत्ताचा देह आतां अगदीं जळून भस्म झाला होता. चिताहि आतां शांत झाली होती. पितापुत्रांनीं नदींतील जल आणून चितेवर शिपडलें आणि मृतदेहाचीं अवशिष्ट हाडें वगैरे जमा करून भागिरथीच्या पात्रांत फेंकून दिलीं. तेव्हां संन्यासी उठून उभा राहिला व त्यांना उद्देशून म्हणाला " मजबरोबर चला आतां. "

पितापुत्र घोडेस्वार होऊन संन्याशाच्या मागून निघाले.

• •

## २

राजमार्गाच्या जवळच अरण्याच्या आंतील भागांत कांहीं आम्रवृक्ष होते. त्या जागीं पूर्वीं एक रस्ता असून तो पश्चिम दिशेकडे गेलेला होता. पण काळाच्या ओघाबरोबर तो यावेळीं गवतानें झांकून गेला होता आणि ठिकठिकाणीं त्यावर लहान लहान झुडपें उगवलीं होती. संन्याशानें राजमार्ग सोडून या रस्त्याची वाट धरली. तो रस्ता आम्रवनांतून निघून त्याच्या मागील बाजूस असलेल्या एका गांवास मिळालेला होता. राजमार्गावरून जसें तें

गांव दिसत नव्हतें तसेंच याही रस्त्यावरून दिसत नव्हतें. जे लोक या मार्गानें प्रवास करीत त्यांच्या गाड्यांची पूर्वी या ठिकाणी रहदारी असावी. पण कांहीं कारणामुळें पुढें ती बंद पडली असली पाहिजे असें स्पष्ट दिसून येई. तें आम्रवन ओलांडून तिघेहि गांवात पोहोंचले. गांवांत प्रवेश करतांच विटांनीं बांधलेली एक अट्टालिका प्रथम त्यांच्या दृष्टीस पडली. ती अट्टा-लिका जरी पुरातन नव्हती, तरी गवत उगवल्याकारणाने तिच्या भिंती आणि निजवरील छत अगदीं झांकून गेलें होतें. समोरील बागेंत वनांतल्या-प्रमाणें इतकीं निरूपयोगीं झाडेंझुडपें उगवलीं होती कीं, त्यांत एखादें दुसरें हिंस्त्र जनावर गुप्तपणें राहूं शकलें असतें. अट्टालिकेंत प्रवेश करावयाच्या द्वारांना कड्या नव्हत्या. तिघेहि जण आता आंत घुसले.

आंत प्रवेश करतांच समोरच एक विस्तृत अंगण असलेलें त्यांच्या दृष्टीस पडलें. तेथें सुद्धां गवत उगवलेलें होतें. अंगणाजवळच पूजामंडप होता, त्यांतून मनुष्यांची चाहूल लागतांच दोन शृगाल भर्कन् पळून गेलें. मंडपाच्या आंत दोन मानवी मृतदेह पडलेलें होतें. त्यांच्या दुर्गंधीनें तेथें क्षणभरहि रहावत नसे. आलेल्या तिघांनीहि अट्टालिकेच्या दरेक भागांत फिरून पाहिले; पण तेथें त्या दुर्गंधयुक्त प्रेताशिवाय त्यांना दुसरें कांहीहि आढळून आलें नाहीं. संन्याशानें मंदहास्य करून म्हटले, " गोपाळदेव ! हें पाहिलेंस कां ?"

गोपाळदेवानें प्रश्न केला, " या अट्टालिकेंत रहाणारें लोक गृहत्याग करून पळून गेले कीं काय ? "

संन्याशानें उत्तर दिलें, " मंडपांत आणि दरेक ठिकाणीं फिरून तुम्ही सगळे काहीं पाहिलें ना ?"

तिघेहि आतां अट्टालिकेंतून बाहेर पडून रस्त्यावर आले, संन्याशी नंतर पूर्व दिशेच्या रोखानें चालू लागला. तेथें रस्त्याच्या दुतर्फा उंच उंच मातीच्या छपराशिवाय भिंती त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्या भिंतीवर जागो-जागीं आगीतून शिकस्तीने बचावलेले वेळूचें दांडे तेथील भयानकतेंत अधिकच भर घालीत होतें. रस्त्याच्या डाव्या बाजूला असलेल्या एका घरांत अथवा अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडलेल्या त्या गृहाच्या अवशिष्ट राहिलेल्या

एका भागात कित्येक नारळीची झाडें अद्यापिहि अर्धदग्ध अवस्थेंत असलेली दिसत होती. संन्याशानें त्या जागेंत आतां प्रवेश केला. दोघे घोडेस्वारहि त्याच्या पाठोपाठ होते. तेथें प्रवेश करतांच त्या विशाल अंगणाच्या मध्यभागीं माणसांच्या डोकींच्या कवटयांचा ढीगच्याढीग पडलेला त्यांच्या दृष्टीस पडला. चारी बाजूंला मनुष्यांचीं प्रेतेंहि पडलेलीं त्यांना आढळलीं. अंगणाच्या चोंहींकडे असंख्य घरांच्या मातीच्या भिंती आलेल्या होत्या. संन्याशानें त्यापैकीं एका घरांत प्रवेश केला. या घरावरहि छप्पर नव्हतें. ठिकठिकाणीं अर्धदग्ध मांसाचे तुकडे पडले होतें. घराच्या तळघरांत असंख्य पशूंचे अर्धदग्ध शवांचे ढीग पडले होते. हें सगळें भयंकर दृश्य पाहून विस्मयानें गोपाळदेवानें प्रश्न केला, " प्रभु ! जेव्हां आग लागली तेव्हां जनावराचांहि बचाव गांवकऱ्याच्या हातून झालेला दिसत नाहीं. "

संन्याशी उत्तरला, " ज्यानीं त्यांच्या बचावासाठीं धरपड केली; त्या सर्वांची मस्तकें धडापासून दूर होऊन या अंगणांत येऊन पडत होती. "

अगदीं निरवतेनें तिघेहि घरांतून बाहेर पडून राजमार्गावर आले. रस्त्यांत गोपाळदेवानें पृच्छा केली, " प्रभु ! गांवांत आतां कोणी मनुष्यें शिल्लक राहिलीं आहेत कां ?"

" होय, फक्त दोनच !"

" तर मग चला, आपण तेथे जाऊं. आम्हांला भारीच भूक लागलेली आहे. "

" गांवांत प्रवेश करून ग्रामदेवतेचें दर्शन घेतल्याशिवाय जाणार कीं काय ?"

" ग्रामदेवतेचें मंदिर कोठेंसें आहे ?"

" चला माझ्याबरोबर या. "

इतकें म्हणून संन्याशी वाट दाखवीत पुढें चालूं लागला. त्या निर्जन गांवाचा रस्ता ते चालत गांवाच्या मध्यभागीं येऊन ठेपलें. त्या स्थळीं हरित तृणांनीं आच्छादिलेल्या एका भागाच्या मधोमध एक मंदिर होतें. त्या मंदिराला दारें नव्हती. दूर अंतरावरून पाषाणाची चतुर्भुज भगवंताची मूर्ति दृष्टिस पडत होती. दोन तीन मुडदे तर त्या पाषाण मूर्तीला जणूं

बिलगलेले होते. ते पाहून तर त्यांना पराकाष्ठेचा विस्मय वाटला. मरणाच्या भीतीनें या लोकांनीं देवतेचा आश्रय घेतला असावा, असें यावरून स्पष्ट दिसत होतें. स्तंभित होऊन पितापुत्र मंदिराच्या आंत येऊन उभे राहिले. संन्याशी त्यांची वाट पहात मंदिराच्या बाहेरच उभा होता. तो म्हणाला,

" गोपाळदेव ! काय पहातां ? बुद्धीहीन गांवकऱ्यांना वाटलें कीं, शत्रू कांहीं मंदिराच्या आंत येणार नाहींत आणि जर कदाचित् आलेच तर भगवान् वासुदेव त्यांचें रक्षण करील. भगवंताने त्यांचें कोणत्या प्रकारें रक्षण केलें हें प्रत्यक्ष पहातांच तुम्ही !"

" प्रभु ! पहावयाचें सारें पाहून चुकलों. आतां अधिक पहाण्याची इच्छा नाहीं. खाण्यापिण्याची किंवा कोठें वस्तीला रहावयाची आतां आम्हांला इच्छा नाही. आपण आम्हांस आतां जावयास परवानगी द्यावी हें बरें ! आम्ही येथून आतां जातो."

इतकें म्हणून गोपाळदेव मंदिराच्या बाहेर पडला. संन्याशानें त्याचा हात धरून म्हटले, " घाबरूं नका, तुम्हीच जर असे घाबरला तर देशाचें रक्षण कसें होणार ? चला, या मजबरोबर."

गोपाळदेव आणि धर्मपाळदेव संन्याशाच्या मागून मागून एका लहानशा नदीच्या कांठीं येऊन पोहोंचले. नदीच्या काठांवर उभे राहून संन्याशानें मोठ्यानें हांक मारली,

" गौर ! अरे गौर "

पण हांकेस प्रत्युत्तर मिळालें नाहीं. दोन-तीन वेळां जेव्हां हांका मारून झाल्या, तेव्हां झाडींतून कोणीसे विचारले, " कोण हांका मारीत आहे ? प्रभु कीं काय ?"

मंद हास्य करून संन्यासी म्हणाला, " गौर ! भिऊं नकोस. मी आहें. तूं नदी ओलांडून इकडे ये पाहूं अगोदर !"

गोपाळदेवाने चोंहीकडे नजर फेंकली, तेव्हां तें स्थळ भारी दुर्भेद्य असल्याचें त्याला आढळून आले. तेथें जाण्याला एकहि रस्ता त्याला दिसेना. या स्थळाच्या तिन्ही बाजूला ती लहानशीं नदी नागमोडी वळणें घेत

वाहत होती. समोरच्या बाजूला नदीचें पुरातन पात्र होते आणि पावसाच्या पाण्यानें तें या वेळीं पूर्ण तुडुंब भरले होते. या बेटाच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें चारी बाजूला दाट झाडी होती. ती पाहून अशा ठिकाणीं कोणी मनुष्य रहात असेल ही कल्पनाच असंभवनीय वाटे.

वृक्षांच्या डहाळ्यांनीं वनविलेल्या नावेवर बसून गौर नदी ओलांडून थोड्याच वेळांत त्या ठिकाणीं आला आणि त्यानें संन्याशापुढें साष्टांग लोटांगण घातले. असें करतांना त्यानें गोपाळदेवाकडे किंवा त्याच्या पुत्राकडे ढुंकूनहि पाहिले नाहीं. गौर शरीरानें कृश व दुर्बल असून त्याचे तोंड लांबड होतें आणि तो रंगानें काळा होता. कोणी तरी थट्टेखोरानें त्याचे नांव "गौर" असें ठेविलें असावें.

त्याच्या सर्व अवयवांत त्याची नासिका मोठी वर्णन करण्यासारखी होती. त्याच्या शरीरांतील सारा मांसल भाग जणूं काय त्याच्या नाकांत भरला असावा असे वाटे, इतकें तें जाड व लांबलचक होते. लोटांगणाची क्रिया संपल्यावर गौर शांतपणें उभा राहून संन्याशाच्या तोंडाकडे पाहात राहिला. संन्याशानें त्याला विचारले,

"गौर ! काय पहातोस ?"

"प्रभु ! आपण जें पाहात आहांत, तेंच मीहि पाहात आहें."

"तुझ्यासमोर हे दोघे अतिथी उभे आहेत हें दिसत नाहीं वाटतें तुला ?"

"अतिथी ? प्रभु ! मी गरीब माणूस ! अतिथींचा पाहुणचार माझ्या हातून कसा होणार ?"

"मूर्खा ! दोन क्षुधित पाहुणे तुझ्यापुढें उभे आहेत ना ?"

"मग आतां कसें होणार प्रभु ?"

इतकें बोलून गौरनें अगदीं रडवा चेहरा केला. हें पाहून आश्चर्यानें संन्याशी म्हणाला, "गौर ! अरे झाले काय असें रडायला ? हकीकत तरी मला कळूं दे."

रडक्या सुरांत गौरने उत्तर दिलें, "महाराज ! कशाला उगीच गरीबाची थट्टा करतां ?"

अधिकच विस्मयानें संन्याशाने विचारलें, " कशाची थट्टा ? "

" प्रभु ! घरांत धान्याचा एक कणहि शिल्लक नाहीं. भिक्षा मागण्यासाठीं मी नुक्ताच बाहेर जाण्याच्या बेतांत होतों, तों आपण दोघां पाहुण्यांना घेऊन माझ्या दारीं आलांत."

गौर पुन: रडकुंडीस आला. संन्याशाने त्याला थांबवून मध्येंच म्हटलें, " अरे गौर ! तुला काय म्हणायें ? पंधरवड्यापूर्वींच होडीभर धान्य मीं तुला दिलें होतें ना ? तें काय केलेंस ? "

" प्रभु ? तें सगळें संपलें."

" आपण तिघांनीं एवढें धान्य पंधरवड्यांत खाऊन फस्त केलें म्हणतोस ? "

" होय महाराज ! "

संन्याशी आतां भारी संतप्त झाला. पण इतक्यांत त्याच्या कांहींसें लक्षांत येऊन त्याला हंसू कोसळलें. गोपाळदेव पुत्रासह एका आम्रवृक्षाच्या छायेंत उभ्या उभ्या हा सारा प्रकार पाहात होता. त्याला वाटलें कीं, आपणांमुळें बिचाऱ्या गौरवर भारीच संकट कोसळलेलें दिसतें. तेव्हां तो पुढें होऊन संन्याशाला हात जोडून म्हणाला, " प्रभु ! त्या गरीब माणसांला विनाकारण हैराण करण्याचें कांहीं कारण नाहीं. अद्यापि अवधि आहे. आमचे दोन्ही अश्व विद्युत्वेगानें आम्हांला दुसऱ्या एखाद्या गांवापाशीं घेऊन जातील. "

त्याचें हें बोलणें ऐकून संन्याशीं पुन: हंसला आणि म्हणाला,

" गोपाळदेव ! याच्या बोलण्यावर विश्वास ठेवण्याचे कारण नाहीं. घरांत हवें तितकें मुबलक धान्य भरलेले आहे. पण याला भीति वाटत आहे कीं आपण दोघेहि बलिष्ट पाहुणें दोन दोन, तीन तीन शेर तांदूळ एका वेळेला खलास कराल. म्हणून तो ही सारी उडवाउडव करीत आहे."

हें ऐकून गौरचंद अगदीं शरमिंदा होऊन खालीं पाहूं लागला. तेव्हां संन्याशी त्याला उद्देशून म्हणाला,

" गौर ! या पाहुण्यांना असें विन्मुख दवडतां येणार नाहीं. त्यांच्यासाठीं थोडया तांदुळाचा व्यय केलाच पाहिजे. "

निःश्वास टाकून गौरने उत्तर दिले, " जशी प्रभूंची इच्छा ! "

संन्याशीं आणि गोपाळदेव दोघेहि त्याचा या वेळचा अभिनय पाहून हंसू लागले. गौरनें आतां त्यांच्या तोंडाकडे पाहिले मात्र; तों त्याचें तोंड साफ उतरले. दोन तीन शेर तांदुळाचा खर्च केला, कीं आपण यांच्या तावडींतून सुटूं असे प्रथम त्याला वाटले होते. परंतु आजचा दिवस मोठाच अनिष्ट आहे असे आतां त्याला वाटावयास लागले. मोठाल्या हत्तीसारखे दोन बलवान अश्व एकाच वेळीं दहादहा शेर अन्नाचा फन्ना उडविणार हें लक्षांत येतांच त्याची स्थिति मोठी केविलवाणी झाली. तो कांपऱ्या स्वरांत म्हणाला, " प्रभु ! "

यावेळीं संन्याशी गोपाळदेवाबरोबर कांहीं बोलत होता. त्यानें तोंड वळवून विचारले, " कां, काय सांगावयाचें आहे ?"

हळूंच एक पाऊल पुढें टाकून कांपतकांपत गौर म्हणाला, " हे पाहुणे सुद्धां अन्न खाणार वाटतें ?"

आश्चर्यानें संन्याशानें विचारले, " कोणते ?"

" हे चार पायांचें दोघे अतिथी ? "

संन्याशी रागावून म्हणाला, " हे अन्न खाणार नाहींत तर जाणार कुठें ? "

पुनः एक दीर्घ निःश्वास सोडून गौरचंद म्हणाला, " तेंच मी विचारून ठेवतो आहे आपणाला. "

धान्याचा व्यय केल्याशिवाय आतां गत्यंतर नाहीं ही गोष्ट लक्षांत येतांच तो मनांतल्यामनांत कुढत निमूटपणें तराफा किनाऱ्याजवळ घेऊन आला आणि पुनः संन्याशाजवळ येऊन उभा राहिला. त्याला उद्देशून संन्याशी म्हणाला, " प्रथम आम्हांला तूं पैलतीरावर नेऊन सोड आणि पुनः परत येऊन या घोड्याची देखरेख ठेव. "

" फार चांगले, जशी महाराजांची आज्ञा ! "

नदीपार होऊन संन्याशानें वनांतर्गत भागांत प्रवेश केला. गोपाळदेव आणि धर्मपाळ दोघेहि त्याच्याबरोबरच होते. थोड्या दूर अन्तरावर जातांच त्या वनाच्या आंत वृक्ष-कुंजाच्या मागील बाजूस एक भव्य अट्टालिका असलेली पाहून त्या दोघांसहि भारी आश्चर्य वाटले.

नदीच्या समोरील किनाऱ्यावरून ती बिलकुल दृष्टीला पडत नव्हती. अट्टालिकेच्या दरवाजापाशीं उभें राहून संन्याशानें हांक मारली,...

" कात्यायनी ! दरवाजा उघड, आम्ही आलो आहोंत. "

एका क्षणाच्या आंत तोंडावर पदर घेतलेल्या एका स्त्रीनें दार उघडले, तें उघडतांच संन्याशी त्या दोघांसह आंत शिरला.

अट्टालिकेच्या मध्यभागीं एक विशाल अंगण होतें आणि त्याच्या चोहों बाजूंस विटांनीं बांधलेलीं घरें होती. पहिलीं तीन घरें सोडून संन्याशी चौथ्या घरांत शिरला. गोपाळदेव आश्चर्यचकित मुद्रेनें त्या घरांतील व्यवस्थितपणें लावलेल्या वस्तु पाहूं लागला. पहिलें घर नानाप्रकारचीं चिलखतें व शस्त्रें यांनीं परिपूर्ण होतें. दुसरें घर नाना नव्याजुन्या वस्त्रांच्या सांठ्यानें भरलें होतें. चौथ्या घराच्या आंत एका विशाल पलंगावर दूधासारखी स्वच्छ शय्या होतीं. संन्याशी स्वतः त्या पलंगावर बसला आणि त्यानें गोपाळदेवासहि बसावयास आज्ञा केली. गोपाळदेव आणि धर्मपाळ दोघेहि त्या पलंगावर बसले आणि त्यांनीं आपली चिलखतें व शस्त्रास्त्रें काढून त्याच्यावर ठेवली. इतक्यांत वर सांगितलेली प्रौढा स्त्री हातपाय धुण्यास स्वच्छ पाणी घेऊन आली. तिघेहि हातपाय धुऊन झाल्यावर परत पलंगावर बसले. नंतर गोपाळदेवानें प्रश्न केला,

" प्रभु ! हें घर कोणाचें ?"

मंद हास्य करून संन्याशानें उत्तर दिले, " आपलेच !"

आश्चर्यचकित होऊन कुतुहलानें गोपाळदेवानें पुनः पृच्छा केली, " काय म्हटलेंत आपलेंच ? मग येथें ही एवढी शस्त्रास्त्रें कशाला ?"

" चालूं युगाला उपयोगी पडतील अशाच वस्तूंनीं हें घर शृंगारलेले आहे. तुम्ही आधीं जेवून घ्या. मग सावकाश आपण याविषयीं बोलूं. तें सगळें सांगण्यासाठीं तर मी तुम्हांला येथें घेऊन आलों आहे. "

● ●

## ३

दुपारीं संन्याशानें आपल्या दोघांहि अतिथींसह विश्रांति घेण्यासाठीं पुनः घरांत प्रवेश केला. पलंगावर बसल्यानंतर गोपाळदेवाला उद्देशून संन्याशी म्हणाला, " गोपाळदेव ! हें घर कुणाचे आहे असें तुम्ही मला मघा विचारलेंत, पण येथील ही सर्व सामग्री पाहून हें एखाद्या संन्याशाचें निवासस्थान असावें असें अजूनहि आपणाला वाटतें काय ? "

" नाहीं. हें अशा दुर्भेद्य स्थळीं बांधण्यांत आलेलें आहे कीं, तें पाहून हें एखाद्या युद्धव्यवसायी वीराचें गृह असावें असें कुणालाहि वाटेल. शत्रूंच्या आकस्मिक हल्ल्यापासून आत्मरक्षा व्हावी म्हणून जलाशयानें वेष्टिलेल्या जागीं हें गृह मुद्दाम बांधलें असावेंसें स्पष्ट दिसतें. प्रभु ! हें साधारण गृह नव्हे तर एखादा दुर्भेद्य दुर्ग म्हटलें तरीहि चालेल."

" गोपाळदेव ! तुमचा तर्क बरोबर आहे, खरोखरीच हें युद्ध व्यवसायी माणसाचेंच निवासस्थल आहे. या प्रदेशाच्या राजाचा हा दुर्ग आहे. सकाळीं आपण जें गांव पाहिलें, तेंहि या दुर्गाधिपतीच्या ताब्यांत होतें."

" दुर्गाधिपति जिवंत असतां दरोडेखोरांनीं त्यांच्या एवढ्या मोठाल्या गांवांची बेचिराखी करावी, आणि निमूटपणें दुर्गांत बसल्या बसल्या हा प्रकार दुर्गाधिपतींनी सहन करावा ही नवलाची गोष्ट नव्हे काय ?"

" आपलें म्हणणें खरें आहे असें जर मीं म्हटलें, तर महावीर नरवर्म्यांच्या मीं महदपराधी ठरेन. दरोडेखोरांनीं जेव्हां हें गांव लुटलें तेव्हां नरवर्मा यात्रेला गेलेले होते. आणि तेथून परत येण्यापूर्वीच दुर्ग दुसऱ्याच्या कबजांत गेला. पुष्कळ वर्षांपासून दुर्गाधिपतींचें आणि ढेकरीच्या सामंताचें वैमनस्य चालत आलें होतें. जोंपर्यंत देशांत राजा होता, तोंपर्यंत सर्वत्र सुव्यवस्था होती. आणि दुर्बल किल्लेदार बलवान शत्रूपासून स्वतःचें आत्मसंरक्षण करूं शकत होते. पण जेव्हां राजाच नाहीसा झाला आणि देशांत बजबजपुरी माजली, तेव्हां ढेकरीच्या सामंतानें हा दुर्ग आपल्या घशाखालीं घातला आपल्या वडिलोपार्जित जहागिरीचें रक्षण करतांना वृद्ध नरवर्मा वीरगतीला जाऊन पोहोंचला; आणि तेव्हांपासून हें गृह जनशून्य झालें."

" तर मग गांव लुटणारा कोण ?"

" ढेकरीचा सामंत. पण नक्की असा त्याचा उद्देश होता असें म्हणतां यावयाचे नाहीं. गांवाची आज जी ही दुर्दशा झालेली दिसत आहे, ती सर्व दरोडेखोरांमुळें."

" मग नवीन राजानें प्रजेच्या संरक्षणाचा भार आपल्या अंगावर घेतला नाहीं काय ? "

" त्यावेळीं गांवाचा राजा कोण हेच गांवकऱ्यांना कळेनासें झालें होतें. ढेकरीचा राजा नरसिंह यावेळीं फार दूर दक्षिणेंत सप्तग्राम बंदरांत लुटालूट करण्याच्या कार्यांत गुंतला होता. राज्याचा कबजा घेण्यासाठीं जेव्हां त्याचें सैनिक या बाजूला आले, तेव्हा गांवकऱ्यांनीं राज्य त्याच्या हातीं सोंपविलें; परंतु स्वेच्छापूर्वक ते कोणालाहि कर देत नसल्यामुळें विपत्तीच्या वेळीं त्यांच्या रक्षणार्थ कोणी धांवून आलें नाहीं. "

" गांव इतकें मोठें असतांना येथील लोक आत्मरक्षण करूं शकले नाहींत हे कसें ?"

" अलीकडे लुटारू लोक युद्धांत निष्णात असलेल्या सैनिकांसमावेत गांवें आणि शहरें बेचिराख करीत असतात; आणि त्यांच्या तावडींतून—"

संन्याशाच्या तोंडचें हें वाक्य पुरें होण्यापूर्वींच लांबून बांसरीचा ध्वनि एकाएकीं ऐकूं आला. तो ऐकतांच संन्यासी एकाएकीं उभा राहिला. पुनः एकवार बांसरीचा आवाज कर्णपथावर आदळला. तो ऐकतांच सचिंत मुद्रेनें संन्यासी म्हणाला, " गोपाळदेव ! आणखी कोणती आपत्ति येत आहे देव जाणें ! मी अंमळ बाहेर जाऊन काय प्रकार आहे तो पाहून येतों."

गोपाळदेवसुद्धां उभा राहून म्हणाला, " प्रभु ! आम्हीसुद्धां आपल्या बरोबरच येतों."

पण ते खोलीबाहेर पडण्यापूर्वींच गौरचंद्र दारांत येऊन उभा राहिला. तो संन्याशाला प्रणाम करणार तोंच त्याला थांबवून संन्याशानें विचारलें, " गौर ! काय भानगड आहे ? "

गौर नम्रपणें म्हणाला, " प्रभु ! मध्यम प्रभु आलेले आहेत. मी त्यांना नदीच्या पैलतीरावर थांबवून आपणांला हें सांगण्यासाठीं आलों आहें."

" तिकडे त्यांना कां म्हणून तिष्ठत ठेविलेंस ? "

" प्रभु ! आपल्या आज्ञेशिवाय मी त्यांना इकडे कसा घेऊन येणार?"

" जा, आधीं त्यांना झटपट येथें घेऊन ये. "

गौरचंद्र तेथून तत्काळ बाहेर पडला. संन्याशानें आतां दुसऱ्या दिशेकडे पहात पहात आपल्या भगव्या वस्त्रांवर चिलखत चढविण्यास सुरुवात केली. हें पाहून गोपाळदेव आणि धर्मपाळदेव या दोघांनींहि आपापलीं चिलखतें चढविलीं. इतक्यांत दुसरा एक संन्यासी त्या जागीं आला आणि त्यानें पहिल्या संन्याशाला प्रणाम केला. त्याला पाहतांच पहिल्या संन्याशानें विचारलें, " आनंदानंद ! काय समाचार आहे ? "

" प्रभु ! मोठेंच संकट आलेलें आहे. आज रात्री दरोडेखोर हल्ला करणार आहेत असा समाचार गोकर्णाच्या महाराज्ञीकडून आलेला आहे. गोकर्णाचें महाराज रघुसिंह दोन वर्षांपूर्वी–"

" पण ही बातमी घेऊन आपण माझ्याकडेसे आलांत ? "

" प्रभु ! दुसरा कांहीं उपाय नसल्याकारणानें मला आपणांपाशीं यावें लागलें. आमच्या गांवांत यावेळीं गांवाचें रक्षण करील असा एकहि पुरुष नाहीं. सर्व सैन्य घेऊन अद्भुतानंद भागीरथीच्या पैलतीरीं धान्याचा संग्रह करावयास गेलेले आहेत, आणि त्यांना परत यावयास आणखीहि तीन तीन दिवसांचा अवधी आहे."

" गोवर्धनांत यावेळीं किती जण आहेत ? "

" मीच काय तो एकटा. म्हणून मी स्वतःच हा समाचार आपल्या कानीं घालावयास आलों आहें. गोकर्णांत अनाथ राज्ञीशिवाय दुसरें कोणीहि जाणतें माणूस नाहीं. दुष्काळामुळें अर्धीअधिक गांवची लोकसंख्या आधींच कमी झालेली आहे, आणि देशांत अराजकता माजलेली पाहून जे कांहीं थोडेबहुत लोक शिल्लक होते तेहि गांव सोडून परागंदा झालेले आहेत.

गांवांत बायकामुलांचीच विशेष संख्या आहे, कांहीं थोडेसे पुरुष असतील, पण दरोडेखोरांशीं सामन्यास उभें राहवयाची त्यांच्यांत कुवत नाहीं."

हें ऐकून पहिला संन्यासी मस्तकावर हात टेंकून विचारमग्न झाला. कांहीं वेळानंतर दीर्घ निःश्वास टाकून तो म्हणाला, " आनंदानंद ! मग आतां पुढें काय करावें म्हणतां ? "

खोलींत एका बाजूला उभ्या उभ्या गोपाळदेव आणि धर्मपाळ त्यांचें हें संभाषण लक्षपूर्वक ऐकत होते. ते आतां जवळ येऊन पाहिल्या संन्याशाला उद्देशून म्हणाले, " प्रभु ! युद्धकार्यांत आमचें आजपर्यंतचें जीवन व्यतित झालेलें आहे. म्हणून जोंपर्यंत आम्ही आपल्याजवळ आहोंत, तोपर्यंत कोणत्याहि प्रकारची काळजी करण्याचें आपणांस प्रयोजन नाहीं. "

संन्याशी खालीं मान घालून कसलासा विचार करीत होता. तो गोपाळदेवाकडे वळून म्हणाला, " गोपाळदेव ! आगाऊ सूचना देऊन हल्ला करावयास येणारे हे दरोडेखोर साधारण कोटींतील दिसत नाहींत. देशांत बेबंदशाहीं असल्यामुळें प्रबलांनीं दुर्बलांना चिरडावें हा* मात्स्य न्यायच आहे. रघुसिंहाच्या विधवेला अनाथिनी आणि आश्रयविहीन पाहून तिच्या राज्यावर अनेक सामंताची लोलुपदृष्टि खिळलेली आहे. हे लोक राष्ट्रघातकी, अत्याचारी व निव्वळ दरोडेखोर आहेत. राजसत्ता खिळखिळी झालेली पाहून अत्याचारी जेव्हां निरंकुश होतात, तेव्हां देशाची स्थिति ही अशीच व्हावयाची ! आनंदानंद ! गोकर्णदुर्ग लुटावयास येणारा हा अधमाधम कोण ? "

" श्रीपुर नगरचा नारायण घोष."

" वसुदेव घोषाचा पुत्र ? "

" होय."

---

* टीपः—मोठे मासे लहानलहान माशांना गिळंकृत करीत असतात, या प्रकाराला ' मात्स्य न्याय ' म्हणतात. त्याचप्रमाणें राजसत्तेच्या अभावीं मनुष्यांत सुद्धां बलवान लोक लूटफाट करून दुर्बलांना चिरडीत असतात आणि प्रसंगी ठारहि करतात.

" गोपाळदेव ! " पहिला संन्याशी म्हणाला, " युद्धकलेंत निष्णात असलेल्या शेंकडों सशस्त्र सैनिकांसह नारायण घोष गोकर्ण लुटावयास येणार आहे, आपण चौघेजण त्याच्या सैन्यापुढें कितीसा टिकाव धरणार ? "

" प्रभु ! दुसरें जरी विशेष आमच्यानें होण्यासारखें नसलें, तरी किल्ल्यांत प्रवेश करतांना त्याला जोराचा अडथळा तरी आपणांस करतां येण्यासारखा आहे. गोकर्णला किल्ला आहेना ? "

" आहे, पण तो कांहीं लहानसहान नाहीं. त्या किल्ल्याचें रक्षण करावयास मोठ्या सैन्याची आवश्यकता आहे. "

" गांवात कितीशीं मनुष्यें शस्त्र धारण करूं शकतील ? "

" शस्त्रास्त्रांचा उपयोग करू शकणारीं फारफार तर शिकस्तीनें पंचवीस माणसें मिळूं शकतील. "

" मग तेवढींच सध्यां पुरीं आहेत. जवळपास कोणाकडून मदत मिळण्यासारखीं नाहीं का ? "

" आहे. उध्दारणपूरच्या राजाकडे निरोप पाठविल्यास मदत मिळूं शकेल. पण त्यांच्याकडे ही बातमी सांगावयास पाठवावयाचें कोणाला ? "

" कां बरें ? गौरचंद्र जाईल. "

" छे, भयानें तो वाटेतच प्राण सोडील. "

" तर मग आपले हे शिष्य आनंदानंद स्वामीच त्यांच्याकडे जातील. आणि आपण तिघेही जण गांवकऱ्यांना मदत करून सारी रात्र दुर्गाचें रक्षण करूं. "

" असें केल्यास दुर्गाचें रक्षण होईल म्हणतां ? "

" होय, तसें केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. आतां फुकट वेळ दवडण्यांत अर्थ नाहीं. गोकर्ण येथून कितीसें दूर आहे ? "

" जवळजवळ तीन कोस, "

" ठीक. चला तर मग आतांच निघूं या. "

गौरचंद्रानें सर्वांना लगबगीने नदीच्या पैलतीराला आणून सोडलें, तेथें आपल्या दोन घोड्यांखेरीज आणखीहि दोन घोडे तयार असलेले

गोपाळदेवाला आढळून आलें. चौघेहि अश्वारूढ होऊन त्या जनशून्य गांवाच्या रोखानें निघाले. राजमार्गांवर येतांच आनंदानंदस्वामीनें त्यांचा निरोप घेऊन दक्षिणेचा रस्ता सुधारला. बाकीचे तिघेहि अत्यंत घाईघाईनें उत्तरेकडे वळले. एक गांव रस्ता चालल्यानंतर संन्याशानें सप्तग्रामच्या राजमार्गाचा त्याग केला, रस्त्याच्या दोन्ही बाजूला गर्द अंबराई होती. या दाट झाडींतून एक अरुंद वांकडचा तिकडचा वळणाचा रस्ता पश्चिम दिशेकडे गेलेला होता. तिघेहि झपाटयानें त्या मार्गानें निघाले. हा रस्ता एवढा लांबलचक असतांहि मनुष्यवस्तीचें आसपास एकहि चिन्ह न दिसल्यामुळें गोपाळदेवाला भारी आश्चर्य वाटलें. ठिकठिकाणी पानें, डहाळया आणि वृक्षलता बाजूला सारतांच नष्ट झालेल्या गांवांतील बचावलेला थोडासा भाग दिसून येई. कांहीं पुढें गेल्यानंतर त्या आम्रवनाच्या बाहेर तो रस्ता एका नदीच्या पात्राजवळून निघालेला होता. संन्यासी त्या दिशेकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाला, ' गोपाळदेव ! हें पहा भागीरथीचें पुरातन पात्र.''

रस्त्याच्या दुतर्फा दाट जंगल होतें. भगवान् सहस्त्ररश्मी अस्तंगत होण्याच्या बेतांत होता. इतक्यांत एकाएकीं दचकून संन्यासी उद्‌गारला, '' कोण आहे ? ''

गोपाळदेवानें विस्मयाने चोहींकडे नजर फेंकली; परंतु त्याच्या नजरेला कोणीहि पडले नाहीं. तेव्हां त्यानें आश्चर्यचकित होऊन सन्याशाला प्रश्न केला,

'' प्रभु ! कोणाबरोबर आपण बोलत आहां ?''

कांहीं प्रत्युत्तर न देतां संन्याशानें त्याच्याकडे आपले तोंड वळविलें; तेव्हां एक दोन हात लांबीचा लोखंडी फाळ असलेला तीर संन्याशाच्या पागोटयांत घुसलेला आहे असे गोपाळदेवाच्या दृष्टोत्पत्तीस आले. तिघांनींहि आपापलीं शिरस्त्राणें घोडयांच्या जिनाला बांधलेलीं होती. ती लगेच सोडून त्यांनीं ती आपल्या मस्तकांवर चढविलीं. इतक्यांत आंब्याच्या गर्द झाडींतून कोणीसें विचारलें, '' कोण तुम्ही ?''

मंद हास्य करून संन्याशी म्हणाला,

" भिऊं नका. मी विश्वेश्वरानंद ! "

हें ऐकतांच अन्धारांतून चिलखत धारण केलेली एक मनुष्याकृति पुढें आली. संन्याशानें आपले शिरस्त्राण बाजूला सारून तिला आपलें तोंड दाखविलें. त्यासरशीं ती व्यक्ति प्रणाम करून म्हणाली, " प्रभो ! अपराधाची क्षमा असावी. दुर्गस्वामिनी आपलीच वाट पहात आहेंत. "

इतकें बोलून त्या व्यक्तीनें तुतारीचा आवाज केला. तो ऐकतांच आजूबाजूच्या वृक्षांवरून चार पांच चिलखतधारी सैनिक हातांत धनुष्य-बाण घेऊन खालीं उतरले. प्रथम व्यक्ति त्यांपैकीं एका सैनिकाला उद्देशून म्हणाली, " केशव ! गोवर्धनाहून प्रभु आलेलें आहेत, त्यांना घेऊन तूं दुर्गांत जा. "

तो सैनिक आज्ञेप्रमाणें वाट दाखवीत पुढें चालूं लागला व त्याच्या मागून ते तिघेहि निघाले.

आंब्याच्या वनालगतच नदीच्या पात्राजवळ एक किल्ला होता. या ठिकाणीं भागीरथीचे पात्र वांकडीतिकडी वळणें घेत असल्यामुळें हें स्थळ एखाद्या कोंपऱ्यांत आल्याप्रमाणें दिसें; आणि या कोपऱ्याच्याच जागीं तो किल्ला होता. या दुर्गाच्या चारी बाजूला विटांची एक भिंत होती. या भिंतीच्या दोन बाजूंनीं नदीचे पात्र वाहात होते. व दुसऱ्या दोन बाजूला खोल खंदक होते. या खंदकाच्या पलीकडच्या बाजूला आम्रवनानें वेढलेले गोकर्ण गांव बसलेलें होतें. या खंदकावर लांकडाचा बनविलेला एक पूल निरंतर असे. त्यावरून गांवांतील लोक किल्ल्यांत जात येत असत. पण या वेळीं शत्रूंच्या आक्रमणाची धास्ती असल्यानें दुर्गवासीयांनीं तो पूल वर काढून घेतला होता; आणि त्याच्या ऐवजीं दोन वांसे आंडवें खंदकावर तात्पुरतें टाकण्यांत आले होते. घोडेस्वारांना पाहून दुर्गाच्या तटावरून कोणीसे हटकलें, " कोण आहे ? "

मार्गदर्शक सैनिकानें प्रत्युत्तर दिले, " मी केशव ! गोवर्धनाहून प्रभु आलेलें आहेत. खंदकावर पूल पाडा. "

दुर्गांतून उत्तर मिळालें, " महाराज्ञीच्या आज्ञेशिवाय आम्हांला तसे करतां यावयाचे नाहीं. आपण थोडा वेळ थांबा. "

काहीं वेळानें तो सैनिक परत येऊन म्हणाला, " पूल खालीं सोडण्यांत येत आहे. "

लोहशृंखलाबद्ध पूल आस्ते आस्ते खंदकावर येऊन पडला आणि सूर्यास्तानंतर तिघंहि घोडेस्वारांनीं दुर्गांत प्रवेश केला.

● ●

## ४

तिघेहि आगंतुक किल्ल्यांत शिरतांच रस्त्याच्या दोन्ही बाजूंस सशस्त्र सैनिक उभे असलेले त्यांच्या नजरेस पडले. दरवाज्यासन्मुख एक योद्धा हातांत भाला घेऊन त्यांचीच वाट पाहात उभा होता. त्यानें प्रथम तर संन्याशास ओळखलेच नाहीं. कारण अंधार अधिकाधिक पडत चालला होता. संन्याशाच्या लक्षांत हा प्रकार येऊन तो लगेच एकदोन पावलें पुढें होऊन म्हणाला, " मी विश्वेश्वरानंद. गोवर्धन मठांतून आलों आहे. "

वृद्ध सैनिकानें हें भाषण ऐकतांच त्यास प्रणाम करून म्हटलें,

" प्रभु ! क्षमा करा. आपणाला चिलखत घातलेलें मी यापूर्वीं कधीं पाहिलेलें नसल्यामुळें मी ओळखूं शकलों नाहीं. "

मंद हास्य करीत संन्यासी म्हणाला, " चिंता नाहीं; पण उद्धवघोष आपणच ना ? "

वृद्धानें उत्तर दिले, " होय प्रभु ! "

" देशाची आज अशी शोचनीय अवस्था झालेली आहे, आणि दुष्काळानें उग्र स्वरूप धारण केलेलें आहे, त्यामुळें माझ्यासारख्या संन्याशालाहि हातीं शस्त्र धारण करावें लागल्यास त्यांत कांहीं नवल नाहीं. अनेक संन्याशांनीं याच मार्गाचे अवलंबन केलेलें आहे. सद्यः परिस्थितींत देशाखातर हातीं शस्त्र धारण करणें हेंच त्यांचें खरें कर्तव्य आहे. उतारवयांत मजवरहि तोच प्रसंग आलेला आहे. उद्धव ! स्वर्गस्थ रघुसिंहाच्या आश्रयहीन परिवाराच्या साह्यार्थ तेथें सध्यां कोणीहि नसल्याकारणानें गोवर्धन मठांतून

मला कोणाणाहि आणतां आलें नाहीं. या विश्वेश्वरानंदाला मोठा अभिमान वाटत होता कीं, जोंपर्यंत गोवर्धन मठाचे अस्तित्व असेल, तोंपर्यंत दरोडेखोरांच्या हल्ल्यापासून या प्रदेशाचे संरक्षण करावयास वीरांची उणीव भासणार नाहीं. परंतु त्याचें मला आज अगदीं निरुपाय होऊन अशा स्थितींत यावें लागलें आहे. गोकर्णावर दरोडेखोरांचा हल्ला येणार आहे ही बातमी घेऊन स्वामी आनंदानंद मजकडे आले. आणि दरोडेखोर कोण? तर वसुघोषाचा पुत्र नारायण आणि त्याचे सैनिक. नारायण घोषाच्या ऐवजीं आज प्रत्यक्ष त्याचा बाप जरी येता, तरी मी डममगलों नसतों. पण काय करूं? आज मीं सर्वस्वीं बलहीन आहे. मठांत आज कोणीहि योद्धा नाहीं. सर्वजण भागीरथीच्या पैलतीरीं धान्याचा संग्रह करावयास गेलेले आहोत."

"पण प्रभु! आम्ही आपल्या भरंवशावर गांवांतील बायकांमुलें, म्हातारेकोतारे यांना आश्रयार्थ किल्ल्यांत आणून ठेविलें आहे. मग आतां काय करावें म्हणतां? आपल्या शिष्यांच्या भरंवशावर महाराज्ञीनें किल्ला लढविण्याचें ठरविलें होतें. दुर्गांत सशस्त्र असे काय ते सुमारें तीस सैनिक असतील. मग आतां उपाय?"

"उद्धव! याला उपाय आतां भगवंताच्या हातीं! काळजी करूं नका. मी आनंदानंदांना उतावळीनें उद्धारणपुरास पाठविलेलें आहे. ढेकरीच्या राजाचें सैन्य घेऊन तो लगेच आपल्या मदतीला यावयास निघेल. फक्त तो येऊन पोहोंचेपर्यंत आपणांला आत्मसंरक्षण करावें लागणार. सुदैवानें एका महापुरुषाचें साह्य मिळालेलें आहे. वरेंमंडळाचे सामंत चक्रचूडामणी गोपाळदेवाचें नांव आपण कधीं ऐकलें आहे काय? तेच हे महाराज गोपाळदेव आणि त्यांचें हे युवराज धर्मपाळदेव आपल्या सन्मुख उभे आहेत त्यांना यथोचित अभिवादन करा."

परंतु उद्धवघोषाला तसें करतांना मध्येंच थांबवून गोपाळदेव म्हणाला. "प्रभु! अभिवादनाची कांहीं जरूरी नाहीं. क्षत्रिय क्षत्रियधर्माचें पालन करावयास केव्हांहि कुचराई करणार नाहींत. रात्र अधिकाधिक होत चाललेली आहे; आणि शत्रुसेनेचा हल्ला कोणत्या वेळेला येईल

याचा कांहीं नेम नाहीं. म्हणून अगोदर दुर्गाच्या रक्षणाच्या तजविजीस लागलें पाहिजे."

उद्धवघोष प्रणाम करून म्हणाला, "महाराज! आपल्या भीम-पराक्रमाची वार्ता ऐकली नसेल असा गौडांत एकही माणूस सांपडणें शक्य नाहीं. आतां आपण स्वतःच येथें आहांत, त्याअर्थी गोकर्णाला भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं. आपण स्वतःच दुर्गरक्षणाचा सारा भार आपल्या शिरावर घ्यावा. आपल्या आगमनाची बातमी मी महाराज्ञीच्या कानांवर घालून येतों."

इतकें बोलून वृद्ध उद्धवघोषानें पुनः प्रणाम केला व तो तेथून निघून गेला. तिघेहि आंगातुक आतां दुर्गांत चारी बाजूंना फिरून बारकाईनें पाहूं लागले. तेव्हां दुर्गांत युद्धाचीं जय्यत तयारी केली असल्याचें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. दुर्गाच्या तटाजवळ ठिकठिकाणीं तेलाच्या मोठाल्या कढयांतून उष्ण तेल सळसळत होतें. चिलखतधारी सैनिक ओळीनें अंतराअंतरावर उभे राहून मोठ्या सावधगिरीनें पहारा करीत होते. द्वाराजवळ हत्यारांचा मोठा सांठा केलेला दिसून येत होता. ही सर्व तयारी पाहून गोपाळदेवाला भारी संतोष वाटला. इतक्यांत उद्धवघोष परत येऊन म्हणाला, महाराज! महाराज्ञी आपली वाट पहात आहेत."

दुर्गाच्या मधोमध दुर्गस्वामिनीचा महाल होता. द्वाराचे जवळच एक दासी दिवा घेऊन उभी होती. तेथें येतांच उद्धवघोष म्हणाला, "महाराज्ञी! प्रभु विश्वेश्वरानंद आणि वरेंद्राधिपति महाराज गोपाळदेव युवराजांसह आलेले आहेत."

पडद्यांतून आवाज ऐकूं आला, "प्रभु! आपल्या भरंवशावरच आम्ही आतांपर्यंत उत्तराढ प्रदेशांत दिवस काढले. आणखी विशेष तें याहून आम्ही काय सांगणार? खुद्द वरेंद्राधिपति आमच्या साह्यार्थ आलेलें आहेत असें ऐकतें. त्यांच्या स्वाधीन आज आम्ही आपले प्राण केलेले आहेत आणि निश्चित मनानें बसलों आहोंत; पण जरूर लागल्यास रघुसिंहदेवाची ही विधवा, माझी पितृहीना कल्याणी आणि गोकर्णांतील साऱ्या कुलवधु हातीं शस्त्रें धारण करतील."

संन्याशानें उत्तर दिलें, " बेटा ! काळजी करूं नकोस. रघुसिंहाच्या दुर्गांत पुरुषांचा अभाव आणि गोवर्धन मठांत सैनिकांचा अभाव हें सर्व विधिसूत्राप्रमाणें घडून आलेले आहे; परंतु जोंपर्यंत या विश्वेश्वरनंदाच्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत तुम्हांला हातीं शस्त्र धारण करावें लागणार नाही. "

गोपाळदेव मध्येंच म्हणाला, " उध्दवदेव, महाराज्ञींना कळवा कीं, जोंपर्यंत या गोपाळदेवाच्या आणि धर्मपाळदेवाच्या शरीरांत प्राण आहे, तोंपर्यंत गोकर्णदुर्गांत शत्रूंचा प्रवेश होऊं शकणार नाहीं. "

उध्दवाला सांगण्याची गरजच नाहीं. पडद्यांतून उत्तर मिळाले, " परमेश्वर आपणाला विजयी करो ! "

दासी दिवा घेऊन अंतःपुरांत गेली. संन्यासी, गोपाळदेव आणि धर्म–पाळदेव दुर्गाच्या सिंहद्वाराकडे यावयास निघाले. वाटेंत गोपाळदेवानें प्रश्न केला, " उद्धवदेव ! शत्रूची टेहळणी करण्यासाठीं आपण किल्ल्याबाहेर ठेवलेलीं आपलीं माणसे पाहिली; पण त्याशिवाय आणखी कोठें माणसे पाठविली आहेत काय ?"

" होय महाराज ! रणग्रामच्या घाटावर पांच माणसें छपून राहिलीं आहेत. शत्रूसैन्याशीं त्यांना झगडतां येणार नाहीं. तथापि शत्रूसैन्यानें नदी ओलांडताच ते येऊन आपणाला खबर देतील. "

" या मार्गाशिवाय शत्रूसेनेला येण्याला आणखी दुसरा एखादा मार्ग नाहीं काय ?"

" उत्तर दिशेहून येतांना रणग्रामच्या घाटाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि जागीं त्यांना भागीरथी नदी ओलांडतां येणार नाहीं. "

" ठीक, पण रणग्रामास माणसांचीं घरेंदारें आहेत ना ?"

" घरेंदारें आहेत, पण माणसें नाहींत. "

पाहतां पाहतां चोंहीकडे गडद काळोख पडला. दुर्गावर ठिकठिकाणीं मशाली पेटल्या. पण गोपाळदेवानें त्या सर्व विझवून टाकण्यास फर्माविले. रात्रीच्या गाढ अंधकारांत अगदीं निस्तब्धपणें शत्रूसैन्याच्या हल्ल्याची गोकर्णवासी वाट पहात बसले.

सिंहद्वाराजवळ तिघेहि आगंतुक शत्रूची हालचाल पाहात राहिले. इतक्यांत एकाएकीं फार दूर आम्रवनांत त्यांना मशालीचा प्रकाश दिसूं लागला. त्याचक्षणीं खंदकाच्या पलीकडून एका मनुष्याकृतीनें प्रश्न केला,

" दरवाजावर कोण आहे ? "

उत्तर देण्यांत आले, " कां, काय काम आहे ? "

" मी केशव आहे. "

" काय समाचार ?"

" रणग्रामाच्या घाटावर ठेवलेलीं माणसें परत आली. "

" त्यांना दुर्गांत यावयास सांग. "

" खंदकावरील छोटा पूल तसाच राहूं देऊं कीं काढूं ?"

" नको, तूर्त तो तेथेंच असूं दे. "

दोन लांकडी फळ्यांच्या तात्पुरत्या पुलावरून चार पांच पुरुष खंदक ओलांडून दुर्गाच्या दरवाजाच्या लहानशा फाटकांतून किल्ल्यांत शिरले. उध्दव, गोपाळदेव आणि संन्यासी दरवाजाच्या मागेंच उभें होतें. गोपाळ-देवानें त्यांना प्रश्न विचारण्यास सुरुवात केली, " कितीसे लोक येताहेत ?"

" आठ नऊशें. "

" त्यांनीं सगळ्यांनीं भागीरथी ओलांडली काय ?"

" होय. शेवटची नौका रणग्रामच्या घाटावर येऊन थडकली तेव्हां आम्ही तेथून निघालों. "

" त्यावेळीं कितीसा दिवस होता ?"

" सूर्य अगदीं अस्तंगत होतांहोतां ते सगळे येऊन पोहोंचले. "

" ठीक, तुम्हांपैकीं कांहींजण येथेंच रहा. उद्धवदेव ! खंदकावरील पूल आतां उचलून घ्या. "

एक सैनिक लांकडांच्या साह्यानें खंदक ओलांडून बाहेर गेला व क्षणभरानें आपल्याबरोबर दुसरे पांच सैनिक घेऊन आला. तेव्हा गोपाळ-देव आपल्या पुत्राला उद्देशून म्हणाला, " या पांच सैनिकांना घेऊन तूं अंत:पुराच्या रक्षणार्थ जा. "

धर्मपाळानें विचारलें, " अंत:पुराच्या रक्षणासाठीं एव्हांच सैनिक पाठविण्याची काय जरूर ? "

" अंतःपुर अगदीं अरक्षित आहे. म्हणून तूं या सैनिकांसह जाऊन अंतःपुराच्या द्वारावर रहा. दुर्गाच्या द्वाररक्षणार्थ जर मला जरूर भासली, तर मी तुला बोलावणें पाठवीन."

पित्याला प्रणाम करून पांच सैनिकांसह धर्मपाळ तेथून निघाला. यावेळीं दूर अंतरावरून मशालींचा उज्ज्वल प्रकाश दिसूं लागला होता. तो पाहून शत्रुसैन्य येऊन ठेपलें हें दुर्गवासीयांना कळून चुकलें. सुमारें एक हजार सशस्त्र सैनिक दुर्गाच्या बाजूकडे येत होतें. सर्वांच्यापुढें एक घोडेस्वार व त्याच्या मागोमाग चिलखतें घातलेले पुष्कळ योद्धे मंदगतीनें पुढेंपुढें सरकत होते. लग्नाच्या वरातीप्रमाणें हें सैन्य अगदीं विस्कळितपणें दुर्ग-द्वाराकडे येऊन ठेपलें. जणूं काय एखाद्या उत्सवाला आपण चाललों आहोंत अशीच त्यांची भावना दिसून येत होती.

दुर्गद्वारासमोर उभें राहून एक घोडेस्वार उच्च स्वरानें म्हणाला, " दुर्गांत कोण आहे ? दरवाजा उघडा. उद्धवघोष कोठें आहे ? "

उद्धवघोष दरवाजामागेंच उभा होता. त्यानें उत्तर दिलें, " दुर्ग-स्वामिनीच्या आज्ञेवरून दुर्गद्वार बंद करण्यांत आलेलें आहे."

" जलदी दरवाजा उघडतोस कीं नाही ? नाहीं तर तुला आणि तुझ्या दुर्गस्वामिनीला कुत्र्यांकडून फाडवून खावयाला लावूं. तो गोवर्धन मठाचा भिकारडा संन्यासी येऊन तुमचें रक्षण करील असा का तुमचा समज आहे ? तसें असल्यास तो साफ चुकीचा आहे. तो वृध्द कोल्हा विश्वेश्वरा-नंद यावेळीं या देशांत नाहीं."

संन्यासी किल्ल्याच्या तटावर चढून म्हणाला, " नारायण, हा दंत-विहीन वृध्द शृगाल या देशांतच आहे बरें ! तुला जर जिवाची आशा वाटत असेल. तर तेथून निमूटपणें जा कसा ! "

संन्याशाचा स्वर कानीं पडतांच घोडेस्वार क्रोधानें बेफाम झाला, आणि गर्जून म्हणाला, " थेरड्या ! तुला पुष्कळदां यापूर्वीं क्षमा केलेली आहे. परंतु या खेपेला तुला तुझ्या माणसांसह गोवर्धनमठांत जिवंतच जाळून टाकतों, थांब ! "

" नारायण ! वृध्द शृगालाला आणखी उत्तेजित करूं नकोस. "

यावेळीं गोपाळदेव खालीं उभा होता. तो तेथूनच म्हणाला, " प्रभु! वाग्युध्द करण्याची ही वेळ नव्हे. आपण खालीं या पाहूं."

आपल्या आदेशाप्रमाणें दरवाजा उघण्यांत येत नाहीं हें पाहून नारायण घोष क्रोधसंतप्त झाला आणि त्यानें दुर्गावर हल्ला चढविण्यास आपल्या सैनिकांस फर्माविलें. वांशांचा पूल बनविण्यांत आला. परंतु त्यावरून त्याचे सैनिक तटाच्या भिंतीजवळ येतांच उकळलेल्या तेलानें त्यांचीं शरीरें होरपळून जात. त्यामुळें नारायण घोषाच्या सेनेचा सर्वस्वीं निरुपाय होऊन ते मागे परतले.

त्यानंतर एकाच वेळीं चार तात्पुरत्या पुलावरून त्यांनीं हल्ला चढविला. परंतु उकळलेलें तप्त तेल आणि तटावरून होणारा तीरांचा भयंकर वर्षाव यामुळे याहि खेपेस त्यांना मागें परतावें लागलें. याप्रमाणें चारदां हल्ला करूनहि जेव्हां यशाचा संभव दिसेना, तेव्हां नारायण घोषाचें सैन्य तेथून मागें हटले. थोडयांच वेळांत गांवांत ठिकठिकाणीं आगीचे डोंबचेडोंब दिसूं लागले. विद्युत् वेगानें गांवांतील घरें एकामागून एक पेट घेऊं लागलीं. त्यांत आणखी अग्निनारायणाला वायुदेव मनःपूर्वक साहय्य करूं लागला. गांवांतून शेंकडों पशूंचें अंतःकालीन आर्तनाद कानांवर आदळूं लागले. ते ऐकून दुर्गवासीयांत एकच हाहाःकार प्रवर्तला. याप्रमाणें दुर्गवासी जन शोकांत बुडून गेलेले असतां पुनः शत्रुसेनेनें दुर्गावर आक्रमण केलें. एकाच वेळीं पुष्कळ ठिकाणाहून दुर्गावर हल्ले चढविण्यांत आल्यामुळें दुर्गरक्षण करीत असलेली मूठभर सेना अगदीं भयभीत झाली.

संन्यासी, गोपाळदेव आणि उध्दवघोष तिघे तीन जागीं उभे राहून त्यांना उत्तेजन देऊं लागले. वारंवार हल्ले चढवूनहि शत्रूसैन्याला किल्ल्यांत शिरकाव होईना.

गांवांतील घरांनी जेव्हां पेट घेतला, तेव्हां वाऱ्यामुळें आगींच्या ठिणग्या विद्युत्वेगानें एका घरावरून दुसऱ्या घरावर उडूं लागल्या आणि त्या सर्व गांवानें क्षणांत पेट घेतला. अग्निस्फुलिंग आतां जोरजोरानें किल्ल्यांतहि येऊन पडूं लागले आणि पुष्कळ प्रयत्न करूनहि शेवटीं घडावयाचा तो प्रकार झालाच. किल्ल्यांतील गवताच्या सांठघाला आग लागली आणि तेथील घरादारांनींहि एकदम पेट घेतला.

तेव्हां अंतःपुरांत जमलेल्या सर्व स्त्रिया व्याकुल चित्तानें बाहेर पडून अंगणांत येऊन उभ्या राहिल्या. त्या वेळीं युवराज धर्मपालदेव पांच सैनिकांसह अन्तःपुराच्या दरवाजावरच उभा होता. त्याला पाहतांच दुर्गस्वामिनीनें प्रश्न केला, " आपण कोण ?"

" मातोश्री ! मी धर्मपाल. महाराज गोपाळदेवांचा पुत्र. "

" मग येथें कां उभे ?"

" अन्तःपुर तर आतां आगीच्या भक्ष्यस्थानी पडलें आहे. तेव्हां आपण या पांचहि सैनिकांना दुर्गद्वाराकडे धाडून द्या. "

लगेच धर्मपालाच्या आज्ञेनें पांचहि सैनिक तेथून दुर्गद्वाराकडे निघुन गेले. ते जातांच दुर्गस्वामिनी म्हणाली,

" युवराज ! आम्ही वाटेल तें करून आत्मरक्षण करूं; पण ही पोर मात्र भयानें अगदीं गर्भगळित झालेली आहे. तेव्हां आपण हिचे रक्षण कसें करणार ? "

इतकें म्हणून आपल्या पाठीमागें तोंड लपवून असलेल्या सुकुमार कन्येच्या मुखाकडे वळून तिनें अंगुलिनिर्देश केला. धर्मपाळानें भक्तिपुरस्सर महाराज्ञीला प्रणाम करून त्या मुलीच्या संरक्षणाचा भार स्वतःच्या शिरावर घेण्याची इच्छा प्रदर्शित केली.

इतक्यांत शत्रूसैन्याच्या विजयसूचक आरोळ्यांनीं तो सारा दुर्ग कंपायमान झाला. तीन ठिकाणीं एकाच वेळीं शिड्या लावून शेवटीं त्यांनीं किल्ला काबीज केला. दुर्गाचे रक्षण करणाऱ्या मूठभर सैन्याचें त्यांच्यापुढें काहींहि चाललें नाहीं.

युध्द जवळ जवळ संपत आलें हें पाहून गोपाळदेव दुर्गाचे रक्षण करणाऱ्या सैनिकांसह हळूहळू मागें हटूं लागला. दुर्गांतील सर्व बायकांमुलें आणि म्हातारेकोतारे दुर्गस्वामिनीच्या अंतःगृहाकडे आश्रयार्थ येऊन राहिले. त्या वेळीं दुर्गस्वामिनीने धर्मपाळास सांगितले, " युवराज ! आतां आपण कल्याणीचे रक्षण करा. नदीकिनारी आम्रकुंजांत एक सुसज्जित अश्व आहे. शत्रूंचे सैन्य तेथें येऊं शकणार नाहीं. जर आपण खंदक पार करूं शकाल, तर आपला बचाव होईल. आमची आपण कोणत्याहि प्रकारची काळजी करूं नका. "

हें ऐकून धर्मपाळानें क्षणाचाहि विलंब न करतां मूर्च्छित कल्याणी-देवीला खांद्यावर उचलून खंदकाजवळ असलेल्या एका दिंडींतून बाहेर पाऊल टाकलें. गांवांत अजूनहि अग्नि शांत झालेला दिसत नव्हता. परंतु शत्रूसेना मात्र या वेळीं तेथें नव्हती.

याच वेळीं किल्ल्यांत शत्रूसैन्यानें केलेला जयजयकाराचा ध्वनीं कानीं पडला. दुर्गाच्या रक्षणार्थ असलेले चिमुकले सैन्य शत्रूच्या हस्तें गारद झाले असले पाहिजे ही खूणगांठ धर्मपाळानें आपल्या मनाशीं बांधली. खांद्यावर कल्याणीला घेऊन तो अगदीं निर्भय चित्तानें बाहेर पडला. पण अगदीं याच वेळीं त्याला परिचित कंठांतून निघालेले शब्द ऐकूं आले.

" घाबरूं नका. आतां भिण्याचे कारण नाहीं. "

• •

## ५

नारायण घोषाचें सैन्य ज्या वेळीं विजयोन्मादानें मत्त होऊन लुटालूट करण्यांत गुंतलें, त्याच वेळीं दुर्गाबाहेर दोनतीनदां रणशिंगाचा आवाज ऐकूं आला; पण तिकडे त्या सेनेचे लक्ष गेले नाहीं. दूर्ग काबीज केल्यानंतर त्यांनीं खंदकावर पूल टाकला होता. संन्यासी, गोपाळदेव आणि उध्दघोष बायकापोरांचें रक्षण व्हावें म्हणून शिकस्तीने प्रयत्न करीत होतें. त्यांच्याबरोबर अजूनहि शिल्लक असलेले आठदहा सैनिक युध्द करीत होते.

शत्रूसैन्य त्यांची पर्वा न बाळगतां खुशाल लुटालूट करण्यांत दंग झालें होतें; म्हणूनच दुर्गवासीयांचे हा वेळपर्यंत रक्षण होऊं शकले.

तिसऱ्यांदा रणशिंगाचा आवाज होतांच दुर्गाबाहेरील शत्रुसैन्य एकदम घाबरून गेले. याच वेळीं कानठळ्या बसतील असा शेंकडों घोड्यांच्या टापांचा ध्वनि दुर्गवासीयांच्या कानांवर आदळला. एका क्षणांतच शत्रूसैन्याला आपली चूक कळून आली. बाजू आतां उलट त्यांच्या अंगावर आली. शत्रू सैन्य आणि दुर्गवासी लोक नवीन येत असलेल्या फौजेकडे अनिमिष नेत्रांनी पाहूं लागले. पण खरा प्रकार लक्षांत येतांच शत्रुसेनेनें

दुर्गांतून पळून जाण्याचा मार्ग स्वीकारला. नवीन आलेल्या अश्वारोहि सैन्याच्या अग्रभागीं एक भगवी वस्त्रें धारण केलेला योध्दा होता. तो उच्च स्वराने दुर्गवासीयांना म्हणाला, " भिऊं नका. दुर्गाचे रक्षण आतां झालेंच समजा ! "

किल्ल्याच्या दिंडीवाटे बाहेर पडल्यानंतर खंदक ओलांडतां ओलांडतां धर्मपाळदेवानें हेंच शब्द ऐकले होते. त्या अश्वारूढ सैनिकाचें हे शब्द कानी पडतांच संन्याशानें त्याचा स्वर ओळखून म्हटलें,

" आनंदानंद ! सावध रहा. शत्रूसैन्यापैकीं कोणीहि जिवंतपणें येथून निसटतां कामा नये, म्हणून दुर्गद्वारावरच दक्षतेने रहा. "

अश्वरोहि स्वार आपल्या घोड्यावरून खाली उतरला आणि संन्याशाला प्रणाम करून म्हणाला,

" प्रभु ! एक हजार घोडेस्वारांचा हा तिसरा भागच काय तो या वेळीं दुर्गांत येऊन दाखल झालेला आहे. बाकी सैन्यासह उद्धारणपुरचें राजे कमलसिंह दुर्गाच्या बाहेरच वाट पहात आहेत. "

घोरतम युद्धाची आतां समाप्ति झाली. आनंदानंद आणि कमलसिंह यांच्या आकस्मिक आगमनामुळें नारायणघोषाच्या सैन्याचा पूर्ण पराजय झाला. त्याचप्रमाणें भागीरथीच्या पैलतिरी गेलेली गोवर्धन मठांतील सेनासुध्दां मार्गें परतल्याचा समाचार येऊन थडकला; पण ती सर्व पायदळ होती. नारायणघोषाच्या उरलेल्या सैनिकांनीं जिवाच्या भयाने शस्त्रें खालीं ठेविली. परंतु उध्दारणपूरच्या अश्वारोहि सेनेनें बिलकूल दयामाया न करता सरसहा त्यांची कतल चालविली. संन्यासी, गोपाळदेव आणि उध्दवघोष यांनीं मोठ्या शिकस्तीनें त्यांना असे करण्यापासून परावृत्त केलें. शेवटीं मरतां मरतां वांचलेल्या सैनिकांत खुद्द नारायणघोषहि जिवंत पकडला गेला.

पहातां पहातां पूर्व दिशेस अरुणाचा प्रकाश फाकूं लागला. तेव्हां अंगावरील चिलखत काढून झालेल्या जखमास पट्टचा लावीत गोपाळदेव म्हणाला, " प्रभु ! धर्मपाळ कोठें आहे ?"

चोहीकडे पहात संन्यासी उत्तरला, " कोण जाणें ! येथें तर कोठें दिसत नाहीं. "

" युध्दाला सुरुवात होण्यापूर्वींच मी त्याला अन्त:पुराच्या रक्षणार्थ पाठवून दिले होतें. पण त्यानंतर त्याची हालचाल कांही समजली नाहीं. "

" अंत:पुरांत तर कोणी नाहीं. अंत:पुरानें पेट घेतांच आंतील सगळ्या स्त्रिया बाहेर येऊन उभ्या राहिल्या आहेत. थांबा, मी उद्धव–घोषाला बोलावणें पाठवितो. "

इतकें बोलून संन्यासी उद्धवघोषाच्या शोधार्थ निघाला. गोपाळदेव नानाप्रकारच्या शंकाकुशंकांनीं अगदीं व्यग्र आणि चिंतातूर झाला. आनंदानंद त्याच्या पुढेंच उभा होता; तो त्याची ही मन:स्थिति पाहून म्हणाला, " कां, काय झालें महाराज ?"

" युवराज धर्मपाळाचा कोठें पत्ता लागत नाहीं. "

" युद्धाच्या वेळीं ते याच ठिकाणीं उभें होते काय ?"

" नाहीं. युद्धाची सुरुवात होण्यापूर्वींच मी त्याला अंत:पुरांतील स्त्रियांच्या रक्षणासाठीं धाडून दिलेले होतें, परंतु आतां त्याचा शोध लागत नाहीं. "

" मी स्वत:च त्यांचा शोध करून येतो. प्रभु, विश्वेश्वरानंद आल्यावर त्यांना सांगा कीं, दुर्गाबाहेर राजे कमलसिंह उभे आहेत, आणि ते आपल्या आज्ञेशिवाय दुर्गांत प्रवेश करणार नाहींत. "

" तुम्ही युवराज धर्मपाळदेवाला ओळखूं शकाल काय ?"

" होय. मी त्यांना एकदां पाहिलेले आहे. "

" हें पहा, त्यांच्या चिलखतावर सुवर्णरेखांकित धर्मचक्राचें चिन्ह आहे. "

" आपल्या वक्ष:स्थलीं जशा प्रकारचें धर्मचक्र दिसत आहे, त्याच–प्रमाणें कीं काय ? "

" होय, हें पालवंशाचे लांछनचिन्ह आहे. "

आनंदानंद धर्मपालाच्या शोधार्थ निघून गेला. गोपाळदेव अगदीं विकारशून्य होऊन त्याच स्थळीं बसून राहिला. कांही वेळानंतर संन्याशी परत येऊन म्हणाला, " युवराज धर्मपाळदेव अंत:पुरांत तर कोठें दिसत नाहीं. "

त्याचा आवाज कानीं पडतांच गोपाळदेवाचें लुप्त झालेलें बाह्य ज्ञान पुन: ठिकाणावर आले. तो उठून उभा रहात म्हणाला, " प्रभु ! चला, मृत सैनिकांचीं प्रेतें तरी आपण धुंडून पाहूं या. "

कांहींहि उत्तर दिल्याशिवाय संन्याशी निमूटपणें त्याच्या मागोमाग निघाला. युध्दसमाप्तीनंतर शिल्लक असलेल्या सैनिकांनीं मृत योध्द्यांचीं प्रेतें दहन करण्यासाठीं नदीकाठीं एक मोठीं चिता रचली होती. दोघेहि त्या जागीं येऊन पाहतात तों स्वामी आनंदानंद एकेक मृत सैनिकाचें चिलखत सोडून त्यांस लक्षपूर्वक तपाशीत होता. खंदकाच्या समोर शेंकडों घोडेस्वार आपापल्या अश्वांवरून उतरून विश्रांति घेत होते. संन्याशाला पाहतांच ते सर्व आदरभावानें उभे राहिले. त्यांतील एका पुरुषानें संन्याशाला भक्तिपुरस्सर प्रणाम केला. त्याच्याकडे पाहून संन्याशी म्हणाला, " कोण कमलसिंह ? "

" हो प्रभु ! "

" आपण दुर्गांत कां आला नाहीं ? "

" प्रभु ! सिंहवंशांतील कोणत्याहि पुरुषानें गोकर्णदुर्गांत मित्रभावानें प्रवेश करणे निषिध्द आहे ही गोष्ट आपल्या स्मरणांत असेलच! "

" कमलसिंह ! आतां आपण पूर्वीचा तो वादविवाद विसरून जावें हें बरें ! देश यावेळीं विपत्तीच्या सागरांत चोहीकडून बुडालेला आहे. आपल्यांतील विरोधामुळें देशाची अशी शोचनीय अवस्था झालेली आहे. आपण दुर्गरक्षणार्थ धांवत आला आणि दुर्गाचें रक्षणहि केलेंत; असें असतां दुर्गांतच येण्याचें कां टाळतां ? "

" प्रभु ! दुर्गरक्षणार्थ आपल्या आज्ञेसरशी मी आलों आणि जर आपली इच्छा असेल, तर दुर्गांत प्रवेश करण्याची माझी ना नाहीं. नाहीं तर...... "

" तर मग दुर्गांत येण्याची मी आपणांस आज्ञा करतो. जर रघुसिंहाच्या पोटीं पुत्रसंतान असतें, तर हल्लींचा हा आपसांतील वाद कदाचित् मिटला नसता ! परंतु कमलसिंह, रघुसिंहाची निराधार विधवा व त्याची कुमारी कन्या यांना आपणांविषयीं वैरभाव बाळगण्याचें मुळींच

कारण नाहीं–नव्हे तितकी त्यांच्या अंगी ताकदही नाहीं. आपणासारख्या क्षत्रियांना हें वर्तन शोभत नाहीं. कमलसिंह ! आपण एक वीर पुरुष आहांत आणि क्षत्रिय वंशांत आपण जन्म घेतलेला आहे. म्हणून आपल्या तोंडी असले अनुचित शब्द शोभत नाहींत. आपण एक अनाथ विधवेच्या रक्षणासाठीं येथें आला आहांत आणि भविष्य काळही त्यांच्या रक्षणाचा भार आपणालाच घ्यावा लागणार आहे ही गोष्ट लक्षांत ठेवा व क्षत्रिय-धर्मापासुन विन्मुख होऊं नका. "

लज्जेनें मस्तक अवनत करून कमलसिंह दरवाजापाशी येऊन उभा राहिला. गोपाळदेव यावेळीं अगदीं चिंतेंत चूर होऊन गेला होता. त्याचें सर्व शरीर जखमांनीं भरून गेलें होतें, आणि त्याच्या चिलखतांत जागो-जागीं तुटलेलें तीर घुसलेलें दिसत होते. कमलसिंह विस्मयचकित होऊन एकाग्र दृष्टीनें त्याच्याकडे पहात राहिला. कित्येक क्षणानंतर अस्फुट स्वरांत त्यानें संन्याशाला विचारले, " प्रभु ! हे कोण ?"

कांहींसा लज्जित होऊन संन्याशी म्हणाला, " कमलसिंह ! नाना-प्रकारच्या चिंतेंत व्यग्र असल्यामुळें यांच्याशी आपली ओळख करून द्याव-यास मी विसरलों. हें वरेंद्रमंडळाचें अधीश्वर गोपाळदेव !"

" प्रभु ! आणखी अधिक परिचयाची जरूरी नाहीं. बाळपणीं उद्धारणपुरांत महाराजांना मी अनेकदा पाहिलेलें आहे. "

" पण मी तर आपणांस ओळखलें नाहीं. " गोपाळदेव म्हणाला.

" मीं उद्धारणपुराधिपति कमलसिंह. स्वर्गस्थ पुरुषोत्तमसिंहाचा पुत्र. " कमलसिंह आपली ओळख करून म्हणाला.

" काय, आपण पुरुषोत्तमसिंहाचें पुत्र ? "

इतक्यांत स्वामी आनंदानंद तेथें येऊन म्हणाला. " प्रभु ! धर्मपाळ देव नक्की जिवंत असले पाहिजेत. मृत सैनिकांच्या राशींत त्यांचा देह सांपडला नाहीं."

संन्यासी मध्येंच म्हणाला, " धर्मपाळदेवाच्या मृत्यूला अजून पुष्कळ वर्षें अवधि आहे. पण त्यांच्या मृत देहाचा तपास करावयास आपणांला कोणी सांगितलें ? "

" गोपाळदेवांना चिंतातुर पाहून मी आपण होऊनच युवराजांचा शोध चालविला होता."

गोपाळदेव म्हणाला, " प्रभु ! मीहि त्याच्या मृत देहाचा शोध करण्याच्या उद्देशानेंच येथे आलों होतों; आणि मघा हें मी आपणांलाहि सांगितलें."

" आपणांला अत्यंत व्याकुळ झालेले पाहून मीं आपणांला अडकाठी केली नाहीं इतकेंच ! पण गोपाळदेव ! माझें भविष्य कदापिहि मिथ्या व्हावयाचें नाहीं. धर्मपाळदेवाच्या मृत्यूला अद्यापि पुष्कळ अवधि आहे."

इतक्यांत उद्धवघोष घाईघाईनें दुर्गांतून बाहेर येऊन संन्याशाला म्हणाला, " प्रभु ! धर्मपाळदेवांचा पत्ता लागला आहे. महाराज्ञी आपणांला बोलावीत आहेत."

हें ऐकून सर्वजण दुर्गांत आले. संन्याशानें मागें वळून पाहिले तो कमळसिंह मान खालीं घालून मुकाटयानें आपल्या मागोमाग येत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें. गोकर्णदुर्गांत भस्मीभूत अंतःपुराच्या निखाऱ्याजवळ दुर्गस्वामिनी त्यांची वाट पाहत होती. दुरून संन्याशाला येत असलेलें पाहून ती उठून उभी राहिली. संन्याशानें लांबूनच तिला प्रश्न केला, " बेटा ! युवराज धर्मपाळदेवाचा पत्ता तुला लागला आहे काय ? युद्ध समाप्त झाल्यावर पुत्र कोठें न दिसल्यामुळें गोपाळदेव अत्यंत व्याकुळ झालेले आहेत."

दुर्गस्वामिनीनें कांहींसें लज्जित होऊन उद्धवघोषाला म्हटलें,"उद्धव! प्रभुंना कळवा कीं युद्धाच्या वेळीं अंतःपुराच्या रक्षणाचा भार युवराजांवर सोंपविण्यांत आलेला होता. युद्धांत ते मारले गेलेले नाहींत. ज्या वेळीं नारायण घोषाच्या सेनेनें किल्ला काबीज केला, तेव्हां मीच त्यांच्या हातीं कल्याणीच्या रक्षणाचा भार सोंपविला. माझ्या विनंतीला मान देऊन नारायण घोषाची फौज किल्ल्यांत शिरतांच व अंतःपुराच्या दिशेकडे त्यांचा मोर्चा वळतांच युवराज मूर्च्छित कल्याणीला खांद्यावर घेऊन किल्ल्याच्या दक्षिण दिंडींतून खंदक ओलांडून निघून गेले."

हें ऐकून संन्यासी म्हणाला, " गोपाळदेव ! पुत्राची आपण किंचि-त्‌हि चिंता करूं नका. मी त्याचा चोंहीकडे शोध करवितों. आनंदानंद ! दुर्गाच्या दक्षिण बाजूला कोणाला तरी तेथें माणसाचीं पावलें उमटलेलीं दिसतात कीं नाहीं तें पहावयास पाठवा; आणि त्याला तपासहि करावयास सांगा."

दुर्गस्वामिनी उद्धवघोषाकडे वळून म्हणाली, " प्रभूला सांगा कीं, केशव आणि दुसरे एक दोन बृद्ध सैनिक खंदकाच्या पलीकडे दोन तीन अश्व सज्ज करून वाट पहात उभे होते."

संन्याशानें विचारलें, " बेटा ! खंदकाच्या पलीकडे अश्व सज्ज करून ठेवण्याचें कारण ?"

" प्रभू ! जर का दुर्गाचें रक्षण झालें नसतें, तर कल्याणीला केशवा-बरोबर गोवर्धन मठांत पाठविण्याचा बेत मीं योजून ठेविला होता."

" आणि तूं स्वत:विषयीं काय करण्याचें ठरविलें होतेस ?" कुतूह-लानें संन्याशानें प्रश्न केला.

" मी कोठें जाणार प्रभु ? श्वशुरगृहाचा-पतिगृहाचा-त्याग माझ्यानें कसा करवला असता ? "

" बेटा ! हें तुझें म्हणणें वीरपत्नीला साजेसेंच आहे. पण इतर स्त्रियांची वाट काय झाली असती ? तुझ्या मृत्यूनें गोकर्णदुर्गाचें रक्षण झालें असतें काय ? "

" पिताजी ! एक सामान्य स्त्री ! तेव्हां या बाबतींत आणखी अधिक तें मी करूं शकलें असतें ? "

" बेटा ! या विषयावर तुझ्याशी मी अधिक वाद करूं इच्छित नाहीं आज तुझ्या घरीं एक नवीन पाहुणे आलेले आहेत. उद्धारणपूरचे दुर्गाधि पति कमलसिंह तुझ्या रक्षणार्थ ससैन्य आलेले आहेत. ऐन वेळी ते मदतीला येऊन पोहोंचलें, म्हणूनच आज आमचें रक्षण झालें. जर तें न येतें, तर नारायण घोषाच्या सैन्यानें आमच्यापैकीं एकालाहि जिवंत सोडलें नसतें."

" पिताजी ! आपले पूर्वपरंपरागत वैमनस्य पुरुषोत्तमसिंहाचें पुत्र आतां विसरून गेले असतील असा मला भरंवसा वाटत आहे. माझी

आजची ही विपन्नावस्था पाहून त्यानीं आपल्या मनांतला वैरभाव दूर सारावा हेंच उचित ! आतां आमच्या घरांत कोणीहि पुरुष शिल्लक राहिलेला नाहीं. तेव्हां गोकर्णदुर्ग त्यांचाच आहे."

संन्याशानें मागें वळून हांक मारली, " कमलसिंह !"

कमलसिंहानें हळूहळू पुढें होऊन विधवेला प्रमाम केला. रघूसिंहाच्या विधवा राणीनें त्याच्या मस्तकावर हात ठेऊन त्यास शुभाशिर्वाद दिला. त्या वेळीं नदीकिनाऱ्यावर एक भयंकर चिता धडधड पेटत होती. असंख्य नरनारीगणाच्या हृदयभेदी आर्तनादानें पाषाणालाहि पाझर फुटला असता !

गोपाळदेव, कमलसिंह, संन्याशी आणि उद्धवघोष हळूहळू दुर्गाबाहेर येऊन उभे राहिले. संन्याशाने प्रश्न केला, " गोपाळदेव ! काय पाहतां ? "

" नरदेहाचा परिणाम, प्रभु !"

" आणखी कांहीं नाहीं ना ?"

" आणखी काय पहाणार प्रभु !"

" मात्स्यन्याय...अराजकतेचें दुसरें प्रकरण. "

" कोठें ?"

" कां बरें ? जेथें नजर फेकाल तेथें दुर्गाचें आंत-बाहेर-सर्वत्र-जेथें जेथें म्हणून आपली नजर वळेल त्या त्या ठिकाणीं. "

" सत्य आहे प्रभु ! पण याला कांहीं उपाय नाहीं कां ?"

" आहे, अवश्य आहे परमेश्वर जेव्हां एखादी व्याधि उत्पन्न करीत असतो, तेव्हां तिच्या निदानाविषयींहि तो काळजी घेत असतो. "

" असे तें निदान तरी कोणते ?"

" तें निदान म्हणजे खुद्द आपणच !"

" म्हणजे ? आपल्या म्हणण्याचा भावार्थ तरी काय ?"

" माझ्या सांगण्याचा आशय अगदीं स्पष्ट आहे. आपल्याशिवाय गौड देशांत यावर अन्य उपाय नाहीं-"

संन्याशाचें हें वाक्य पुरें होण्यापूर्वीच एका सैनिकानें तेथें येऊन त्याला प्रणाम करून म्हटलें,-

" प्रभु ! दुर्गाच्या दक्षिण दिशेस खंदकाजवळ हें चिलखत आणि शिरस्त्राण पडलेले आढळले. त्याचप्रमाणें त्या बाजूला घोड्यांची पावलेंहि दूरवर उमटलेली दिसतात. परंतु यावेळीं त्या ठिकाणीं अश्व किंवा कोणी माणूस असलेला दिसत नाहीं, "

" हे तर धर्मपाळदेवाचेंच चिलखत. गोपाळदेव ! आतां तुम्ही आपल्या मनांतील दुश्चिंता काढून टाका. युवराज खुशाल आहेत. आनंदानंद ! "

" काय आज्ञा आहे प्रभु ? " आनंदानंदानें विचारले.

" चार घोडेस्वार बरोबर घेऊन तुम्ही युवराज धर्मपाळदेव आणि कल्याणीदेवीच्या शोधार्थ आत्ताच्या आत्ता येथून निघा. "

प्रणाम करून आनंदानंदानें तेथून प्रयाण केले.

● ●

## ६

महानंदा नदीच्या काठीं गौड नगराजवळच एका पुरातन पिंपळाच्या वृक्षाच्या छायेखालीं बसून एक ब्राह्मण एकाग्र चित्तानें नदीच्या जलप्रवाहाकडे एकसारखा पहात होता. या वेळीं दिवसाचा दुसरा प्रहर चालला होता. सूर्याचें प्रखर किरण त्या पिंपळाच्या वृक्षाच्या भरगच्च डहाळ्यांतून आणि पानांतून शिरून छायेला क्षतविक्षत करीत होते,

हें स्थळ अगदीं निर्जन होतें. जवळपास कोठेंहि वस्ती नव्हती. वृक्षानजीकच एक शिवालय होतें. तें नवीनच बांधण्यांत आलेले आहे असे दिसे. तथापि खरें पाहिलें तर ते फार जुन्या काळचें होते. मात्र नुकतेंच कोणी तरी त्याची डागडुजी केलेली होती. प्रथम या मंदिराच्या चारी बाजूंना विटांची एक भिंत होती. पण ती आतां जागोजागी पडली होती.

ज्या व्यक्तीनें या मंदिराचा पुनरुद्धार केला, तिनें ही भिंत परत बांधण्याची काळजी घेतल्याचें दिसत नव्हतें. पिंपळाचा वृक्ष त्या पडक्या

भिंतीच्या आवारांतच आलेला होता; आणि त्याच्या डहाळ्यांचा फार मोठा विस्तार झाला होता. या वृक्षाच्या मुळांत कांहीं शिवलिंगें होती.

मंदिरांतून एका स्त्रीनें ब्राह्मणाला हांक मारून म्हटलें, "महाराज ! उशीर किती तरी झाला. आपण पूजा कधीं करणार ?"

तोंड वळविल्याशिवायच ब्राह्मणानें उत्तर दिलें, "कां आज फारशी घाई ?"

स्त्री पुन: म्हणाली, "आपणांला आज जेवणखाण करायचे नाहीं वाटतं ? रोज या वेळेला तर अगदीं भंडावून सोडीत होतां."

"पण आज तर एकादशी आहे."

"वारे ज्ञान ! राजाला देशांत दुसरा कोणी ब्राह्मण मिळाला नाहीं म्हणून तुम्हांला या मंदिराचे पुजारी बनविलें आहे झालें ! आज आहे तृतीया अन् म्हणे एकादशी !"

असें म्हणत म्हणत ती स्त्री ब्राह्मणापाशीं आली. ब्राह्मण तिच्या तोंडा कडे पाहून किंचित् हंसला आणि म्हणाला, "कां मालती ! रागावून भांडावयास आली होय ? पूर्वीं महिन्यांतून दोनदांच एकादशी येत होती; परंतु आतां एकादशींची संख्या बरीच फुगलेली आहे."

"ती कशी ? आपल्याला पोटदुखीचा विकार जडला कीं काय ?"

"पोटदुखीचा विकार मला ग कशाला जडेल ? लबाड कुठची ! तुझें मात्र काळीज व्यथित झालेलें दिसतें."

तो ब्राह्मण पुन: बोलूं लागला, "हें पहा मालती ! तूं माझी रामायणांतील शकुंतला आहेस. जेव्हां जेव्हां मी तुला मंदिरांत पाहतों, तेव्हां तेव्हां वाटतें कीं, पित्याचें वचन पाळण्यासाठीं तुला घेऊन मी या वनांत आलों आहें."

ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून त्या स्त्रीला हंसूं कोसळलें. ती म्हणाली, "महाराज ! हें रामायण आपण कोठें बरें शिकलांत ?"

"कां बरें ? गुरुपाशीं ! पंधरा वर्षें सतत अभ्यास करुन शिफारस-पत्र मिळविलेलें आहे मी !"

"गुरूपाशीं कां ? पण असले गुरु तरी आपणांला कोठें सांपडले ?"

" फार दूर, यमुनेच्या तटापाशीं असलेल्या कैलास पर्वतावर ! शकुंतले ! एखाद्या दिवशीं दुर्योधन येऊन तुझें हरण करील असें मला भय वाटतें."

ब्राह्मणाच्या तोंडचें हें शब्द ऐकतांच त्या स्त्रीची हंसून हंसून मुरकुंडीच वळली. त्यामुळें उलट त्या ब्राह्मणाचा उत्साह द्विगुणित होऊन आणखीहि कित्येक अगाध ज्ञानाचा गोष्टीं त्यानें सांगून टाकण्याचा सपाटा चालविला. तेव्हां ती स्त्री राग आल्याचें दर्शवून म्हणाली, "हें पहा महाराज! बोलण्याच्या भरांत तुम्ही आतां भलतीकडेच वहात चालत आहात—मला एकटीला येथे पाहून तुम्ही वाईटसाईट गोष्टींहि भकतां आहां; थांबा, मी हें सारें आतां राणीसाहेबांच्या कानांवर घालतें."

" नको, नको, मालती ! राणीसाहेबांना हें सांगूं नकोस. जर सांगशील तर तुला ब्रह्महत्येचें पातक लागेल. कारण भयानें मी मृत्युमुखींच पडेन."

" ठीक, तर मग आतां शपथ वहा कीं, मी पुन: असें बोलणार नाहीं."

" काय बोलणार नाहीं ? "

" आतां विचित्र बोलत होतां तसें."

" कसें ? "

" निर्लज्जपणानें."

" पण असा निर्लज्जपणा तरी कोणता ?"

" माझ्या नशीबाचा. पण आतां पूजा करायला यायचें आहे कीं नाहीं ? "

" इतकी घाई कां तुला ? पहा तर खरें, ही नदी कशी कलकल निनाद करीत वहात आहे."

" आणि तेंच पाहात राहून आपलें पोट भरणार आहे वाटतं ? पण तुम्हीच तें बसल्या बसल्या पहात रहा. ही मी घरीं चालल्यें ! मंदिरांत पूजेचें सगळें साहित्य तयार करून ठेविलें आहे. तुमच्या मनाला येईल तेव्हां पूजा करा."

इतकें म्हणून उतावळीने ती स्त्री तेथून निघून गेली. ब्राह्मणानें निराश होऊन तिला हांका मारण्याचा सपाटा चालविला.

" मालती ! अग शकुंतले ! जाऊं नकोस, जाऊं नकोस. मागें फीर मालती !"

परंतु त्या स्त्रीनें एकदांहि मागें पाहिले नाहीं. तेव्हां ब्राह्मण एक दीर्घ निश्वास सोडून म्हणाला, " ठीक तर मग. जा; पण उद्यां परत यावें लागणारच !"

इतकें म्हणून तो ब्राह्मण तोंड फिरवून नदीचा जलप्रवाहाकडे पाहात बसला. याप्रमाणें अर्धीएक घटका लोटली असेल नसेल, इतक्यांत दुरून कोणीसे घाबऱ्या घाबऱ्या म्हटलें, " महाराज ! ऊठा, पळा. दरोडेखोर येत आहेत. अरे इकडे कोणी आहे कां ? –धांवा–धांवा ! "

ब्राम्हण भयचकित होऊन उठून उभा राहिला आणि पाहतों तों मालती धापा टाकीत त्याच बाजूला धांवत येत आहे. तेव्हां तो क्षणाचाहि विलंब न करतां त्या पिंपळाच्या झाडावर चढून दडून राहिला. मालती त्या जागीं येऊन पहातें तो ब्राम्हण दिसेना; तेव्हां ती देवालयांत शिरून तिनें देवालयाचें द्वार आंतून बंद केलें. झाडांच्या डहाळ्याकडे ब्राम्हण पाहूं लागला. तों दुरून एक घोडेस्वार विद्युत् वेगाने त्याच देवालयाच्या बाजूला येत असलेला त्याच्या नजरेस पडला. हें पाहून तो भयचकित होऊन त्या वृक्षाच्या आणखीहि वरवरच्या डहाळ्यांवर चढून बसला.

घोडेस्वार देवालयापाशीं येतांच तेथें कोणीहि माणूस नजरेस न पड-ल्याकारणानें भारी आश्चर्यचकित झाला. मंदिराच्या चारी बाजूंस येर-झाऱ्या घातल्यावर तो द्वारासन्मुख येऊन घोड्यावरून खालीं उतरला. आणि बंद असलेल्या द्वारावर जोरजोरानें ठोठावूं लागला. तो आवाज ऐकतांच मंदिरांत दडून बसलेली स्त्री मोठमोठ्यानें रडूं लागली. तेव्हां ती आगंतुक व्यक्ति म्हणाली, " तुम्हांला भय बाळगण्याचें प्रयोजन नाहीं. मी शत्रू नाहीं, गौड नगरचाच एक माणूस आहे. "

परंतु त्याच्या बोलण्यावर विश्वास न ठेवतां ती स्त्री जास्तच मोठ-मोठ्यानें रडावयास लागली. हें पाहून निराश होऊन तो स्वार त्या

वृक्षाच्च्या खालीं छायेत जाऊन बसला, चौफेर पहातां पहातां झाडावर कोणी तरी माणूस छपून राहिलेले आहे, असा त्यास बळकट संशय आला. तेव्हां तो झाडाखालीं उभा राहून त्या ब्राह्मणाकडे वर पाहून म्हणाला, " कोण रे तूं ?"

भयभीत झालेल्या ब्राम्हणानें कांहींच उत्तर दिले नाहीं. तेव्हां आगंतुकानें पुनः दरडावून विचारले, " तूं झाडावर चढून काय करीत आहेस ? लवकर बोल. "

तरी पण ब्राम्हण स्तब्धच ! तेव्हां आगंतुकाला भारी क्रोध येऊन त्यानें आपल्या पाठीवरचा धनुष्यबाण हातांत घेऊन म्हटले, " आतां जर तूं बोलणार नाहींस, तर या बाणाने तुझें मस्तकच धडापासून वेगळे करतो, थांब. "

धनुष्यबाण पहातांच ब्राम्हणाची मोठी तिरपीट उडाली. तो लटलटा कांपूं लागला आणि रडक्या सुरांत अडखळत अडखळत म्हणाला, " मी दुसरा कोणी नाहीं महाराज ! मी–मी–तर–"

आगंतुकानें कर्कश स्वरांत विचारले, " कोण तूं ?"

ब्राम्हण कांहीं बोलेना; तेव्हां आगंतुकाने धनुष्याला बाण लावला. तें पाहून ब्राम्हण भयविव्हल होऊन म्हणाला, " सांगतो महाराज, सांगतों; पण मला मारूं नका. मी ब्राम्हण आहे. "

तीव्र स्वरांत आगंतुक म्हणाला, " तर मग अगोदर खालीं ये पाहूं. "

पुढें कसें करावें याचा पेंच पडून ब्राह्मण डहाळयांवर बसल्या बसल्या थरथरा कांपूं लागला. आतां आपण नक्की खालीं पडून मरणार अशी त्यास धास्ती वाटूं लागली. त्याची उडालेली त्रेधा पाहून आगंतुक म्हणाला, " तुझे मरण जवळ आलेले दिसतें. हें पाहिलेस का माझ्या हातांत काय आहे तें ?"

ब्राह्मण भयानें रडूं लागला व म्हणाला, " महाराज ! मला मारूं नका हो. तुम्हांला देवाची शपथ आहे. या आंगावरील वस्त्रांशिवाय माझ्यापाशीं दुसरें कांहीं सांपडावयाचें नाहीं. मी तुमच्या पाया पडतों; पण मला मारूं नका. "

आगंतुकाला त्याचें हें बोलणें ऐकन हंसू कोसळलें, पण तें आंतल्या-आंत दाबून तो म्हणाला, " लौकर खालीं उतर–नाहींतर–"

भयभीत होऊन ब्राह्मण झाडावरून खालीं उतरूं लागला; आणि उतरतां उतरतां म्हणाला, " नको, नको महाराज ! त्याची कांहीं गरज नाहीं. मी हा पहा खालीं येतों, "

थोडेसें खालीं उतरल्यावर ब्राह्मण पुन: म्हणाला, " आणखीहि खाली उतरूं म्हणतां ? "

आगंतुक क्रोधानें म्हणाला, " थांब, आतां तुला खालीं उतरावेंच लागणार नाहीं. मीच तुला खालीं उतरवितों. "

इतकें बोलून त्यानें पुन: धनुष्यास बाण लावला. त्यासरशीं भयानें ब्राह्मणाचा पाय निसटला व तो धाडकन् जमिनीवर कोसळला. कांहीं वेळ–पर्यंत तर तो प्रेतासारखा पडूनच राहिला.

आगंतुकानें ब्राह्मणाजवळ येऊन म्हटलें, " महाराज ! कांहीं फारशी दुखापत झाली नाहीं ना ?"

ब्राह्मण यावर कांहींहि बोलला नाहीं. आगंतुकानें त्याचें शरीर तपासून पाहिलें, तेव्हां त्याला कांहीं विशेषसा मार बसलेला नाहीं असें त्याला आढळून आलें. परंतु भयामुळें ब्राह्मण निपचित पडलेला आहे हें त्याच्या लक्षांत आलें. आगंतुक त्याचें शरीर तपाशीत असतां किलकिले डोळे करून ब्राह्मणानें एकवार सभोंवार पाहिलें आणि पुन: ते घट्ट मिटून घेतले. ते पाहून आगंतुक म्हणाला, " महाराज ! घाबरूं नका असे. नीट डोळे उघडून माझ्याकडे पहा, मी नंदकुमार आहे."

तरीहि ब्राह्मण कांहीं हालचाल करीना किंवा बोलेना; तेव्हां त्याची भीति अद्यापि दूर झालेली नाहीं असें जाणून आगंतुकानें त्याला खूप जोर–जोरानें हालवीत म्हटलें, " अहो शिवशंकर महाराज ! मला ओळखलें नाहीं का आपण ? "

ब्राह्मणानें त्याच्याकडे पाहत म्हटलें, " नाहीं, मी तुम्हांला ओळखलें नाहीं. "

" वा: महाराज ! असें कसें म्हणतां ? कित्येक भोजनांच्या प्रसंगीं आपण माझी उपासमार केलेली आहे हें विसरलांत वाटतें इतक्यांत ? "

" तो मी नव्हे महाराज—दुसरा कोणी तरी असेल. "

' मग तुम्ही शिवशंकर महाराज नाहीं म्हणतां ? "

" नाहीं, नाहीं, माझ्या कुळांत चौदा पिढ्यांत शिवशंकर या नांवाचा कोणीहि झाला नाहीं. मला जाऊं द्या येथून, महाराज. माझ्यापाशीं एक कपर्दिकाहि नाहीं या वेळेला."

" महाराज ! तुम्हांला मी दिसत नाहीं का ? मी नंदकुमार—कौशांबी मंडळाचा नायक आहे. आतां तरी मला ओळखलेंत कीं नाहीं तें सांगा पाहूं."

" होय तर—अगदीं बरोबर ओळखले महाराज. या एका वर्षांत तुमच्यासारखें थोडथोडकें नव्हे, तर चांगले दहावीस हजार पाहून चुकलों. आतां आणखी पहावयाची नाहीं मला इच्छा. एकदां कामरूपांतून आलांत व दुसऱ्या खेपेला गुर्जर देशांतून मोर्चा वळविलांत इकडे; आणि आज पुन: द्रविड देशांतून फिरकलांत वाटतें ? मला जाऊं द्या महाराज, तुम्हांला शपथ आहे या गरीब ब्राह्मणाची. खरेंच माझ्यापाशीं कांहीं नाहीं हो !"

" ठीक, जा तर मग तुम्ही. उठा, नीट उभे रहा."

ब्राह्मण उभा राहून आपल्या वस्त्रांवरील धूळ झाडीत म्हणाला, " तुमचें मंगल होवो महाराज ! बरें, येतो आतां, नमस्कार ! दया लोभ ठेवा बरें ! "

आगंतुकानें हंसून विचारलें, " कोठें जाणार आहांत आतां आपण?"

ब्राह्मण सूं बाल्या करण्याच्या विचारांत होता; इतक्यांत नंदकुमाराचा हा प्रश्न ऐकून तो मागें वळला आणि अत्यंत दीनवाणीनें म्हणाला, " इतकें सांगितल्यावर मग मला जाऊं द्यालना निमुटपणें ? "

" पण थोडा वेळ थांबलां तर ? आज इतक्या वर्षांनीं आपली गांठ पडलेली आहे, तेव्हां बसूं घटकाभर सुखदु:खाच्या गोष्टी बोलत. "

ब्राह्मण विषण्णवदनानें उभा राहिला. नंदकुमार त्याची ही मन:स्थिति पाहून खो खो हंसूं लागला. तो म्हणाला, " महाराज, अद्यापि जेवणखाण झाले नाहीं वाटतें आपलें ? "

मानेनेंच 'नाहीं' असें ब्राह्मणानें दर्शविलें. तेव्हां नंदकुमार म्हणाला,

" तर मग आज माझ्या घरीं जेवणाचें मी आपणांला आमंत्रण देतों. आज मी तुम्हांला उत्तम भोजन घालीन बरें का ! "

ब्राह्मणाच्यानें आतां रहावेना; तो अगदीं रणकुंडीस आला आणि म्हणाला, " नको, नको. मला तें तुमचें आमंत्रण नको; मला आपले निमूटपणें येथून जाऊं द्या. "

नंदकुमारानें त्याला धीर देण्याचा खूप प्रयत्न केला; परंतु ब्राह्मण कांहीं केल्या ऐकेना.

मंदिरांतून मालती या दोघांचें संभाषण लक्षपूर्वक ऐकत होती. वारंवार नंदकुमाराचे नांव ऐकून ती खिडकींत येऊन उभी राहिली. गौडराज्यांतील नंदकुमार हा एक विश्वासू सेनापती आहे हें तिला माहीत होतें. आगंतुकाला खिडकीवाटे पाहतांच तो नंदकुमारच अशीं तिची खात्री झाली. तेव्हां ती झट्‌दिशी मंदिराचें दार उघडून बाहेर आली व ब्राह्मणाला म्हणाली, " महाराज ! भिऊं नका. खरोखरच हें नंदकुमार आहेत. "

डोळे चोळचोळून ब्राह्मणानें नीट निरखून पाहिल्यावर म्हटलें, " अरेच्या ! हे तर नंदकुमारच ! "

मंदहास्य करून नंदकुमार उद्‌गारला, " कां महाराज ! आतां तरी ओळख पटली कां आपल्याला माझी ? हो, पण महाराज सध्यां कोठें आहेत ? "

" तें तुम्हांला माहीत. आम्हांला कसे कळणार ? "

" अजून ते परत आले नाहींत कां ? "

" ते परत येतें तर मग आणखी काय पाहिजे होते ? गौडची सारी प्रजा मग आनंदसागरांत बुडून गेली असती. "

" महाराज मृत्यू पावलेले नसून जिवंत आहेत. "

मालती मध्येंच म्हणाली, " आँ ! काय बोलतां ? जहाजावरचें बचावलेले नावाडी येथें येऊन सांगत होतें कीं, जबरदस्त वादळांत जहाज सांपडून तें महाराज आणि युवराजांसह भर समुद्रांत बुडालें. "

" होय, ही गोष्ट खरी आहे. परंतु देवदयेनें दोघांचाहि बचाव झालेला आहे. एका व्यापारी नौकेनें आम्हां तिघांनाहि वांचवून सप्तग्राम

बंदरांत आणून सोडले. पुढें खुष्कीच्या मार्गानें इकडे यावयास आम्ही निघालों होतो; पण वाटेंत त्यांची व माझी चुकामुक झाली. मी नंतर त्यांचा पुष्कळ शोध केला, पण कांहीं पत्ता लागला नाहीं."

"तर मग महाराज आणि युवराज जिवंत आहेत म्हणतां ?"

"होय."

"नंदकुमार ! मग इतक्यांतच विश्रांति न घेतां अगोदर ही आनंद-दायक बातमी तुम्हांला राणीसरकारच्या कानांवर घातली पाहिजे."

तिघांनींहि नंतर नगराचा मार्ग धरला. त्या दिवशीं शंकराची पजा करण्याचें तसेंच राहून गेलें.

●●

## ७

गौड नगराच्या मुख्य राजमार्गावरून दिवसाच्या तिसऱ्या प्रहरीं राजपुरोहित शिवशंकरशर्मा घाईघाईनें जात असलेला पाहून नगरवासी-जनांना फार आश्चर्य वाटलें. त्यांच्या मागोमागच राजवाड्यांतील दासीहि थांवत जात आहे हें पाहून त्यांना थोडें भयहि वाटलें. एकदोघां वाण्यांनीं तर घाबरून आपल्या घराची दारें गच्च लावून घेतली. कांहीं नागरिक घराच्या दारांना कड्याकुलुपें लावून आपापल्या परिवाराच्या रक्षणार्थ शस्त्रास्त्रें घेऊन सज्ज राहिले. कित्येकांनीं शिवशंकरशर्म्यांना अत्याग्रहपूर्वक विचारलें, " महाराज ! या वेळीं घाईघाईनें चाललांत कोठें ? काय नवल विशेष ? "

धामाधूम झालेली राजपुरोहिताची स्वारी या वेळीं राजवाड्याकडे अत्यंत त्वरेनें जाण्याच्या घाईत होती. म्हणून नागरिकांच्या प्रश्नांना उत्तर देण्याची इच्छा असूनहि तो थांबत नव्हता. धांवण्याच्या श्रमानें त्याचा श्वासोच्छ्वास खूप जोरजोरानें चालला होता. त्याच्या मागून सर्वांग धुळीनें भरलेला असा एक घोडेस्वार एका क्षीण आणि थकून गेलेल्या अश्वाची लगाम हातांत धरून हळूहळू येत असलेला पाहून तर गौडवासीयांना

भारीच भय वाटूं लागलं. प्रथम तर तो कोणीं तरी लुटारू असावा, अशीच सर्वांची समजूत झाली. त्यामुळें नागरिकांत मोठीं खळबळ उडाली. रस्त्यावर उभ्या असलेल्या लोकांत पळापळ सुरू झाली. कित्येक हत्यारें घेऊन आपल्या बायकामुलांचें व घरादारांचे रक्षण करावयास तयार झालें; आणि कित्येक आपले दागदागिनें व द्रव्य लपवून ठेवण्याच्या तयारीस लागले. या गडबडींत एकदोघां वृद्धांनीं हिय्या करून घोडेस्वाराला विचारले, " आपण कोण ? कोठून आलांत ?"

घोडेस्वारानें उत्तर दिले, " मी गौडचाच रहिवासी असून या वेळेला सप्तग्रामाहून आलेलों आहे. तुम्हांला भिण्याचें कोणत्याहि प्रकारें कारण नाहीं. " परंतु त्यामुळें गडबड शांत न होता उलट अधिकच वाढत चालली.

राजपुरोहित शिवशंकरशर्म्याला उतावळीनें जात असलेला पाहून एका तांबोळयाने त्याला म्हटले, " महाराज ! आज एवढया घाईघाईनें कुठें निघाली आहे आपली स्वारी ? ".

त्याचा हा प्रश्न ऐकून ब्राम्हण मोठया संकटांत पडला. सर्वांच्या आधीं हा शुभसमाचार आपण राणीसरकारच्या कानांवर घालावा. या उद्देशानें तो यावेळीं घाईघाईनें राजवाडयाकडे निघाला होता. हा शुभसमाचार ऐकून राणी आपणाला फार मोठे बक्षीस व लाडवाचें भोजन देईल असे त्याला वाटत होतें. एवढयासाठीं तो शेंकडो नागरिकांनीं विचारलेल्या प्रश्नांकडे दुर्लक्ष करून धापा टाकीतच राजवाडयाकडे त्वरेनें निघाला होता. पण आतां त्याला थांबून प्रत्युत्तर देणें भाग होतें. कारण या तांबोळयाचा आणि त्याचा फार जुना स्नेह होता; आणि बिनपैशानें त्याला येथें दररोज पान खावयास मिळत होते. म्हणून तो थबकून तांबोळयाकडे पाहूं लागला. हें पाहून तांबोळयानें पुनः प्रश्न केला, " महाराज ! इतक्या घाईघाईनें कुठें निघालांत ?"

" राजवाडयांत राणीसरकारांना खबर द्यावयास. "

" कसली खबर ? आम्हाला सांगाल की नाहीं ? "

" फारच शुभसमाचार आहे. आपण उत्तम दोन पानाच्या पट्टया करून ठेवा. सर्वाआधीं हा शुभसमाचार मी राणीसरकारच्या कानांवर घालणार असल्यामुळें आज माझी चंगळ उडणार आहे. "

" फार चांगलें ! पानाचे विडे मी तयार करून ठेवतों म्हणा; पण समाचार तर ऐकूं द्या काय तो ? "

" फारच शुभसमाचार आहे. फारच शुभ ! महाराज जिवंत आहेत."

" आँ ! काय म्हणता ? कुणीं सांगितले हें तुम्हाला ? "

" सेनापती नंदकुमारांनीं. ते नुकतेच आले आहेत."

ब्राह्मण अधिक वेळ न थांबतां राजवाड्याकडे जावयास निघाला. तांबोळ्यानें हर्षातिशयानें ताडकन् दुकानाबाहेर उडी घेतली व राजमार्गावर येऊन तो उच्च स्वरांत गरजला, " जय ! महाराजाधिराजांचा जय! "

तो जयध्वनि ऐकतांच अल्पावधींत असंख्य स्त्रीपुरुषांचा त्याच्या सभोंवती घोळका जमला; आणि त्याला सर्वजण विचारूं लागले, " हरिदास ! काय आहे रे बातमी ? "

हरिदास उच्च स्वरानें म्हणाला, " जय ! महाराजाधिराजांचा जय ! जय ! गोपाळदेवांचा जय ! नागरिकहो, आतां भिण्याचें मुळींच कारण नाहीं."

त्याचे हे शब्द ऐकतांच हजारों नागरिकांनीं जयध्वनीनें तो सारा प्रदेश अगदीं दणाणून सोडला. हां हां म्हणतां ही बातमी शीघ्रतेनें साऱ्या गौड नगरांत पसरली. भयग्रस्त झालेले स्त्रीपुरुष आपापल्या घरांचीं बंद केलेलीं द्वारें उघडून राजमार्गावर जमून एकच जयनिनाद करूं लागले. सर्व गौडनगर कोलाहलानें अगदीं गजबजून गेलें.

राजवाड्याच्या द्वारापाशीं येऊन शिवशंकरशर्मा पाहतो, तों द्वार बंद असून पहारेकरी विश्रांति घेत स्वस्थ पडलेले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें. विदेशीय शत्रूंच्या वारंवार होणाऱ्या हल्ल्यामुळें राजवाड्याचा दरवाचा पहारेकरी सहसा उघडा ठेवीत नसत. ब्राम्हणाने खूप मोठ्यानें दरवाजा ठोठावण्यास सुरुवात केली. तो आवाज ऐकून एका पहारेकऱ्यानें आंतून विचारलें, " कोण आहे ? "

ब्राम्हण रागावून म्हणाला, " मी आहें. जलदी दरवाजा उघड."

" पण तुम्ही कोण ? "

" कोण म्हणजे ? अरे–मी तो ! "

" नांव सांगितल्याशिवाय ओळखणार कसें ? "

" जलदी उघड दरवाजा. मी राजपुरोहित शिवशंकरशर्मा. "

" कां महाराज ! इतकी घाईशी ? थांबा. मी दरवाजा उघडतों."

" थांबायला सध्यां मला वेळ नाही. "

पहारेकऱ्यानें दरवाजा उघडला न उघडला तोंच ब्राह्मण धडपडत राजवाड्यांत घुसला. या वेळीं महाराणी बोधिसत्व लोकनाथाच्या मंदिरांत पूजा करीत होती आणि तिचा धाकटा मुलगा महाकुमार वाक्पाळ मंदिराच्या सन्मुखच छायेंत उभा होता. खोलीत राणी नाहींशी पाहून ब्राह्मण इकडेतिकडे धांदलीनें धांवपळ करूं लागला. मंदिराच्या बाहेर कुमाराला पाहून त्यानें विचारलें, " कुमार ? राणी सरकारची स्वारी कोठें आहे ? "

त्याची ही थांद्दल पाहून कुमारानें भयग्रस्त होऊन प्रश्न केला, " कां महाराज ! काय झालें आहे ? मातोश्री येथेंच आहेत. "

त्याच्या प्रश्नाला उत्तर न देतां ब्राह्मण मंदिराच्या दारांत येऊन उभा राहिला आणि राणीला पाहून एकदम मोठ्यानें म्हणाला, " राणीसरकार ! फार शुभ वार्ता आहे. महाराज जिवंत आहेत. "

त्याच्या तोंडचें हे शब्द ऐकतांच राणी लगबगीनें तशीच पूजेवरून उठून उभी राहिली व म्हणाली, " महाराज ! काय म्हणतां ?"

ब्राह्मण फार लांबून धांवत धांवतच आल्यामुळें अगदीं धांपा टाकीत होता आणि स्पष्ट शब्दोच्चारहि त्याच्यानें करवत नव्हता. तो मोठ्या कष्टानें म्हणाला, " महाराज–जिवंत–आहेत. "

" तुम्हांला कुणी सांगितलें हें ?"

" नंदकुमारानें. "

" नंदकुमार कोण ?"

यावर ब्राह्मण कांहीं उत्तर देणार तोंच मालती तीरासारखी धांवत धांवत त्या ठिकाणीं येऊन म्हणाली, " महाराजांचा विजय असो ! राणीसरकार, महाराज जिवंत आहेत. "

तिचे हे शब्द ऐकतांच शिवशंकर व्याकुलतेनें म्हणाला, " महाराणी-

साहेबांचा विजय असो ! सर्वाआधी ही बातमी मीच आपल्या कानांवर घातलेली आहे हें लक्षांत असूं द्यावें."

महाराणीनें मालतीला प्रश्न केला, " मालती तुला ही बातमी कुणीं सांगितली ?"

" मंडळाचे सेनानायक नंदकुमार यांनीं."

" नंदकुमार कोण ?"

मंदिराच्या द्वारांत कोलाहल चाललेला पाहून नोकरचाकर, राणी व राजपुरोहित यांच्या आजूबाजूला जमूं लागले होते. महाराणींचा हा प्रश्न ऐकून मागून कोणीसें उत्तर दिलें,

" नंदकुमार महाराजांचे एक सेनापति आहेत. महाराज व युवराज यांच्याबरोबर तेहि नीलाचलास निघालें होतें."

हें बोलणाऱ्या व्यक्तीचा आवाज ऐकतांच सर्वजण एका बाजूला सरकून आदराने उभे राहिले. राणीनें वळून पाहिले तों गौडराज्याचें मुख्य मंत्री गर्गदेवशर्मा उभे ! महाराज्ञीनें त्यांना प्रश्न केला, " गर्गदेव ! ही बातमी सत्य आहे काय ?"

" आपण अधीर होऊं नका. काय प्रकार आहे त्याचा मी नीट तपास करून येतो. सेनानायक नंदकुमार कोठें आहेत ?"

मालती म्हणाली, " ते मागोमाग येताहेत."

गर्गदेव राजमहालाच्या बाहेर पडला. बाहेर येतांच राजवाड्यासमोर लोकांची भारी गर्दी उडालेली असून लोक जयध्वनि करीत असलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. तीन चार पहारेकऱ्यांना बरोबर घेऊन गर्गदेव नंदकुमाराचा शोध घेऊं लागला. इतक्या वेळांत मालतीनें महाराज व युवराजांना एका व्यापारी जहाजानें बुडतांबुडतां वांचवून सप्तग्राम बंदरास आणून पोंचविल्याची व तेथून ते गौड नगरास येत असल्याची हकिकत राणीच्या कानांवर घातली. हें ऐकून राणीला कल्पनातीत आनंद झाला आणि त्या भरांत तिनें आपल्या कंठांतील एक अमूल्य रत्नहार काढून तो मालतीच्या गळ्यांत घातला. हें पाहून शिवशंकरच्यानें स्तब्ध रहावेना; तो म्हणाला, " आणि मला !"

" काय हवें आहे आपणांला ?"

" सर्वाआधीं मीच हा समाचार आपल्या कानांवर घातलेला आहे. तेव्हां मला कोणते बक्षीस देतां ?"

" कोणते देऊं बोला ?"

" सुवर्णदक्षिणा आणि लाडवाचें भोजन."

" ठीक; देईन मी आपणाला."

ब्राम्हण आतां संतोषित होऊन जमिनीवर बसला.

गोपाळदेव--गौडेश्वर जिवंत असल्याची बातमी ज्या व्यक्तीनें आणली होती; ती व्यक्ति या वेळीं अगदी हळूहळू राजमार्गावरून लोकांच्या गर्दींतून वाट काढीत काढीत राजवाड्याकडे येत होती. फार लांबचा प्रवास केल्याकारणानें व भुकेतहानेनें अगदीं व्याकुळ झाल्याकारणानें ती व्यक्ति अगदीं गलित झालेली दिसत होती व मोठ्या प्रयासानें पावलें टाकीत होती. इतक्यांत राजवाड्याकडून लोकांच्या झुंडी जयजयकार करीत त्याच दिशेकडे येताहेतसें त्या व्यक्तीला दिसून आलें. नगरवासीजन एकमेकांना विचारीत होते, " नंदकुमार कोण ? कोठें आहे ?"

त्या मनुष्याच्या गर्दीतून एकानें त्याला विचारलें, " नंदकुमार कोण व कोठें आहे ते तुम्हांला ठाऊक आहे कां ?"

विषादयुक्त स्मित करीत ती व्यक्ति म्हणाली, " का बरें ? मीच तो नंदकुमार !"

त्याबरोबर खऱ्याखोट्यांचा निर्णय केल्याविना सारेजण एकदम उद्गारले, " हे पहा नंदकुमार ! येथेंच आहेत."

विद्युत्वेगानें ही बातमी राजवाड्यांत जाऊन पोहोंचली. नंदकुमाराचा पत्ता लागला आहे असें ऐकतांच मंत्री गर्गदेव दरवाजाबाहेर आले. नगरवासीजनांनी जाण्यासाठीं त्याला वाट करून दिली. नंदकुमाराजवळ येतांच त्यानें विचारले, " आपलें नांव नंदकुमार ?"

महामंत्र्याला नंदकुमार चांगल्या प्रकारें ओळखत होता. तेव्हां त्यास प्रणाम करून तो म्हणाला, " होय मंत्रीवर !"

" महाराजांविषयीं समाचार घेऊन आपणच कां आलां आहांत ?"

" होय. तो समाचार मीच आणलेला आहे."

" महाराजांबरोबर नीलाचलाला जाण्यासाठीं म्हणून आपणही गेला होता नव्हे ? "

" होय. "

" त्यानंतर काय काय घ .लें ?"

" समुद्रांत भयंकर वादळ झाल्याकारणानें आमचे जहाज बुडाले. परंतु देवदयेनें तितक्यांत एका व्यापारी जहाजानें आम्हांला वांचविलें आणि सप्तग्राम बंदरांत आणून सोडले. "

" हा समाचार इकडे कळविण्यासाठीं महाराजांनींच आपणाला पुढें धाडून दिले काय ? "

" नाहीं. सप्तग्रामास आल्यानंतर महाराजांनीं मला एक अश्व घेऊन दिला. त्या अश्वावर बसून मी त्यांच्या मागून येत होतो. परंतु पुढें माणसांच्या गर्दीत त्यांची व माझी चुकामूक झाली ती झालीच. महाराज माझ्या अगोदर राजधानीस येऊन पोहोंचले असतील असा माझा समज झाल्याकारणानें मीहि इकडे निघून आलें. "

" महाराज कोणत्या मार्गानें यावयाचे आहेत हें त्यांनीं तुम्हांला सांगितले होतें काय ? "

" होय. ते म्हणाले होतें कीं, " राढच्या जुनाट राजमार्गानें आपण गौडाला जाऊं या. "

" ठीक. पण तुम्ही कोणत्या मार्गानें आलांत ?"

" कांहीं काळपर्यंत भागीरथीच्या पश्चिम किनाऱ्याकिनाऱ्यानेंच मी आलो; पण त्यानंतर एका व्यापाऱ्याने मला चाच्यांच्या भयानें आपल्या नौकेच्या रक्षणार्थ ठेवून घेतलें. त्याच्याच नौकेंत बसून मी राढच्या उत्तर सीमेपर्यंत आलो; आणि नंतर ोस गांवापर्यंत घोड्यावरून मजल मारली."

" वाटेनें येतां येतां महाराजांविषयीं कांहीं वर्तमान तुम्ही ऐकलें काय ?"

" नाहीं. "

" चला. तुम्ही मजबरोबर अन्तःपुरांत चला. अरे कोणी तरी या घोड्याचा लगाम धरून उभे रहा पाहूं. "

एकाच वेळीं दहापांच नागरिक झटकन् पुढे झालें आणि त्यांनीं

मंत्र्याच्या आज्ञेप्रमाणें घोड्याची लगाम धरली. नंतर गर्गदेवाबरोबर नंदकुमारानें राजमहालांत प्रवेश केला. महाराणी अद्यापिही लोकनाथाच्या मंदिरासमोर उभ्या उभ्या त्याची वाट पहात होती. गर्गदेव नंदकुमारासह त्या स्थळीं येऊन पोहोंचला. नंदकुमारानें साग्र हकिकत राणीच्या कानांवर घातली. तेव्हां आनंदित होऊन महाराणीनें त्याला आपल्या हातांतील बहुमूल्य सुवर्णकंकण पारितोषिकादायक दिलें. तें पाहून शिवशंकरशर्मा म्हणाला, " आणि मला बक्षिस ? "

गर्गदेवानें प्रश्न केला, " तुम्हांला कशाचें ? "

" सर्वांच्या अगोदर मीच ही बातमी आणलेली आहे."

" मग तुम्हांला काय पाहिजे आहे ?" राणीनें हंसत हंसत पृच्छा केली.

" नंदकुमारांना दिलेंत तसल्याच प्रकारचें हिरेजडित रत्नकंकण."

क्षणाचाही विलंब न करतां आपल्या दुसऱ्या हातांतील तशाच प्रकारचें कंकण काढून राणीनें तें त्याच्या हवालीं केलें. हें अलौकिक दातृत्व पाहून सर्वांनीं राणीच्या नांवाचा जयघोष केला. क्षणभरानें महाराणी गर्गदेवाला उद्देशून म्हणाली, " गर्गदेव ! महाराजांच्या शोधासाठीं आतां काय व्यवस्था करतां ? तुम्ही आणि वाक्पाळ या दोघांपैकीं मात्र कोणीहीं या नगरांतून जातां कामा नये."

" देवी ! भागीरथीच्या पूर्व व पश्चिम प्रांतांत, त्याचप्रमाणें जलमार्गानेंही महाराजांच्या शोधार्थ मी आतांच्या आतां माणसें पाठवितों."

इतकें म्हणून गर्गदेव तेथून निघून गेला. महाराज्ञी नंतर शिवशंकराकडे वळून हंसत हंसत म्हणाली, " भूदेव ! लाडवांचें भोजन आतां लवकरच आपणांस मिळेल, पण तोंपर्यंत कांहीं फलाहार कराल का ?"

ब्राह्मणाच्या पोटांत आधींच कावळे बोंचत होतें, तशांत तर राणीचा प्रश्न ऐकतांच त्याच्या तोंडाला पाणीच सुटलें. तो म्हणाला, " ठीक आहे. सध्यां दूध, तूप, साखर, मध एवढेंच मागवा. लाडू मग सावकाश मागाहून खातां येतील."

फलहार आणण्यासाठीं राणी अंतःपुरांत शिरतांच मालतीनें ब्राम्ह-

णाला विचारलें, " अहो, महाराज ! पण तुम्ही आज लाडू खाणार कसे ? आज तुमची एकादशी ना ? "

ब्राम्हणानें हंसून उत्तर दिलें, " शकुंतले ! आजपासून महिन्यांतून दोनदाच एकदशा येत जातील; कारण कीं, गौडेश्वर परत येताहेत."

●●

## ८

कल्याणीदेवीला खांद्यावर उचलून जेव्हां धर्मपाळ किल्ल्याच्या मागील दिंडीवाटे बाहेर पडला, तेव्हां चोहोंकडे गाढ अंधःकार पसरला होता. किल्ल्याच्या खालच्या भागांतील पाणी आटून गेल्याकारणानें आंत चिखलच चिखल झाला होता. त्यामुळें त्यानें जरी किल्ल्याबाहेर उडी घेतली, तरी त्यास फारसा आघात झाला नाहीं. भयामुळें कल्याणीदेवींला प्रबळ मूर्च्छा आलेली आहे हें त्याच्या लक्षांत आलें. तेव्हां हळूंच त्यानें तिला जमिनीवर ठेविलें व आपलें शिरस्त्राण व चिलखताचें एकेक सुटे भाग सोडून त्यानें ते जमिनीवर फेंकून दिले. त्यानंतर खंदकांतून थोडें पाणी आणून तो तिला सावध करण्याच्या प्रयत्नास लागला; परंतु ती जेव्हां शुद्धीवर येण्याचें कांहीं चिन्ह दिसेना, तेव्हां तिचा देह खांद्यावर घेऊन तो पाण्यांत उतरला. जवळच एकदोन लांकडाचे तुकडे तरंगत होते; त्यांच्या साहाय्यानें धर्मपाळ खंदक ओलांडून पलीकडे आला. तेथें एका वृक्षकुंजांत एक सैनिक तीन अश्वांसह उभा होता. त्याच्याजवळून एक घोडा घेऊन धर्मपाळ त्यावर आरूढ झाला आणि मूर्च्छित कल्याणीला त्यानें आपल्या पुढयांत सांवरून धरून अश्व पिटाळला.

चौफेर घोर अंधार पसारला होता. जवळपास एखादा सरळ रस्ताहि नव्हता, किंवा असल्यास तो आतां दिसून येणें शक्यहि नव्हतें. तेव्हां निरुपाय होऊन धर्मपाळदेवानें अश्व जा तो नेईल तिकडे मोकाट सोडू दिलें.

गोकर्ण सोडल्यावर एक गाव मार्गं पडतें न पडतें तोंच पहांट झाली.

तेव्हां पहांटेच्या मंद प्रकाशांत घोडा भागीरथीच्या पुरातन पात्राच्या कांठा-कांठानें चाललेला आहे असें त्याला कळून आले, सकाळचा थंडगार वारा मस्तकाला झोंबताच कल्याणीदेवी हळूहळू शुद्धीवर आली. तिनें डोळे उघडून प्रश्न केला, " आपण कोण ?"

धर्मपाळाचे मुख लज्जेनें आरक्त झालें. त्यानें उत्तर दिले, " देवी ! भिऊं नकोस. मी धर्मपाळ आहे. "

कल्याणीदेवीनें पुनः डोळे मिटून घेतलें; आणि तोंडावर पदर घेतला. धर्मपाळानें घोडा वळवून अरण्याकडे चालविला, आणि सूर्योदय झाल्या-नंतर तो एका जनशून्य गांवाच्या सीमेजवळ येऊन पोहोंचला. गांवाच्या लगतच एक विशाल नदी आलेली होती. तिच्यांतील निर्मळ जल कलकल निनाद करीत वाहत होते. त्या नदीच्या दोन्ही काठांस दोन मोठें पुरातन घाट बांधलेले होते मनुष्यांच्या रहदारीच्या अभावी त्या घाटांच्या पायऱ्या-वर आतां शेवाळ आणि गवत उगवल्याकारणानें ते अगदीं नादुरुस्त झाले होते. धर्मपाळानें घोड्यावरून उतरून कल्याणीदेवीच्या हाताला धरून तिला काळजीपूर्वक खालीं घेतले. नंतर नदीवर घोड्याला पाणी पाजून चरण्यासाठीं त्याला त्यानें समोरील मैदानांत मोकळें सोडून दिलें.

कल्याणीदेवीनेंहि नदीच्या पाण्यानें आपले हातपाय व तोंड स्वच्छ धुतलें व ती परत आली. तेव्हां धर्मपाळ तिला म्हणाला–

" देवी ! मी गांवांत जाऊन कोठें उतरण्याची सोय होण्यासारखी असल्यास पाहून येतो. तोंपर्यंत तूं येथें एकटी रहाशील ना ?"

कल्याणीनें उत्तर न देतां तोंडावरून पदर घेतला. कांहीं वेळपर्यंत उत्तराची वाट पाहून पुनः धर्मपाळानें प्रश्न केला, " मी जाऊं कां ?"

अस्फुट स्वरांत उत्तर मिळाले, " नको. "

वेळ किती तरी होऊन गेला तरी नदीवर कोणी पाणी भरण्यासहि येईना; त्याचप्रमाणें गाईम्हशींना चरण्यास नेणारे गुराखीहि कोठें दिसेनात.

धर्मपाळदेव घाटाजवळ उगवलेल्या हिरव्या गवतावर बसून होता. घाटाजवळच एका मोठ्या पिंपळाच्या झाडाखालीं सुकलेल्या पानांच्या ढिगावर पडल्यापडल्या कल्याणी स्वस्थ झोंपी गेली आणि घोरूं लागली. पोटांत कांहींहि नसल्यामुळें धर्मपाळ क्षुधेनें फार व्याकुळ झाला.

कल्याणीदेवीला गाढ झोंप लागलेली पाहून तो हळूंच तेथून उठला आणि गांवांत येऊन पोहोंचला. पण गावांत तपास करतां त्याला कोणीहि मनुष्य आढळलें नाहीं. थोड्याच दिवसापूर्वी गांव सोडून लोक पळून गेलें असावेत असे सर्व चिन्हांवरून दिसत होते. कारण कीं, मनुष्योपयोगी वस्तूंचा अद्यापिहि थोडा अवशिष्ट भाग शिल्लक होता. गवताची छपरें असलेलीं घरें अग्नीच्या भक्ष्यस्थानीं पडलेली होती. परंतु विटांनी बांधलेल्या कांहीं घरांचें मात्र फारसें नुकसान झाले नव्हतें. अशाच एका विटांनीं बांधलेल्या घरांत धर्मपाळानें प्रवेश केला आणि पाहतों, तों आंत दोनतीन मनुष्याचे मुडदे पडलेलें आहेत. घरांत सामुग्री मात्र फार होती. कोणीहि त्यांना स्पर्श केलेला नव्हता. अंगणांत दोनतीन केळीचीं झाडें होती आणि त्यांवर खासे पिकलेल्या केळ्यांचें घडचेघड लोंबत होते.

धर्मपाळानें त्या घरांतून एक मातीचें भाडें घेऊन त्यांत थोडें तांदूळ व मीठ घेतलें आणि केळ्यांचा एक घड तोडून घेऊन तो तेथून निघाला. घाटाजवळ येऊन पोहोंचतांच कल्याणी झोपेंतून उठून बसलेली आहे असे त्याला आढळून आले; पण या वेळीं ती अत्यंत भयविव्हल होऊन पिंपळाच्या वृक्षाला टेंकून एखाद्या काष्ठाच्या पुतळीप्रमाणें उभी होती. तिची अशी अवस्था पाहून धर्मपाळानें दुरून हांक मारून तिला म्हटलें,

" देवी ! भिऊं नकोस. मी परत आलों आहे. "

धर्मपाळ जवळ येतांच कल्याणीनें पुन्हां तोंडावरून पदर घेतला. तें पाहून धर्मपाळानें म्हटलें—

" देवी ! सध्यां आपण ज्या स्थितींत येऊन पडलों आहोंत, त्या स्थितींत अशी लाजमर्यादा बाळगून चालावयाचें नाहीं. मोकळ्या मनानें माझ्याशीं न बोलल्यास पदोपदी पुष्कळ अडचणी भासतील. "

कल्याणी कांहींहि न बोलतां खालीं मान घालून उभी राहिली. धर्मपाळ पुनः म्हणाला, " मी हें एक भांडें आणि थोडें तांदूळ घेऊन आलों आहे. आतां जंगलांतून थोडी सुकी लांकडें वेंचून आणतो. तोंपर्यंत तूं येथें रहा. मनांत कसलेंहि भय बाळगूं नकोस. "

कल्याणी मस्तक वर करून म्हणाली, " आपण मला एकटीला सोडून जाऊं नये गडे ! मला भारी भय वाटतें. "

बोलतां बोलतां त्या हरिणाक्षीच्या डोळ्यांत पाणी आलेलें धर्मपाळला दिसून आले. तो म्हणाला, " येथें कशाचें भय आले आहे ! हा मी इत-क्यांतच येतो. "

तरीसुद्धां कल्याणी म्हणाली, " नको गडे ! मी एकटी नाहीं राह्यची ! आपण जाऊं नका. "

धर्मपाळाचा आतां अगदीं निरुपाय होऊन तो जमिनीवर बसला. नंतर तो कल्याणीला उद्देशून म्हणाला, " गेल्या रात्रींपासून तूं कांहीं खाल्लेलें नाहींस आणि आजहि पुनः उपास करणार कीं काय ?"

कल्याणीदेवीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तेव्हां धर्मपाळाने नदींतून पद्माचीं दोन पानें आणून एका केळयाचें मधोमध दोन तुकडे केले; आणि त्यांतील एक तुकडा कल्याणीच्या पुढयांत ठेवून तो खाण्याचा तिला फार आग्रह केला. कल्याणी आणखीहि तोंडावर पदर ओढून दुसरीकडे तोंड वळवून बसली. हें पाहून मंद हास्य करून धर्मपाळ म्हणाला, " देवी ! जर तुला माझी लाज वाटत असेल तर मी आपला दूर एखाद्या वृक्षाच्या आड जाऊन बसतो, तर मग झाले ?"

लगेच उत्तर मिळाले, " नको. "

" पण मी जवळ असल्यास तूं कांहीं खाणार नाहींस असे मल वाटतें. "

कल्याणी यावर कांहीं बोलली नाहीं. तेव्हां धर्मपाळ उठून उभा राहिला व म्हणाला, " बरें तर, मी त्या पलीकडे झाडाआड जाऊन बसतो. "

त्याचक्षणों एक गोंडस चंपकवर्णाचा मृदु हस्त वस्त्रांतून बाहेर निघून त्या पद्मपर्णावर पडला. धर्मपाळ हें पाहून उभा राहिला. पण तो हात बराच वेळ वर जाईना. पानावरच पडून राहिला. तेव्हां धर्मपाळ म्हणाला, " देवी ! तूं खाणार कीं नाहीं ? कां, मी येथून जाऊं ?"

चंपककलिकांप्रमाणें असणाऱ्या त्या बोटांनीं तो केळयाचा तुकडा उचलून वस्त्रांत प्रवेश केला. केळयाचा एक तुकडा योग्य स्थानीं आतां गेला असे धर्मपाळानें पाहिले. पण दुसरा कांहीं केल्या जाईना. तेव्हां पुनः त्यानें विचारले, " कां, पुनः काय झाले ?"

पदरा-आडून उत्तर मिळाले, " मला मुळी भूकच नाहीं."

" असें म्हणून कसें चालेल ? देवी ! तू जर आतां खाणार नाहींस, तर हा मी चाललों पहा !"

पुन: केळचाचा दुसराहि तुकडा वस्त्राआड झाला. याप्रमाणें धर्मपाळ-देवाच्या अत्याग्रहावरून कल्याणीनें थोडेंसें खाल्ले; पण तें अगदींच थोडे ! त्यामुळें कांहीं भूक शमण्यासारखी नव्हती. धर्मपाळानेंहि त्यानंतर थोडी केळी खाऊन विश्रांति घेण्याचें हेतूनें तो त्या पिंपळाच्या झाडाखालीं जाऊन शीतल छायेंत झोंपला. त्याला झोंपी गेलेला पाहून कल्याणीला भय वाटूं लागले, म्हणून तीहि त्याच्याजवळ येऊन बसली. हळूहळू वृक्षाच्या छायेंत सूर्याची प्रखर उष्णता आसमान होऊं लागली. कांहीं वेळानंतर तीहि पेंगू लागली आणि धर्मपाळाशेजारीच गाढ निद्रावश झाली.

तिसरा प्रहर उलटून गेला, तरीहि प्रवासाच्या श्रमानें श्रांत झालेलें हें युग्म कांहीं जागे झालें नाहीं. त्या जन्यशून्य गांवाच्या तृणानें झांकून गेलेल्या निर्जन रस्त्यावर मनुष्यांच्या पावलांची चाहूल ऐकावयास येऊं लागली, तरीहि त्यांचा निद्राभंग झाला नाहीं. थोडचा वेळानंतर सैनिकां-सारखे पोषाख केलेलें दोघे पुरूष त्या गांवच्या वाटेनें त्याच घाटावर येऊन पोहोंचलें. त्यापैकीं एकजण म्हणाला, " या ठिकाणीं गांवची हद्द संपत आली. तरी एकहि मनुष्य दिसत नाहीं हे कसे ?"

दुसरा सैनिक म्हणाला, " आतां करावें तरी काय ! भुकेनें तर प्राण कासावीस होत आले."

" खाण्याच्या उपयोगी पडेल असें एकहि साधन येथें जवळपास तर कोठें दिसत नाहीं."

" गांवांत दिसत असलेल्या घरांत आपण शिरलों असतों, तर कांहीं ना कांहीं तरी मिळाले असतें."

" अरे अक्कलशून्य गाढवा, तुझी बुद्धि ठिकाणावर आहे का ? ज्यांनीं घरादारांना आगी लावून गांवच्यागांव ओस पाडला, ते तुझ्यासाठीं खाण्याच जिन्नस ठेवून गेले असतील असें का तुला वाटतें ?"

" तीं पहा पलीकडे कांहीं घरें आणि हिरवेगार वृक्ष शाबूत आहेत. तेथें तरी जाऊन पाहूं या कांहीं मिळालें तर !"

" नको बाबा, तुझी जायची इच्छा असली, तर तूं खुशाल जा. मी कांहीं यावयाचा नाहीं. मी आपला त्या पलिकडच्या पिंपळाच्या झाडाखालीं बसून विश्रांति घेतों. अरेच्या पण हें काय ! "

वृक्षाखालीं झोंपी गेलेल्या धर्मपाळदेवाला व कल्याणीला दुरून पाहून तो सैनिक शंभर हात मागें सरकला. हें पाहून दुसरा सैनिक घाबरून विचारूं लागला, " कायरे, काय झालें ? कोणी वाघबिघ तर नाहींना ? "

नाकावर बोट ठेवून त्याला पुढें न बोलण्याविषयीं पहिल्या सैनिकानें खूण केली. नंतर अगदीं हलक्या आवाजांत तो म्हणाला, " तें पाहिलेस ? त्या झाडाखालीं कोणी दोन माणसें दिसताहेत."

त्याचा साथीदार हें ऐकून पळून जाण्याच्या उद्योगास लागला. दोघेहि त्या पिंपळाच्या वृक्षापासून फार दूर जाऊन आपसांत हळूहळू बोलूं लागले. दुसरा सैनिक पहिल्याला सागूं लागला, " हें पहा, या भुताटकीच्या प्रदेशांत जंगलांत शिरण्यांत अर्थ नाहीं असें मीं प्रथमच तुला बजावून सांगितलेलें होतें. "

" पण तसें न करून कसें चाललें असतें ? पोटाची आग तर शांत झाली पाहिजेना ? " पहिल्यानें उत्तर दिलें.

" पण या अरण्यांत आपण शिरलों तर एखादें पिशाच्च येऊन आमच्या मानगुटीवर बसायचें !" दुसरा म्हणाला.

" अरे ! एवढ्या लांबूनही तीं पहा स्पष्ट दिसताहेत. "

" आतां माझ्यानें कांहीं बाबा येथें उभें रहावत नाहीं तीं कोणी जिवंत माणसें नसावीत." दुसऱ्यानें शंका दर्शविली.

" इतका जर तूं भागुबाईपणा करतोस तर मग रणांगणावर लढणार रे कसा ? " पहिल्यानें पृच्छा केली.

" अरे, जिवंत माणसाबरोबर कोणीहि लढेल ! त्यांत काय मोठेसें ! पण भुताबरोबर बाबा लढायचें कुणी ?"

" तर मग तूं या ठिकाणींच उभा रहा, मी काय प्रकार आहे तो पाहून येतों."

" नकोरे बाबा ! चल, मीही तुझ्याबरोबर येतों."

" कां ?"

" अरे, तीं भुतें असलीं तर दोघांनांही जिवें मारतील."

" ठीक, चल तर, जाऊं या."

दोघेहि जपून नावकाश पावलें टाकीत टाकीत घाटाकडे यावयास निघाले. धर्मपाळ आणि कल्याणी यांची झोंप अजूनहि उडालेली नव्हती. त्यामुळें सैनिकांच्या हलक्या पावलांच्या आवाजानें त्यांची अगदीं झोंपमोड झाली नाहीं. दोघेहि सैनिक घाटाजवळ जाऊन पाहतात तों तेथें एक मातीचें भांडें असलेलें त्यांना दिसून आलें, तेव्हां दोघेहि आनंदित होऊन त्यांनीं परस्परांना तें खुणेनें दाखविलें. दुसऱ्या सैनिकानें कांहीं अधिक न बोलतां त्या भांड्यांत असलेल्या तांदुळाचा एक बोकणा भरला. तें पाहून त्याचा साथीदार भ्रुकुटी चढवून म्हणाला, "अरे, झालें आहे काय तुला! इतक्यांत खायलाहि सुरुवात केलीस ?"

दुसरा उत्तरला, " हे तांदूळ खाण्याजोगे आहेत कीं नाहींत, हें मी अजमावून पहात होतो."

पहिला सैनिक रागावून म्हणाला, " आज दोन दिवसांत खुद्द सेनापतीसाहेबांच्या पोटांत धान्याचा एक कणहि गेलेला नाहीं, ही गोष्ट तुझ्या लक्षांत आहे ना ?"

दुसरा यावर म्हणाला, " अरे, आपण जिवंत राहिलों तर सगळें कांहीं !"

प्रथम सैनिक आतां त्या पिंपळाच्या वृक्षाच्या अनुरोधानें पुढें पुढें येऊं लागला. जवळ येतांच झोंपलेल्या व्यक्ति मृत नसून जिवंत आहेत असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. कारण त्यांचा श्वासोच्छ्वास आतां त्याला स्पष्टपणें ऐकूं येत होता. आणखी जवळ जातांच घाटाच्या पायऱ्याजवळ पद्मपर्णावर एक मोठा पिकलेल्या केळ्यांचा घड असलेला त्यांच्या दृष्टीस पडला. तो पाहून त्याच्या तोंडास पाणी सुटलें. आणखीहि तो चारसहा पावलें पुढें सरकला.

विटांनीं बांधून काढलेल्या त्या घाटावर कित्येक ठिकाणीं गवत उगवलें नव्हतें. त्या जागीं सोललेल्या केळ्यांच्या कांहीं सालीं पडलेल्या होत्या.

त्यावर चुकून पाय निसटल्याकारणानें तो सैनिक धप्‌दिशीं खालीं पडला. हा प्रकार लांबून पाहतांच ' अरे बापरे ! ' असें ओरडत दूर उभा राहि- लेला सैनिक तेथून पळून गेला.

जमिनीवर पडलेला सैनिक उभा राहणार तोंच धर्मपाळदेवाच्या तरवारीचें तीक्ष्ण टोंक त्याच्या गळ्याला जाऊन भिडलें. धर्मपाळ दरडा- वण्याच्या स्वरांत त्याला उद्देशून म्हणाला, " खबरदार ! येथून हाललास तर फुकट जिवाला मुकशील. "

सैनिक मुकाटयानें हूं कीं चूं न करतां स्वस्थ पडून राहिला. धर्म- पाळानें प्रश्न केला, " तूं कोण आहेस ? खरें काय ते सांगशील तर मी तुला जीवदान देईन. "

सैनिक म्हणाला, " गौडाधिपति महाराजाधिराज गोपाळदेवांच्या सैन्यांतील मी एक सैनिक आहे "

विस्मयचकित होऊन धर्मपाळानें विचारलें, " काय म्हणतोस ?"

आपण खोटेंच कांहीं तरी सांगत आहों अशी धर्मपाळाची समजूत झालेली असावी असें त्या सैनिकाला वाटून तो म्हणाला–

" मी गौडाचा रहिवाशी असून महाराज गोपाळदेवाचा सैनिक आहे ही गोष्ट अगदीं सत्य आहे. "

धर्मपाळानें आपली तरवार मागें घेऊन ती म्यान करीत म्हटलें, " ठीक, तूं नीट उठून बस पाहूं. "

जमिनीवर पडलेला सैनिक नीट उठून बसला व पुनः म्हणाला, " मी हें खोटें नाहीं सांगत तुम्हांला ! हें पहा, माझ्या भाल्याच्या आणि तरवारीच्या टोकावर धर्मचक्राचें चिन्ह आहे. हें गौडवंशाचें लांछन-चिन्ह होय. "

धर्मपाळानें त्याचा भाला व तरवार नीट निरखून पाहून मंद हास्य करून म्हटलें, " कोठें चालला होतास ?"

" आम्ही आमच्या महाराजांच्या शोधार्थ गौडाहून सप्तग्रामला जात आहोंत. आमच्या सैन्यांत एकंदर तीनशें घोडेस्वार व दोनशें पायदळ आहे. राढ देश इतका उजाड झालेला आहे कीं, कोठें कसलीही अन्नसामुग्री मिळत

नाहीं. ही सामुग्री मिळवून आणण्यासाठीं आमच्या सेनापतींनी पायदळ सेनेला फर्माविलेलें आहे. "

" तुझे सेनापती कोण ?"

" अश्वारोहि पथकाचें मुख्य पराक्रमसिंह असून, पायदळ फौजेचे नायक वचनपाळ हे आहेत. "

" हे येथून कितीसे दूर आहेत ?"

"पुरातन राजमार्गाजवळ त्यांनीं फौजेचा तळ दिलेला आहे. "

" तूं नीटपणें मला न्याहाळून पहा; म्हणजे मी कोण तें तुला समजून येईल. "

सैनिक जेव्हां पाय निसरून जमिनीवर पडला, तेव्हां त्याच्या हातांतील मातीचें भांडें खालीं पडून फुटलें आणि त्यांतील तांदूळ सर्वत्र पसरले. भुकेनें अगदीं व्याकुळ झालेल्या त्या सैनिकानें तें तांदूळ वेंचून एक चिमूट तोंडात टाकली व लगेच त्यानें आपलें तोंड वळविलें. धर्मपाळाच्या लक्षांत हा सारा प्रकार येऊन त्यानें विचारले, " खरेंच तुला फार भूक लागलेली दिसते. "

" होय महाराज. आज दोन दिवसांत मी कांहींहि खाल्लेलें नाहीं. "

" मग कच्चे तांदुळ कशाला खातोस. ही केळी खा. "

सैनिक कृतज्ञतेनें मनःपूर्वक हंसला. धर्मपाळानें पद्मपर्णावरील सर्व केळी त्याच्या हवाली केली. त्यानें एका क्षणांतच गट्ट केली. नंतर तो नदीवर जाऊन पोटभर पाणी प्याला. तेथून तो परत येतांच धर्मपाळानें त्याला विचारले, " तूं मला ओळखलेस काय ?"

सैनिक उत्तर दिल्याशिवाय त्याच्या तोंडाकडे टकमका पाहात राहिला. धर्मपाळानें आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून ती त्याच्या हातीं दिली. विद्युल्लतेप्रमाणें लखलख करणाऱ्या त्या तरवारीवर सुवर्णरेखांकित सहा पाकळ्या असलेलें धर्मचक्राचें चिन्ह होतें. ते पाहतांच सैनिक चपापला.

त्यानें ती तरवार अत्यंत आदरयुक्तभावानें आपल्या मस्तकास लाविली व तो म्हणाला, " प्रभु ! आपण खास एखादे गौडीय सामंत आहांत; पण मी आपणांस ओळखलें नाहीं. "

धर्मपाळानें मस्तकावरील भरजरी मंदील काढला. त्यासरसे त्याचे भ्रमरासारखे कृष्ण लांबलचक सुंदर केस पाठीवर विखुरले. नंतर त्यानें सैनिकाला विचारलें, " आतां ओळख पाहूं."

सैनिकानें आपली तरवार दूर फेंकून आपलें गुडघे टेंकले व तो हात जोडून म्हणाला, " प्रभु ! आतां ओळख पटली. आपण महाकुमार युवराज धर्मपाळदेव ! आम्ही आपला व महाराजांचा शोध करीत होतों."

" तूं जलदी मला सेनापती यचनपाळापाशीं घेऊन चल. महाराज सांप्रत मोठ्या संकटांत आहेत."

" महाराज सध्यां कोठें आहेत ? "

" गोकर्णदुर्गावर. दुर्गाचें रक्षण करतां करतांना कदाचित् ते दरोडेखोरांच्या हस्तें बंदिवानहि झाले असतील."

सैनिक एकदम उठून उभा राहिला व म्हणाला, " चला तर मग; आपण जाऊं या. पण या महादेवी कशा चालूं शकतील ? "

सैनिकानें कल्याणीला 'महादेवी' असें संबोधिलेलें पाहून धर्मपाळाला हंसूं आलें. तो म्हणाला, " महादेवीला घोड्यावर बसवून मी घोड्याबरोबर चालतच येईन."

" काय युवराज्ञींना घोड्यावरहि बसतां येतें ? " मंद हास्य करून सैनिकानें प्रश्न केला.

" होय, घोड्यावर बसण्यांत ती प्रवीण आहे. " धर्मपाळानें उत्तर दिलें.

धर्मपाळ आणि सैनिक यांच्यांत झालेला हा शेवटचा संवाद ऐकून कल्याणी अगदीं लज्जित झाली. तिच्या गुलाबी गालांवर रक्तिमा चढलेला दिसला. तिनें तोंडावरून आणखीही जरा पदर घेतला. घोडा नदीकांठीं चरत होता; त्याला आणून धर्मपाळानें त्यावर कल्याणीला नीट बसविलें व तो स्वतः घोड्याची लगाम धरून बरोबर चालूं लागला. सैनिक पुढें होऊन त्यास वाट दाखवूं लागला.

## १

सप्तग्रामाहून गौडापर्यंत जाणारा राजमार्ग आमच्या कथानकाच्या वेळीं अगदीं जनशून्य होता. सायंकाळचा सुमार. रस्त्याच्या दुतर्फा निबिड वनप्रदेशांतून रातकिड्यांचा किर्रर्र ध्वनि ऐकूं येत होता. अशा वेळीं त्या अरण्यांतून एक मांणूस बाहेर पडून त्यानें चौफेर नजर फिरविली. व तो पुनः झाडींत अदृश्य झाला. त्यानंतर थोड्याच वेळांत कित्येक घोडेस्वार त्या राजमार्गावरून त्याच बाजूस येऊन पोहोंचले. ते तेथें येऊन पोहोंचतात न पोहोंचतात तोंच त्या वनांतर्गत भागांतून अनेक घोडेस्वार आणि पायदळ सैनिकांनी येऊन त्यास गराडा दिला. नवीन घोडेस्वार सशस्त्र होते; तथापि हूं की चूं न करतां ते गराडा देणाऱ्यांच्या स्वाधीन झाले. तेव्हां त्यांच्यासह तें सैन्य परत झाडींत शिरलें. वनाच्या आंतील भागांत एक तंबू ठोकलेला असून एका लांकडी आसनावर बसून एक प्रौढ मनुष्य दुसऱ्या कित्येकांबरोबर बोलत होता. इतक्यांत सैनिकांनीं पांच जणास आणून त्याच्यापुढें उभें केलें, प्रौढानें त्यांना विचारलें, " आपण कोण ? आणि कोठें जात आहांत ?"

पांचहि जणांनीं एकदम प्रत्युत्तर दिले, " आम्ही नारायणी सेनेपैकीं आहोंत. "

प्रौढ तें ऐकून हंसून म्हणाला, " बाबांनो, द्वापारयुगाच्या अंतीं नारायणी सेनेचा समूळ नाश झालेला असतां ही आणखी नारायणी सेना कुठची ? ठीक; पण तुम्ही आलांत कोठून व जात आहांत कोठें ?"

बंदिवानांपैकीं एक जणानें उत्तर दिलें, " आम्ही कधीं कोणाच्या प्रश्नाला प्रत्युत्तर देत नसतो. पण यावेळीं आम्ही फार संकटांत आहोंत. तेव्हां आपली इच्छा असल्यास आम्ही खरें तेंच आपणांला यावेळीं सांगूं. "

" बेलाशक सांगा. "

" ऐका तर मग. आम्ही गौडाधिपति गोपाळदेवांच्या आज्ञेनें युवराज धर्मपाळदेवाच्या शोधार्थ निघालेले आहोंत."

बंदिवानांच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच प्रौढ ताडकन् बसल्या जाग्या-वरून उठला व त्याच्या अगदीं जवळ येऊन म्हणाला, " काय म्हटलेंत ? पुनः सांगा पाहूं."

बंदिवानांनीं पुनः तसेंच सांगितलें. तें ऐकून प्रौढानें व्याकुळ चित्तानें म्हटलें, " महाराज सध्यां कोठें आहेत ?"

" गोकर्णदुर्गांत."

" गोकर्णदुर्गांत ? तुमच्या चेहऱ्यावरून हें तुम्ही खोटें सांगत नसा-वेसें दिसतें. कोण आहेरे तिकडे ? या सर्वांना आधीं मुक्त करा."

" आनंदानंद केव्हांहि खोटें बोलत नसतो. आतां आम्ही जावें ना?"

" थांबा, उभे रहा. आम्हीहि याठाहून महाराज गोपाळदेवांच्या शोधार्थ निघालों आहोंत; तेव्हां आपण आतां सर्वजण बरोबरच जाऊं. या निर्जन प्रदेशांत आज संबंध दोन दिवसांत आमची अगदीं उपासमार झालेली आहे. आपण आम्हांला कांहीं खाद्य पदार्थ मिळवून द्याल काय ?"

" या प्रदेशांत खाद्य वस्तू मिळणें फार मुष्कीलीचें आहे. गोकर्ण अगर गोवर्धनला पोहोंचल्याशिवाय खाण्यापिण्याची सोय होण्यासारखी नाहीं."

आनंदानंदाला पाहून प्रौढाच्या मनांत आशेचा संचार झाला होता. पण पुनः त्याची भयंकर निराशा झाली तो पुनः काष्ठासनावर बसला. आनंदानंदानें त्याला उद्देशून म्हटलें, " आतां या जागीं फुकट वेळ दवड-ण्यांत काय अर्थ ? "

" आमच्या अश्वारोही व पायदळ सेनेपैकीं कांहींजण खाद्यसामग्री-च्या शोधार्थ येथून गेलेले आहेत. ते परत आल्याशिवाय आपण येथून निघावें कसें ? "

" तर मग आम्ही पुढें जातों. आमच्यांपैकीं कोणी तरी एक जण तुमच्याबरोबर राहील व तुम्हांला रस्ता दाखवील. "

" ठीक आहे."

यानंतर तिघा साथीदारांसह आनंदानंद गोकर्णदुर्गाकडे यावयास निघाला. संध्याकाळच्या सुमारास गौडीय सेनेपैकीं बाहेर गेलेले लोक चोहों-कडून परत तळावर येऊं लागले. त्यापैकीं कोणी चार दोन अंजीर, थोडेसे

बदाम, तर कोणी कांहीं कच्चेच आंबे घेऊन आले होते. कांहीं तर कंदमुळें आणून आणि ठिकठिकाणीं दगडाच्या तात्पुरत्या चुली पेटवून ती भाजून आपली क्षुधा शमविण्याचा प्रयत्न करूं लागले. अर्ध प्रहर रात्र उलटल्या-नंतर एका सैनिकानें येऊन सांगितलें कीं, एका स्त्रीसहित दोघे पुरुष इकडे आले आहेत. तेव्हां त्यांना आपल्याकडे घेऊन येण्याविषयीं प्रौढानें हुकूम फर्माविला.

थोड्याच अवकाशांत युवराज धर्मपाळदेव सैनिक आणि देवीकल्याणी-सह त्या जागीं येऊन पोहोंचला. तेथें येतांच बरोबरच्या सैनिकाला धर्म-पाळानें विचारलें, " या जागीं सध्यां कोणाचा तळ पडलेला आहे ? "

सैनिकानें उत्तर दिलें, " सेनापति पराक्रमसिंहाचा. "

तेव्हां पुढें होऊन धर्मपाळदेवानें हांक मारली, "पराक्रमसिंहजी !"

युवराजांचा आवाज कानीं पडतांच दचकून पराक्रमसिंह म्हणाला, " कोण ? "

उत्तर मिळालें, " मी धर्मपाळ ! "

धांवत येऊन पराक्रमसिंहानें युवराजाच्या कंठाला मिठी मारली. युवराजाला दृढालिंगन देऊन स्नेहभरित दृष्टीनें तो त्याच्या मुखाकडे एक-सारखा पाहूं लागला. क्षेमकुशल विचारून झाल्यानंतर धर्मपाळाला आपल्या बाहुपाशांतून मुक्त करीत पराक्रमसिंह म्हणाला, " धर्मपाळ ! आतां तुम्ही बालक नसून युवराज आहांत ही गोष्ट पार विसरून गेलों. आतां तुम्हांला मी यथोचित अभिवादन करावयाला हवें ! "

" असें कांहीं तरी बोलूं नका, पराक्रमसिंहजी ! आज आम्ही आपल्या या छावणींत अतिथी म्हणून आलों आहोंत."

" काय अतिथी ! आणि तुमच्याबरोबर एक स्त्रीहि आहे म्हणे ! "

" ज्या सैनिकानें युवराजाला पराक्रमसिंहाच्या छावणींत आणून पोहोंचविलें होतें, तो मध्येंच म्हणाला, " सेनापतीसाहेब ! त्या युवराजांच्या पत्नी आहेत."

सैनिकांच्या तोंडचें हें शब्द ऐकतांच तो वृद्ध सेनापति अगदीं मनः-पूर्वक हंसून म्हणाला, " धर्मपाळ ! लग्नाच्या वेळीं या म्हाताऱ्याला आमं-त्रण द्यावयास विसरलास वाटतें ? "

धर्मपाळ अगदीं दिग्ङमूढ होऊन उभा होता. वृद्ध सेनापति पुढें म्हणाला, " युवराज ! असें किती वेळ उभें रहावयाचें ? महादेवी कोठें आहेत ? त्यांना आधीं घेऊन या. "

धर्मपाळानें कल्याणीला खालीं उतरविलें. पराक्रमसिंह तिच्या जवळ जाऊन तिला प्रणाम करून म्हणाला--

" देवी ! आम्ही आपले सेवक आहों. आपल्या श्वशुरांचें फार जुनें नोकर. आज या स्थळी आपला यथोचित सन्मान आम्हांस करतां येत नाहीं याबद्दल भारी दिलगिरी वाटते. प्रवासाच्या श्रमानें आपण फार थकून गेलेल्या आहांत. तेव्हां तंबूत थोडा वेळ विश्रांति घ्या. "

धर्मपाळ मध्येंच म्हणाला, " पराक्रमसिंहजी ! काय उगाच वेड्यासारखें बरळतां हें ! "

हे ऐकून पराक्रमसिंह कांहींसा रागावून धर्मपाळदेवास उद्देशून म्हणाला, " हें पहा धर्म ! आपण जरी युवराज असलांत आणि वयानें आतां मोठें झालेले असला, तरी मी तुम्हाला लहानपणापासून अंगाखांद्यावर खेळविलेले असल्यामुळें माझ्या दृष्टीने अजून तुम्ही मुलाप्रमाणेंच आहांत. मला आतां तुमच्या पत्नीचा चेहरा बघावयाचा आहे. हा माझा हट्ट मी कांही केल्या सोडावयाचा नाहीं ! "

नंतर कल्याणीला संबोधून तो म्हणाला. " देवी, आपल्याबरोबर कोणी दासी नसल्याकारणानें आपली भारी गैरसोय होत असेल नाहीं "

कांहीं न बोलतां कल्याणीनें तंबूत प्रवेश केला.

छावणीच्या समोरच काष्ठासनावर बसून युवराज आतां पराक्रमसिंहाबरोबर इकडच्या तिकडच्या गप्पागोष्टी बोलू लागला. तो म्हणाला,

" नारायणघोषाच्या सैन्यानें जेव्हा किल्ला जवळ जवळ काबीज केल्यासारखें दिसून आलें. तेव्हां कल्याणीदेवीला घेऊन मी तेथून निसटलों. त्यामुळें मागें पिताजींची काय स्थिति झाली असेल तें मला कळण्यास कांहीच मार्ग नाहीं. "

पराक्रमसिंह म्हणाला, " नुकताच एक संन्यासी येथें येऊन गेला. त्यानें महाराज गोकर्णदुर्गांत असल्याची बातमी सांगितली; पण विपत्तीविषयीं तो कांहींच बोलला नाहीं हें कसें ? "

" त्या संन्याशानें आपलें नांव सांगितले काय ?"

" होय. त्यांचें नांव स्वामी आनंदानंद. आम्हांला वाट दाखवून घेऊन येण्यासाठीं तो आपल्याबरोबरच्या एका सैनिकाला येथें ठेऊन गेलेला आहे."

" त्या सैनिकाला इकडे बोलवा पाहूं."

लगेच पराक्रमसिंहाच्या आज्ञेनें एक गौडीय सैनिक स्वामी आनंदानंदाच्या अनुचराला तेथें आणावयास निघून गेला. तो गेल्यावर धर्मपाळानें प्रश्न केला, " आपल्याबरोबर सेनापति वचनपाळ हेंहि आलेलें आहेत काय ?"

" होय. पण हें आपणाला कोणी सांगितले ?"

" जो सैनिक आम्हांला येथें घेऊन आला त्यानेंच ! पण सध्यां वचनपाळ कोठें आहेत ?"

" जठराची ज्वाला असह्नीय झाल्याकारणानें तें शिकारीसाठीं गेलेलें आहेत."

" तर मग आहाराची कांहीं तरी तजवीज होईलच !"

" आपलीसुद्धां स्थिति आमच्यासारखी झालेली दिसते."

" होय. कालदुपारीं थोडें खाल्ले होतें. आज सकाळीं थोडे तांदूळ, मीठ व मातीचे एक भांडें मिळालें, पण सर्पणाच्या अभावीं शिजवितां आलें नाहीं."

" कां ? वनांत लांकडें मिळालीं नाहींत कां ?"

" ना—हीं. तसें नव्हे, पण देवी एकटी रहावयास तयार होईना."

" मग जोडयानें बरोबरच जावें कीं नाहीं ?"

" तुम्हांला ज्या त्या गोष्टींत थट्टाच दिसते. खरेंच, कल्याणीदेवीबरोबर माझा विवाह झालेला नाहीं हें मी आपणाला सत्य सांगतो. काल रात्रौ गोकर्णच्या दुर्गस्वामिनीनें हिच्या रक्षणाचा भार मजवर सोंपविला."

" मग त्यांत काय वागवे ! क्षत्रियांचा विवाह असाच तऱ्हेनें होत असतो. दुर्गस्वामिनीनें आपल्या कन्येच्या रक्षणाचा भार आपणांवर सोंपविला; अर्थात् तो गांधर्व विवाह झाला कीं नाहीं ?"

" छट्, भलतेंच ! भारीच बुवा तुम्ही थट्टेखोर ? "

" मनांतील गुप्त गोष्ट अचूक ओळखून मीं ती उघड करून सांगितली यांत मी थट्टा ती कोणती केली ? आतां महाराज्ञीकडे गेलांत कीं, हें रत्नच आपणांला बक्षिसादाखल मिळावयाचें आहे बरें ! हो, पण धर्म ! तुम्ही तांदूळ कोठून बुवा पैदा केलेत ? एका घरांत तुम्हांला सांपडले असे मघां तुम्हीं सांगितलें नव्हे ? "

" होय, तेथें बरेंचसे तांदूळ आहेत. "

" पण तें घर येथून कितीसें दूर आहे ? "

" असेल अजमासें तीन चार गांव. "

" पण कोणत्या दिशेला ? "

" तें आतां मला नक्की सांगतां यावयाचें नाहीं. परंतु फार करून उत्तर आणि पश्चिम या दिशांमध्यें असावें. "

पराक्रमसिंहानें युवराजाला त्या स्थळीं घेऊन येणाऱ्या सैनिकाला बोलावणें पाठविलें व तो येतांच त्याला विचारलें, " युवराजांची व तुझी ज्या जागीं गांठ पडली तें स्थळ येथून कितीसें दूर आहे ? "

" सुमारें तीन गांव."

" रात्रीच्या वेळीं रस्ता ओळखतां येईल काय ?"

" होय, सरकार ! "

" ठीक. आता कोणी तरी त्या संन्याशाच्या अनुचराला येथें घेऊन या."

एक क्षणातच स्वामी आनंदानंदाचा अनुचर त्या ठिकाणीं आला. पराक्रमसिंहाच्या आज्ञेनें सैनिकानें त्याला त्या निर्जन गांवाचें वर्णन सांगितलें. तेव्हां तोच रस्ता थेट गोकर्णला गेलेला आहे असें त्याच्याकडून कळलें. पराक्रमसिंह आनंदित होऊन म्हणाला, " धर्मपाळ ! वचनपाळ परत आल्याबरोबर आपण येथून निघूं या. थोडीबहुत पोटाची आग शमविल्याशिवाय सैनिकांना मार्ग झेंपणार नाहीं. महाराजांचा शोध लागतांच मग विलंब लावण्यांत अर्थ नाहीं. दुसरीहि एक फौजेची तुकडी महाराजांच्या शोधार्थ फिरत आहे. "

" पण वचनपाळ शिकारीहून काय घेऊन येताहेत तें आधीं पाहूं ! "

इतक्यांत वचनपाळ दोन मोठाल्या रेड्यांना मारून घेऊन येत आहे अशी एका सैनिकानें येऊन वर्दी दिली तें ऐकून धर्मपाळानें विचारलें, " पराक्रमसिंह ! बौद्धधर्मी रेड्यांचें मांस खात असतात काय ?"

" बौद्ध धर्मीची गोष्टच या वेळीं बोलूं नका. "

वाटेनें येतां येतांच युवराजाच्या आगमनाची वार्ता वचनपाळाला समजली होती. त्यानें येतांक्षणीच युवराजाला लवून प्रणाम केला. नंतर तिघांनींहि वाटाघाट करून लगेच गोकर्णदुर्गास निघावयाचें नक्की ठरविलें. गौडीय सेनेनें दोन प्रहर रात्रीच्या सुमारास तेथून आपला तळ उचलला. दुसऱ्या दिवशीं पहांटेसच ते सैन्य त्या निर्जन गांवास येऊन पोहोंचलें. तेथें त्यानीं अन्न शिजवून यथेष्ट भोजन केलें: जेवणखाण आटोपल्यानंतर त्यांनीं राजपुत्रवधूच्या नांवांचा एकच जयजयकार केला. ही लक्ष्मी या छावणींत आली म्हणूनच आपणांस पोटभर अन्न मिळाले, अशी त्यांची समजूत झाली.

●●

## १०

गोकर्णदुर्गांत दोन दिवस होतों धर्मपाळदेवाचा पत्ता लागला नाहीं, जे त्याच्या शोधार्थ गेलेलें होतें, त्यापैकीं बरेचसे निराश होऊन आले होतें. परंतु अद्याप आनंदानंद मात्र परत आला नव्हता. प्रभातकालीं दुर्गद्वारासन्मुखच एका वृक्षाखालीं गोपाळदेव, संन्यासी विश्वेश्वरानंद, उद्धवघोष आणि कमळसिंह असे चौघे बसले होतें. गोपाळदेवाचें चित्त यावेळीं अगदीं उद्विग्न झालेलें दिसत होतें व बाकीचें तिघेजण एकमेकांच्या मुखांकडे पहात स्तब्ध राहिले होते. कांहीं वेळ नंतर गोपाळदेव म्हणाले,

" प्रभु ! आतां आणखी किती दिवस मी धीर धरूं म्हणतां ? धर्मपाळाचा अद्यापि कोठें शोध लागत नाहीं. तो जर जिवंत असता, तर

इतक्यांत परत येता किंवा आपल्याविषयीं कांहीं खबर तरी पाठविता."

संन्याशी उत्तरला, " महाराज ! आणखी एक दिवस वाट पहा. आनंदानंदाला परत येऊं द्या."

गोपाळदेव हताश होऊन म्हणाले, जशी प्रभुची इच्छा !"

इतकें बोलून ते अगदीं चिंतामग्न स्थितींत गंभीर मुद्रेनें बसलें. ते पाहून संन्याशी म्हणाला, " महाराज ! आपणाला एक काम लौकर आटोपून टाकले पाहिजे."

गोपाळदेवांनीं प्रश्न केला, " कोणते प्रभु ?"

" नारायणघोषाचा न्याय."

" आणि तो कोणी, कशा रितीनें करावयाचा ?"

" या अराजक देशांत राजसत्ता शिथिल झालेली पाहून कित्येक लोकांनीं जे अनन्वित अत्याचार चालविलेलें आहेत, त्यांचें भीषण परिणाम अलीकडे वारंवार माझ्या दृष्टोत्पत्तीस येत आहेत, या देशाची अन्याय आणि जुलूम ह्यांतून सोडवणूक करण्यासाठीं अशांचें पारिपत्य करणें आतां अत्यवश्यक झालेलें आहे.

अशा दोघांतिघां कुलांगार सामंतांना न्यायासनापुढें खेंचून जबर शिक्षा करण्याचा मी कृतसंकल्प केलेला आहे. अनेक परीनें प्रयत्न करून सुद्धां या देशांत अद्यापि मी शांति प्रस्थापित करूं शकलों नाहीं. दक्षिणेंतील ढेकरीचा राजा व उत्तरेस वसणाऱ्या हलक्या जाति अशा अपराध्यांना आश्रय देऊन उत्तेजन देत असतात. यापुढें जर अपराध्यांना जबर शासन करण्याचें कार्य आम्ही दिरंगाईवर टाकलें, तर न जाणो, आणखीहि कांहीं विपत्ति येऊन पडावयाच्या. म्हणून जर आपली संमति असेल तर आजच याचा निवाडा केलेला बरा ?"

" माझ्या संमतीची काय जरूरी आहे, प्रभु ? मी या ठिकाणचा एक अतिथि."

" महाराज ! न्यायासनासमोरील साक्षीदारांत आपण एक मुख्य साक्षीदार आहांत."

" खरी गोष्ट ! मीं जें जें नजरेनें पाहिलेलें आहे, तें तें न्यायासनापुढें सांगावयाची माझी केव्हांहि तयारी आहे."

नंतर संन्याशाच्या आज्ञेनुसार गंगेच्या किनारीं पिंपळाच्या वृक्षाखालीं एक मोठी बिछायत घालण्यांत आली. कमळसिंह, स्वामी विश्वेश्वरानंद आणि उद्धवघोष असे त्रिवर्ग त्या बिछायतीवर बसले. त्यांच्या समोरील दुसऱ्या एका आसनावर महाराज गोपाळदेव स्थानापन्न झाले त्यानंतर कित्येक सैनिक लोहशृंखलाबद्ध अशा नारायणघोषाला त्या स्थलीं घेऊन आले. बंदिवान येतांच तत्काळ संन्याशानें प्रश्न विचारला, " नारायण ! आज आम्ही तुझ्या अपराधाची चौकशी करणार आहोंत. तूं असत्य भाषण करणार नाहींस अशी अगोदर शपथ व्हा."

विकट हास्य करून नारायणघोष म्हणाला, " माझा न्याय करणारा तूं कोण ? "

तें ऐकतांच रागावून कमळसिंह म्हणाला, " अगोदर शपथ घेतोस कीं नाहीं तें बोल पाहूं."

आपलें शृंखलाबद्ध हात दाखवीत नारायणघोष म्हणाला, " आधीं या बेड्या काढावयास सांगा, मग हवी तर शपथ घेतों. "

संन्याशाच्या आज्ञेनें त्याच्या हातकड्या काढून घेण्यांत आल्या. तथापि तो शपथ घेईना. तेव्हां गोपाळदेव म्हणाले, " आपण सर्वजण या-वेळीं पवित्र गंगेच्या कांठीं बसलों आहोंत, म्हणून शपथ घेण्याची आणखी जरूर काय ? "

नारायणघोषानें हें ऐकून आपली करडी नजर गोपाळदेवावर रोंखली त्यासरशीं त्याच्याहि अंगावर कांटा उभा राहून ते म्हणाले, " प्रभु ! हा माणूस वेडा आहे काय ?"

मंद हास्य करून संन्याशानें उत्तर दिलें, " नाहीं, वेडा नव्हे, पण काळसर्प आहे. "

" पवित्र गंगाजलाविषयीं याच्या मनांत एवढा अनादर कां ?"

" नारायण वज्रानीय बौद्धधर्माचा कट्टा अनुयायी आहे. "

" मग आम्हीहि बौद्धधर्म मानीत नाहीं काय ? "

" पण आपण महायान बौद्धधर्मावलंबी आहांत. "

" तर मग मला वाटतें हा माणूस शपथ कधींच घेणार नाहीं. "

" न कां घेईना ? आपणाला तिची जरूर नाहीं."

त्यानंतर संन्याशानें नारायणघोषाला प्रश्न केला, " तूं गोकर्णांत कां म्हणून आला होतास ?"

" कल्याणीला नेण्यासाठीं."

" असें करण्याचा मतलब ?"

" तिला दासी बनविण्याचा माझा मनोदय होता."

" तिचे हरण केल्यानंतर तिच्याशीं विवाह न करण्याचें कारण ?"

" ती माझ्या मर्जीची गोष्ट आहे !"

संन्याशी गोपाळदेवांना उद्देशून म्हणाला, " महाराज ! ऐकलेंत कां हें सारें ?"

गोपाळदेवांनीं उत्तर दिलें, " या पाजी माणसानें जवळजवळ एक सहस्र सेनेसह दुर्गावर चढाई केलेली होती."

" आणि दुर्गात किती सैनिक होते ?"

" फक्त सहासात."

इतक्यांत दूर अन्तरावरून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. आणि क्षणभरांत तिघां घोडेस्वारासह स्वामी आनंदानंद त्या जागीं येऊन पोहोंचले. त्याला पहातांक्षणींच भयाकुल नजरेनें संन्याशी व गोपाळदेव दोघेंहि पटकन् उठून उभे राहिले. संन्याशानें प्रश्न विचारला---

" आनंदानंद ! काय समाचार आहे ?"

आनंदानंदानें प्रणाम करून म्हटले, " युवराजांचा कोठेंहि थांग लागत नाहीं."

तें ऐकतांच निराश होऊन गोपाळदेव मटकन् खालींच बसले. तें पाहून आनंदानंद म्हणाला—

" महाराज ! एक गौडीय सेनापति मोठ्या फौजेनिशीं आपल्या शोधार्थ फिरत आहे."

गोपाळदेवांनीं कांहींहि उत्तर दिलें नाहीं. परंतु संन्याशानें आनंदानंदाला विचारले, " तो सध्यां कुठें आहे ?"

" पार्थसारथीच्या मंदिरानजिक त्याच्या फौजेनें तळ दिलेला आहे."

" मग त्याला घेऊनच तुम्ही कां आलां नाहींत ?"

" दोन दिवस त्याच्या फौजेची भारीच उपासमार झालेली असून आहाराच्या शोधार्थ त्याचे कांहीं सैनिक छावणी सोडून गेलेलें आहेत. ते सर्व परत आल्यावर सेनापति तेथून आपल्या फौजेचा तळ उठविणार आहे. त्या फौजेला वाट दाखविण्यासाठीं मी माझ्या बरोबरीच्या एका इसमास तेथें ठेवून आलों आहे. फार करून संध्याकाळच्या आंतच ते सारेजण येथे येऊन पोहोंचतील. "

संन्याशाच्या आज्ञेनें आनंदानंदहि त्या जागीं बसला. कारण तोहि एक साक्षीदार होता. त्याने सांगितलें कीं, गोकर्णदुर्गावर आपण हल्ला करणार आहोंत अशी एक दिवस आधींच नारायणघोषाकडून सूचना मिळा-लेली होती. परंतु त्यानें पाठविलेल्या दूतानें कल्याणीदेवीच्या बाबतींत एक अक्षरहि उच्चारलेलें नव्हतें. तेव्हां संन्याशी म्हणाला, " बस्स; आतां मुक-दम्याचा फैसल्ला ठरला. "

कमळसिंहानें विचारलें, " अपराध्याला त्याच्या गुन्ह्याबाबत आपण कोणती शिक्षा द्यावयाचें ठरविलेंत ?"

" देहांत शासनाखेरीज या अपराधाला दुसरी शिक्षाच नाहीं. पेट-लेल्या चितेंत यानें एक तर आपण होऊन उडी घ्यावी. अथवा असें करणें नसेल तर त्याला फांसावर लटकवावें. "

गोपाळदेव विषण्ण वदनानें बसले होते. त्यांनीं या कठोर शिक्षेची सुनावणी ऐकतांच अंगावर शहारे आल्यासारखें करून म्हटलें,—

" एखाद्या साधारण चोर-लुटारूप्रमाणें आपण नारायणघोषाचा शिरच्छेद करणार काय ? क्षत्रिय धर्माच्या विधियुक्त प्रणालीला अनुसरून याला यावेळीं क्षमा केली तर नाही का चालावयाचें ?"

संन्याशी म्हणाला, " महाराज ! नारायणघोष राजा असूनहि एखाद्या चोर-दरोडेखोराप्रमाणेंच वागला. निरापराधी विधवेच्या सर्व नाशास उद्युक्त होणे हा राजधर्म आहे काय ? असहाय बालकें, निराधार अबला व वृद्ध पुरुष यांच्यावर भयंकर अत्याचार करावयास प्रवृत्त होणें हा क्षत्रियांचा धर्म आहे काय ?"

गोपाळदेवांनीं यावर कांहींहि जबाब न देतां तें स्तब्ध बसले. नंतर संन्याशानें नारायणघोषाला प्रश्न केला, " अग्निप्रवेश करून आपल्या पापाचें प्रायश्चित्त घ्यावयास तूं तयार आहेस काय ?"

गर्जना करून नारायणघोष म्हणाला, " अग्निप्रवेश मी कां म्हणून करीन ? थेरड्या शृगाला ! तुझ्यांत हिंमत असेल तर वसुदेवघोषाच्या या पुत्राला मारून टाक. पण याद राख, श्रीगुरुची सेना गोवर्धनमठाचा एक दगडहि शिल्लक ठेवणार नाहीं. "

मंद हास्य करून संन्याशी म्हणाला, " तें मग मागाहून पाहतां येईच; पण आतां तूं भगवंताचें शेवटचें नामस्मरण कर. "

गंगेच्या कांठीं एका वृक्षावर नारायणघोषाला फांशी देण्यांत आलें. हें भीषण दृश्य गोपाळदेवाच्यानें न पाहवल्यामुळें तें त्या स्थलाचा त्याग करून दुर्गात आलें.

दुपार होण्याच्या आधी थोडा वेळ केशवाने येऊन उद्धवघोषाला वर्दी दिली कीं, एक मोठी सेना याच बाजूला नदीच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें येत आहे. तेव्हां उद्धवघोषानें गौडीय सेनेच्या आगमनाची वार्ता गोपाळदेवांच्या कानांवर घातली. गोपाळदेव त्या वेळीं खंदकाच्या पुलावर बसलें होतें. कांहीं वेळानंतर धर्मपाळ, पराक्रमसिंह व वचनपाळ या त्रिवर्गांनीं येऊन त्यास प्रणाम केला. धर्मपाळाला अचानक परत आलेला पहातांच प्रथम तर गोपाळदेवांना भारीच विस्मय वाटला. त्यांनीं त्याला कुरवाळून व पोटाशी धरलें. उद्धवघोष अत्यानंदित होऊन उच्च स्वरांत म्हणाला—

" युवराज धर्मपाळदेव परत आलें आहेत. तेव्हां सर्वजण मंगलध्वनि करा. "

पितापुत्रभेटीचा प्रथम आवेग अंमळ ओसरतांच पराक्रमसिंह मस्तक नम्र करून गोपाळदेवांना म्हणाला—

" महाराज ! युवराजांचा विवाह झालेला आहे, हें आम्हाला ठाऊक नव्हतें. वनांत जेव्हां धर्मपाळ वधुसह आम्हांला येऊन भेटलें, तेव्हां वधु घोड्यावर बसलेली होती. त्या उजाड प्रदेशांत पालखी कोठून मिळणार ? त्यामुळें नाइलाजास्तव राजपुत्रवधूला अश्वावर बसवूनच येथपर्यंत आणावें लागलें. "

विस्मयचकित होऊन गोपाळदेव म्हणाले, " विवाह ! वधु ! पराक्रमसिंह ! बोलता तरी काय तुम्ही हें ?"

" कृपानिधान ! नववधूला घेऊन धर्मपाळ जात असतां मार्गांत आमचा त्यांना पत्ता लागल्यामुळें भेटाभेट झाली. "

" धर्मपाळ ! दुर्गांतून बाहेर पडल्यावर कल्याणीबरोबर तूं लग्न केलेंस कीं काय ?"

लज्जेनें धर्मपाळ खालीं मान घालून स्तब्ध उभा राहिला. तेव्हां गोपाळदेवानीं पराक्रमसिंहाला प्रश्न केला, " पराक्रमसिंह, वधू कुठें आहे ?"

" दुर्गद्वाराजवळ. "

" जा. तिला लौकर इकडें घेऊन या. तिला तेथेंच ठेऊन तुम्ही पुढें का आलांत ? "

तोंडावर लाजेमुळें पदर घेतलेल्या कल्याणीला घेऊन पराक्रमसिंह परत आला व तिला उद्देशून म्हणाला, देवी ! या आपल्या श्वशुरांना आधीं हात जोड पाहूं !"

अगदीं लज्जायमान होऊन कल्याणी जमिनीकडे पाहात उभी राहिली. गोपाळदेवांनीं प्रश्न केला, " धर्मपाळ ! ही कोणाची कन्या ?"

" खालीं पाहात विनयानें पण कांहींशा संकोचानें धर्मपाळानें उत्तर दिलें, " पिताजी ! ही कल्याणीदेवी !"

उद्धवघोषाने हें ऐकून तिच्या तोंडावरील पदर बाजूला सारून व तिला ओळखून म्हटलें, " हो; ही तर कल्याणीच !"

गोपाळदेव म्हणाले, " मी कल्याणीची गोष्टच विसरून गेलों. "

नंतर कल्याणीला घेऊन उद्धवघोषानें दुर्गांत प्रवेश केला. गोपाळदेव, पराक्रमसिंह व वचनपाळ यांच्या तोंडून गौडाकडची हकिकत ऐकत बसले. एका क्षणातच उद्धवघोषाने परत येऊन गोपाळदेवांना म्हटलें---

" महाराज ! कल्याणी खरोखरीच आपली स्नुषा आहे. दुर्गस्वामिनीनें सांगितलें आहे की, युद्धाच्या रात्रीच तिला आपण धर्मपाळास अर्पण केलेलें असून विवाहित पत्नीप्रमाणें रक्षण करावयास बजाविलें होतें. "

हे ऐकून महाराज गोपाळदेव हंसले आणि धर्मपाळ लज्जित होऊन तेथून निघून दुसरीकडे गेला.

●●

# ११

गौडांत आज मोठी धामधूम उडालेली होती. आज पुष्कळ दिवसा-नंतर नगरांत महाराज गोपाळदेवाचें पुनरागमन झालें होतें. प्रत्येक नगर-द्वारावर सुस्वर मंगलवाद्यें वाजत होती. नागरिकांनीं प्रशस्त राजमार्गावर अनेक मंडप आणि तोरणें उभारली होती, नानाप्रकारच्या उंची, रंगीबेरंगी आणि चित्रविचित्र पोषाखांनीं नटूनथटून नागरिकांचा थवा राजवाड्याकडे लोटला होता. देवतुल्य गोपाळदेवांच्या दुर्लभ दर्शनास्तव–दीर्घ प्रवासानंतर परत आलेल्या नृपाळाच्या भेटीसाठीं–सारे अगदी अधीर झालें होतें.

राजमहालाच्या अंगणांतच बालप्रभाकराचें किरण फांकतात न फांकतात तोंच राजसभा भरविण्यांत आली होती. सभामंडपाच्या मध्यभागीं एका रौप्य सिंहासनावर महाराज गोपाळदेव विराजमान झाले होतें. त्यांच्या पायांजवळ एका चंदनासनावर युवराज धर्मपाळदेव बसला होता. त्याच्या-जवळच जमिनीवर घातलेल्या एका उंचीं जाजमावर महाकुमार वाक्पाळ, सेनाधिपति, दंडपशिक ( कोतवाल ), नौबाध्यक्ष ( आरमार खात्याचें वरिष्ठ अधिकारी ), फौजदार वगैरें राजकर्मचारी बसले होते. डाव्या हाता जवळ कुशासनावर महामंत्री गर्गदेव बसला होता. फार लांबीच्या व दीर्घ-कालच्या प्रवासामुळें गोपाळदेवांच्या मुखावर श्रमानें थकल्याचीं चिन्हें स्पष्ट दिसून येत होतीं. सर्व सभा अगदीं शांत होती. इतक्यांत एका पहारेकऱ्यानें येऊन महामंत्र्याच्या कानांत कांहींसें सांगितलें. त्यासरशीं तो अगदीं अस्वस्थ होऊन महाराज गोपाळदेवांपाशी आला. तेथें बराच वेळपावेतों दुसऱ्याला ऐकूं न जाईल अशा बेतानें त्यांच्यांत कांहीं बोलणें चाललें. कांहीं अवकाशा-नंतर युवराज धर्मपाळ आणि महासेनाधिपती हे महाराजांच्या आज्ञेनें सभामंडपांतून उठून गेले. काय प्रकार आहे हें जाणण्यासाठीं सभेंतील सारे-जण अगदीं उत्कंठित झाले.

अर्ध्या घटकेनंतर सभेचें कान आटोपण्यापूर्वींच पहारेकऱ्यानें येऊन वर्दी दिली कीं, युवराजांबरोबर एक संन्याशी आलेले असून ते दरवाजा-

पाशीं उभे आहेत व त्यांनीं महाराजांच्या भेटीची इच्छा प्रदर्शित केलेली आहे. महाराज गोपाळदेव या वेळीं एका नागरिकांबरोबर कांहींसें बोलत होते; त्यामुळें पहारेकऱ्यांच्या तोंडचे हे शब्द त्यांनीं पुरतें ऐकलेही नसावेत ! त्यांचे ध्यान दुसरीकडे असतांहि ते म्हणाले, " जा, त्यांना घेऊन ये. " अभिवादन करून पहारेकरी तेथून गेला.

एका क्षणांतच युवराजांबरोबर एका भव्य गौरवर्ण व भगवीं वस्त्रें धारण केलेल्या संन्याशानें सभामंडपांत प्रवेश केला. त्याला पांहताच सेनापति पराक्रमसिंह व वचनपाळ उठून उभे राहिले. गोपाळदेवांचें प्रथम त्याच्याकडे लक्षच गेलें नाहीं. पण ज्याच्याशीं ते हा वेळपर्यंत बोलत होते, तो निघून गेल्यावर पहातात, तों संन्याशी सिंहसनाच्या बाजूलाच आपणाकडे येत आहे असें त्यांच्या दृष्टीस पडलें.

त्यासरशी तें एकदम सिंहासनावरून उठून उभे राहिले. त्यांना तसें करतांना पाहून सभेंतील सारेजण उठले. महाराजांनीं पुढें होऊन संन्याशाला अत्यंत भक्तिभावानें प्रणाम केला. संन्याशानें महाराजांना आशीर्वाद देऊन दृढालिंगन दिलें.

प्रियवाचक ! हा संन्याशी म्हणजे गोवर्धनमठाचा मुख्य स्वामी विश्वेश्वरानंद होय हें आपल्या लक्षांत आलें असेलच !

मंत्री गर्गदेवाच्या आज्ञेने त्या दिवशीं मग नगरवासी यांनीं महाराजांचें दर्शन घेण्याचे तहकूब केलें. ज्यांना महाराजांचें हा वेळपर्यंत दर्शन घडून आलें नव्हतें. ते सभामंडपाच्या बाहेर उभ्याउभ्या महाराजांचा जयजयकार करूं लागले. शेवटीं धर्मपाळानें बाहेर येऊन त्यांना आश्वासन दिलें कीं, ' महाराज आज सायंकाळीं पुनः सभामंडपांत येतील; त्यावेळीं सर्वांना त्यांचे दर्शन होईल. '

हें ऐकून सर्व नागरिक आपापल्या घरीं निघून गेले. संन्याशी गर्गदेवाजवळ कुशासनावर अधिष्ठित झाला. गोपाळदेवानीं त्याला प्रश्न केला, " प्रभु ! गौडांत पाऊल टाकण्यापूर्वीं आपण येणार असल्याचा समाचार पूर्वीच कां आमच्या कानावर घातला नाहीं ? "

संन्याशानें उत्तर दिलें, " कां बरें, महाराज ! गौडांत परत आपण भेटूं असें गोकर्णालाच मीं आपणांला सांगितलें नव्हतें का ? "

अत्यंत दिलगिरीच्या स्वरांत महाराज म्हणाले, " प्रभु ! आपण येणार आहांत हें जर आम्हांला माहित असतें, तर हा दास गौडाच्या सीमेवर आपणांस आणावयास जरूर हजर राहाता. "

" त्याबद्दल वाईट वाटून घेण्याचें मुळींच प्रयोजन नाहीं. आज मी गौडाधिपतीपाशीं एक याचना करावयास आलों आहे. तेव्हां एखाद्या सामान्य पाहुण्याप्रमाणें मीं येणें अनुचित झालें असते."

" प्रभु ! या राज्यांत आपणाला न देतां येण्याजोगें काय आहे ? आपण तर वारंवार आमचा जीव वांचविलेला आहे. "

" कोणी कोणाचा जीव वांचविला त्याचा न्याय भगवंतच करील. महाराज, या वेळीं नगरद्वारावर व सीमाप्रांतो अनेक अतिथी आपल्या दर्शनासाठीं तिष्ठत आहेत."

" प्रभु ! अपाणांबरोबर कोण कोण आले आहेत ? "

" नगरद्वाराजवळ गोवर्धनमठाच्या एक सहस्र संन्याशांसह स्वामीं आनंदानंद उभे आहेत. "

" धर्मपाळ ! तूं त्यांना घेऊन कां आला नाहींस ? "

" पिताजी ! प्रभूनीं मला त्यांच्या आगमनाची कांहींच वार्ता कळविलीं नव्हती; पण आतां मी त्यांना घेऊन येतो. "

" युवराज, थांबा." संन्यासी म्हणाला, " महाराज, गौडराज्याच्या सीमेवर यदुवंशाचे राजे जयवर्धन, दंडभुक्ती ( सध्यांचा त्रिहुत प्रांत ) चे राजे रणसिंह, ढेकरीचें राजे प्रमथसिंह. उद्धारणपूरचें राजे कमलसिंह, देवग्रामचें राजे वीरदेव व उदंडपुरचें राजे भीष्मदेव हे सर्व आपली वाट पहात आहेत. ते आपापल्या सैन्यासह आपल्या दर्शनास आलेलें आहेत. आपल्या अनुमतिशिवाय गौडप्रांतांत त्यांना येतां यावयाचें नाहीं. "

विश्वेश्वरानंदाच्या तोंडचें हे शब्द ऐकतांच गोपाळदेव तटस्थ होऊन सिंहासनावर बसून राहिले. तें पाहून गर्गदेव त्यांच्यापाशीं येऊन म्हणाले, " महाराज ! अगोदर या सर्वांच्या आदरातिथ्याची आपणाला तजवीज केली पाहिजे. "

गोपाळदेवांची तंद्री उतरली. संन्याच्या प्रश्नास उत्तर देतांना त्यांनीं

संन्याशाला विचारले, " प्रभु ! ते सर्वजण मला भेटण्यासाठीं का आलेले आहेत ?"

संन्याशानें उत्तर दिलें, " होय. ते एवढ्याच कारणास्तव येथें जमले आहेत."

" मला भेटण्यासाठीं गौडापर्यंत येण्याची त्यांना स्वतः काय जरुरी होती ? प्रभु, दूताकरवी कळविलें असतें, तरी पुरें होतें. मला हें गौडबंगाल काय आहे तेंच कळेनासें झालें आहे." महाराज गोपाळदेवांच्या मनांत अनेक शंकाकुशंका उद्भवून ते बोलले.

" यापेक्षां मी तरीं कांहीं अधिक जाणीत नाहीं." संन्याशी म्हणाला

" प्रभु ! देशाच्या अशा विपद्कालीं मी आजपर्यंत नाना प्रकारच्या संकटांना तोंड दिलेले आहे. आणखी ही काय दुसरी भानगड ? माझ्या तर कांहींच लक्षांत येत नाहीं."

" भानगड काय तें तुम्हीं अगर मी एव्हांच कसें सांगूं शकणार ? मी तर एक क्षुद्र माणूस आहे, महाराज !"

मंत्री गर्गदेव पुनः म्हणाले, " महाराज ! आतां विलंब उपयोगाचा नाहीं, त्यांच्या आदरसत्काराची अगोदर व्यवस्था केली पाहिजे."

" ती कशी काय करावयाची तेच मला समजत नाहीं." महाराज म्हणाले.

" सर्व राजे ससैन्य जरी असले, तरी मित्रभावानें तें आज आपल्या भेटीसाठीं आलेले आहेत. तेव्हां त्यांना यथोचित मानसन्मानानें नगरांत घेऊन आले पाहिजे." गर्गदेवानें सुचविलें.

गोपाळदेव उद्गारले, " गुर्जराधिपतिहि एकदां असाच मित्रभावानें गौडांत आला होता; पण परत जातांना अनेक मानवी रक्ताचा सडा शिंपडूनच तो गेला. त्यानें अनेक गांव जातां जातां बेचिराख केलें. पण या वेळीं प्रभु विश्वेश्वरानंद त्यांच्यासह आलेले असल्यामुळें त्यांजवर माझा पूर्ण भरंवसा आहे."

" महाराज ! या वेळीं झाल्यागेल्या गोष्टी मनांत आणतां कामा

नयेत. द्राविड आणि गुर्जराधिपतीच्या मैत्रीची गोष्ट न काढणेंच बरें ! '' गर्गदेव म्हणाले.

'' मंत्री ! आपण युवराजांसह नगराबाहेर त्यांना सामोरे जा. मी नगरांत राहून त्यांच्या आदरातिथ्याची एकंदर व्यवस्था बघतो. प्रभु, एकंदर मिळून त्यांची कितीशी सेना आहे ? '' महाराजांनीं प्रश्न केला.

'' दोन हजारांपेक्षां जास्त नाहीं. '' संन्याशानें प्रत्युत्तर दिलें.

गर्गदेव व युवराज धर्मपाळ तेथून जावयास निघाले. तोंच त्यांना थांबवून संन्याशी म्हणाला, '' थांबा, उभें रहा. मीहि तुमच्याच बरोबर येतो. ''

विस्मयचकित होऊन गोपाळदेवानीं विचारलें, '' आपण कशासाठीं परत जातां प्रभु ?''

'' कांहीं विशेष कारणास्तव मला जाणें भाग आहे. '' संन्याशी उत्तरला.

गोपाळदेवांनीं यानंतर जास्त कांहीं विचारलें नाहीं. गर्गदेव, धर्मपाळ व संन्याशी तिघेहि सभागृहांतून बाहेर पडले. त्या दिवशी दरबारचें काम पुढें चालले नाहीं.

## १२

दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं सूर्योदयापूर्वीच सभागृह लोकांच्या गर्दीनें अगदीं चिक्कार भरून गेलें. अनेक देशोदेशीच्या नृपाळांच्या आगमनाची वार्ता समजतांच गौडवासीजन कुतूहलानें सभागृहांत जमले होते. सभामंडपाच्या मध्यभागीं उंच बैठकीवर आठ सुवर्णानें मढविलेलें सिंहासनें होती. त्याचप्रमाणें अधिकारीवर्ग आणि राजपुरुषांसाठीं व्यवस्थित रीतीनें दुसरी आसनें मांडण्यांत आली होती. महाप्रतिहार आणि नगरपालासमवेत वृद्ध मुख्य अमात्य गर्गदेव सर्व गोष्टींकडे लक्ष पुरवित सभागृहांत एकसारखा हिंडत होता. हळूहळू राजपुरुष आणि अधिकारीवर्ग एकामागून एक येऊन आपापल्या स्थानीं विराजमान झाले.

सभामंडपाच्या बाहेर ही मौज पहावयास असंख्य नागरिक आलेले होते. गौडीय सेनेची छोटीमोठीं पथकें येऊन शिस्तीनें उभी राहिलीं. या पथकावरील अधिकारी राजमार्गांवरील गर्दी मागें लोटण्याचा प्रयत्न करीत होते. त्यानंतर विदेशी सैन्याच्या कांहीं तुकड्या आल्या व त्या गौडीय सेनेच्या मागें ओळीनें उभ्या राहिल्या. अगदीं शांतपणें व मित्रभावानें उभी राहिलेली ती विदेशी फौज पाहून गौडवासीयांना भारी मौज वाटली.

सूर्योदयानंतर एक तास उलटल्यानंतर महाराज गोपाळदेव सभागृहाच्या दाराशीं येऊन ठेपले. त्यांना आलेले पाहतांच नागरिकांनीं आणि सैन्यानें एकच जयजयकार केला. हत्तीच्या अंबारींतून गोपाळदेव द्वारापाशीं उतरले. नंतर देशीविदेशी सैन्याची पथकें सभागृहाच्या चारी बाजूला वर्तुळाकार उभीं राहिली. हा प्रकार पाहून गोपाळदेव कांहींसें उद्विग्न झाले. अमात्य गर्गदेवाला त्यांनीं आपल्याजवळ बोलावून विचारले,

" मंत्रीश्रेष्ठ ! जमलेल्या राजांचे सैन्यबल एकंदर कितीसें आहे ? "

" दोन हजारांपेक्षां जास्त नाहीं. " गर्गदेवानें उत्तर दिलें.

" गोवर्धनमठांतून आलेली संन्याशांची फौज किती असेल ? "

" सुमारें एक हजार. "

" आपली एकंदर फौज या ठिकाणीं किती आहे ? "

" घोडेस्वार व पायदळ मिळून पंधरा हजारांहून थोडी अधिक असेल. "

" गुप्त हेरांमार्फत वारंवार बातम्या येताहेत ना ? "

" होय महाराज ! त्यासंबंधीं एकंदर व्यवस्था मी केलेली आहे. चारी बाजूंच्या खबरा मला वारंवार मिळत आहेत. आपण अगदीं निर्धास्त असावें. येथें जमलेल्या राजांच्या आगमनाचें खरें कारण जरी आम्हांला अद्यापि कळलेले नाहीं, तरी त्यांच्या मनांत कांहीं एक दुष्ट हेतु नसावा एवढें मात्र खास !

शिवाय त्यांच्या समवेत असलेल्या मूठभर फौजेला प्रसंग आल्यास आपली सेना पराभूत करील. नंदकुमार आणि पराक्रमसिंहास वाक्पाळ, सैन्य घेऊन तयारीनिशी सज्ज आहेत, नगरद्वाराच्या रक्षणाचा भार मीं

वचनपाळावर सोंपविलेला आहे. त्याचप्रमाणें ज्या ज्या नागरिकांना शस्त्र-विद्येचें शिक्षण देण्यात आलें आहे, तेहि सशस्त्र या ठिकाणी हजर आहेत."

हें ऐकून महाराज गोपाळदेवांच्या चित्तास समाधान वाटले, परंतु त्यांच्या मनांतील दुश्चिता मात्र कांहीं केल्या दूर जाईना. गर्गदेवानें पुन: सभामंडपांत प्रवेश केला, तोंच एक सैन्यार्मा द्वारापाशी येऊन घोड्यावरून खाली उतरला. तो आनंदानंद आहे असें महाराजानीं तत्काळ ओळखून त्याला विचारलें, " काय समाचार आहे ?"

त्यानें उत्तर दिलें, " महाराज ! अद्यापि आपण दरवाजांतच असे उभे कां ? "

" प्रभु विश्वेश्वरानंदांनीं येणाऱ्या भूपतींच्या स्वागतार्थ येथेंच रहा-वयास मला सांगितलेलें आहे."

" नाहीं, तसें करण्याचीं कांहीं आवश्यकता नाहीं. त्यांना यावयाला अद्यापि बराज अवधि आहे. आपण सभागृहांत जाऊन आसनस्थ व्हावें. युवराज या स्थळीं आहेतच; राजे येऊं लागतांच आपणांस लगेच वर्दी देण्यांत येईल. "

इतकें म्हणून आनंदानंद तेथून पुन: परत निघून गेला. गोपाळदेव मंडपांत येऊन आपल्या सिंहासनावर बसले. राजदर्शन न घडल्यामुळें आदल्या दिवशीं ज्यांची निराशा झाली होती, ते एकामागून एक पुढें होऊन राज-दर्शन घेऊं लागले. दिवसाचा पहिला प्रहर उलटून गेल्यावर मंगलवाद्यें वाजूं लागलीं. तीं ऐकताच नगरवासीजन मोठ्या उत्साहानें जयघोष करूं लागले. तो कोलाहल कानीं येतांच महाराजांनीं अस्वस्थ चित्तानें काय प्रकार आहे तो पाहून येण्यासाठी आपल्या एका विश्वासू अनुचरास गर्गदेवांकडे पाठविलें.

मंत्री गर्गदेव बाहेरून सभागृहांत प्रवेश करणार तोंच सर्व सभासद उठून उभे राहिले. प्रथम ढेकरीचे राजे प्रमथसिंह आणि दंडभुक्तीचे राजे रणसिंह सभामंडपांत येऊन दाखल झाले. त्यांना आलेले पाहतांच महाराज गोपाळदेव आपल्या सिंहासनावरून उठले. त्यांच्या मागोमाग वृद्ध भीष्मदेव आणि महाबलवान जयवर्धन आंत आले. त्यानंतर तरुणवयाचा कमळसिंह

आणि शरीरानें दुर्बळ असा वीरदेव या दोघांनीं प्रवेश केला. या सर्वां-मागून स्वामी विश्वेश्वरानंद आणि युवराज धर्मपाळ यांनीं सभागृहांत प्रवेश केला. महाराज गोपाळदेव तांतडीनें सिंहासनाच्या पायऱ्या उतरून खालीं येणार, तोंच राजा प्रमथसिंह त्यांस संबोधून म्हणाला, " महाराजाधिराज ! आपण सिंहासनाखालीं उतरूं नका."

विस्मयचकित दृष्टीनें गोपाळदेवांनीं प्रश्न केला, "कां बरें, महाराज?"

" तसेंच महत्त्वाचें कारण आहे."

उभ्या उभ्या गोपाळदेव म्हणाले, " शिष्टाचाराला असें करणें शोभेल काय महाराज ? आज आपण सर्वजण माझ्या द्वारीं येऊन मला पावन केलेलें आहे. असें असतां मीं सिंहासनाखालींहि न उतरणें अधमपणा होईल नाहीं का ?"

प्रमथसिंहानें अधिक कांहीं न बोलतां सिंहासनाजवळ येऊन वृद्ध भीष्म-देवांच्या साह्यानें महाराज गोपाळदेवांना बळजबरीनें परत त्यांच्या जागीं आणून बसविलें. पण अजूनहि बसावयास गोपाळदेव कांकूं करूं लागले; तेव्हां सर्व राजांनीं ओळीनें उभें राहून आपापल्या तरवारी निष्कोषित केल्या व त्यांचा आपल्या ललाटांना स्पर्श करून त्या गोपाळदेवांच्या पायावर ठेवल्या. गोपाळदेवहि असें करणार तोंच स्वामी विश्वेश्वरानंदानें त्यांना तसें करूं दिलें नाहीं. त्यानंतर सर्व राजे एकच स्वरांत म्हणाले, " महा-राजाधिराजांचा विजय असो ! "

गौडीय आणि विदेशी सेनेनें याच शब्दांची गगनभेदी पुनरावृत्ति केली. महाराजांच्या पाठीमागें अमात्य गर्गदेव आणि युवराज धर्मपाळ दोघेहि उभे होते. कोलाहल जरा शांत होतांच विश्वेश्वरानंद धर्मपाळाला उद्देशून म्हणाला, " युवराज ! छत्र घेऊन या. "

निद्रेंतून खडबडून जागृत झाल्याप्रमाणें युवराजानें प्रश्न केला, " प्रभु छत्र कोठें आहे ?"

विश्वेश्वरानंद उत्तरले, " दरवाज्यापाशीं आनंदानंदाजवळ जा, तें लवकर घेऊन या. "

मंत्रमुग्धाप्रमाणें धर्मपाळ बाहेर निघून गेला.

गोपाळदेव पाषाणप्रतिमेसारखे सिंहासनावर अर्धवट बसून होते. त्यांच्याजवळ जाऊन भीष्मदेव दोन्ही हात जोडून म्हणाला, " महाराजाधिराज ! मी गौडच्या सामंतातर्फे आपल्या आश्रयाची याचना करीत आहे. देशांत अराजकता माजली आहे, जुनाट राजवंशीयांचा लोप झालेला आहे व चोर दरोडेखोरांपायीं देश उजाड मरूभूमीप्रमाणें बनलेला आहे. अशा वेळीं आपण आश्रय न दिल्यांस देशाची स्थिति याहूनहि विकट होणार आहे. "

इतकें म्हणून वृद्ध भीष्मदेवानें आपला भरजरी मंदिल डोक्यावरून उतरून तो गोपाळदेवांच्या चरणांवर ठेविला. त्याचेंच अनुकरण इतर राजांनींहि केलें.

गोपाळदेव धडधडत हृदयानें सिंहासनावरून बसून क्षीण स्वरांत म्हणाले, " भीष्मदेव ! वयोमानानें आणि बुद्धीनें आपण मजपेक्षां किती तरी पटीनें श्रेष्ठ असून आज हे काय आरंभिले आहे ?"

भीष्मदेवानें उत्तर दिलें, " महाराजाधिराज ! वृद्धावस्थेमुळें मी आतां क्षीण झालों असल्यामुळें आत्मरक्षण करावयास असमर्थ आहे. एवढ्यासाठीं तर आत्मरक्षणाचा हा मार्ग धुंडावा लागला. "

संन्यासी विश्वेश्वरानंद सिंहासनाजवळ येऊन म्हणाला, " महाराजाधिराज ! देशांतील हे सर्व राजे आपल्याकडे आज आश्रयदान मागत आहेत त्यांची ही विनंति आपण अमान्य करणार काय ?"

गोपाळदेवांनीं उत्तर दिलें, " प्रभु ! हें स्वप्न कीं सत्य याचाच मला नीटसा उलगडा होत नाहीं. "

" स्वप्न नव्हे, अगदीं सत्य वस्तुस्थिति ! "

गोपाळदेव सिंहासनावरून उठून म्हणाले, " आपण सर्वांनीं अगोदर आसनस्थ व्हावें अशी माझी विनंति आहे. "

" पण प्रथम आमची विनंति मान्य झाल्याचे आपणांकडून कळलें पाहिजे. " वृद्ध भीष्मदेव गंभीर वाणीनें म्हणाला.

" भीष्मदेव ! " गोपाळदेव म्हणाले, " आपण ही अन्यायमूलक गोष्ट करीत आहांत; अहो, आपण सर्व एकाहून एक पराक्रमी आणि शक्ति-

शाली आहांत. त्याचप्रमाणें योग्यतेंतहि मजपेक्षां कांकणभरहि कमी नाहीं. असे असतां मी कोण आपणांला आश्रय देणार ?"

"महाराजाधिराज ! आम्ही आपसांत झगडण्यांत जरी कुशल असलों, तरी आत्मरक्षण आमच्यानें होणार नाहीं अगर करवणार पण नाहीं, ही गोष्ट निर्विवाद आहे. आम्ही देशांतल्या देशांत एकमेकांना लुबाडूं पण विदेशी सैन्याशीं सामना आमच्यानें देववणार नाहीं. देशांत हल्ली एकमुखी राजसत्ता नसल्याकारणानें सर्वत्र अंदाधुंदी, बेबंदशाही आणि बजबजपुरी माजलेली आहे."

"मग याला मी काय करूं शकणार ?"

"आम्हांला आश्रय देऊन आमच्या रक्षणाचा भार आपण आतां शिरावर घ्यावयास हवा."

"तितकें सामर्थ्य माझ्यांत आहे कां ?"

मागून स्वामी विश्वेश्वरानंद म्हणाला, "निःसंशय !"

क्षणभर विचार करून गोपाळदेव फिरून म्हणाले, "आपण सर्व एकत्र झाल्यावर विदेशी हल्ल्यापासून आपले रक्षण नाहीं कां व्हावयाचें ?"

मंद हास्य करून विश्वेश्वरानंद म्हणाला, "नाहीं, कदापि नाहीं. कामरूपच्या सेनेनें येऊन जेव्हां वरेंद्र मंडळ, ( उत्तर वऱ्हाड ) प्रदेश बेचिराख केला, तेव्हां जयवर्धन आणि प्रमथसिंह यांनीं त्या वेळीं जसें राज्याचें रक्षण केलें होते, त्याचप्रमाणें होईल कदाचित् !"

हें ऐकून जयवर्धन आणि प्रमथसिंह या दोघांनीं लज्जेनें आपल्या माना खालीं घातल्या. विश्वेश्वरानंद पुढें म्हणाला, "आणि जेव्हां हर्षदेवाचा युद्धांत पराजय झाला. त्यावेळीं गौडच्या सर्व राजांनीं एकत्र होऊन कसें युद्ध केलें, याची जाणीव महाराज गोपाळदेवांना असेलच !

गुर्जरेश्वर जेव्हां आर्यावर्ताच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत गांवेंचीं गांवें उध्वस्त करीत चालता झाला, तेव्हां त्याला अटकाव करण्याची छाती कुणाला झाली होती कां ?"

कोणीहि यावर उत्तर दिलें नाहीं. तेव्हां संन्यासी पुढें बोलूं लागला, "त्याला अडविण्याची ज्या वीरानें कंबर बांधली, त्याच्याच आश्रयाची आज सर्व राजांना गरज आहे."

हें ऐकतांच सर्व सभासदांनी एकच जयघोष केला. कोलाहल ओसर-ल्यानंतर गोपाळदेव म्हणाले, " मी पुष्कळ दिवसांपासून गौडीय सेनेचें आधिपत्य भोगीत आलों आहें. त्याचप्रमाणें मला माझें शेष आयुष्य त्यांतच कंठूं द्याल तर बरें होईल. "

संन्याशी म्हणाला, " असें होणें शक्य नाहीं. आपण स्वत: भीमपरा-क्रम गाजविला, परन्तु वीरदेवानें रणांगणांतून पळ काढल्यामुळें त्यावेळीं गुर्जरेश्वराला गौडीय सेनेचा पराभव करतां आला. राष्ट्रकूटाधिपति ध्रुव जर त्यावेळीं साह्यार्थ न धांवता, तर गौड देशाचें आज नांवनिशाणहि शिल्लक न राहतें. संपूर्ण देशावर जोंपर्यंत आपली एकछत्री हुकमत चाल-णार नाहीं, तोंपर्यंत परकीय हल्ल्यांपासून देशाचें रक्षण होणें दुर्लभ ! "

" प्रभु ! सम्राटाच्या वंशजांपैकीं कोणी शिल्लक राहिलेलें नाहीं कां ? " गोपाळदेवांनीं प्रश्न केला.

" गोपाळदेव ! प्राचीन गुप्तवंशाचा आतां लोप झालेला आहे. यशो-वर्म्याच्या हातून जेव्हां पाटलीपुत्राचा नाश झाला, तेव्हां गुप्त वंशांतील एकूणएकाचा त्यानें शिरच्छेद केला. गुप्त सम्राटाच्या मस्तकावर धरा-वयाचीं दोन शुभ्र छत्रें हा वेळपावेंतों गदाधराच्या मंदिरांत पडून होती. छत्राला जडविलेल्या सूवर्णमणिमुक्तांच्या लोभाखातर चन्द्रत्रेयाधिपति गरुडध्वजानें हीं छत्रें फाडून काढली. यावेळीं सम्राटाचें सिंहासन अनाथ आहे. राजवाडा जनशून्य असून पाटलीपुत्रनगरी स्मशानासारखी भयाण दिसूं लागली आहे ! " संन्याशानें अधिक स्पष्टीकरण केलें.

" पण आतां त्या वंशांत कोणीच का राहिलें नाहीं ? प्रभु. "

" नाहीं, कोणीहि नाहीं. " संन्याशानें उत्तर दिलें.

भीष्मदेव पुन: म्हणाला, " महाराजाधिराज, आत्मरक्षण करावयास आम्ही अगदीं नालायक आहोंत. तेव्हां आपल्या आश्रयाची भीक आम्ही मागत आहोंत. "

कांहीहि उत्तर न देतां गोपाळदेव स्तब्ध राहिले.

इतक्यांत धर्मपाळ छत्रासह परत आला. प्रमथसिंह दोन्ही जीर्ण छत्रें महाराज गोपाळदेवांच्या मस्तकावर धरून उभा राहिला. जयवर्धन आणि वीरदेव यांच्यावर चामर ढाळूं लागले.

विश्वेश्वरानंदानें सुवर्णकलशांतून गंगाजल आणून तें त्यांच्या मस्तकावर शिंपडलें. सर्व सभासदांनीं उच्च स्वरांत जयजयकार केला आणि शेकडों शंखनादांनीं अन्तःपुर गजबजून गेलें.

अशा रितीनें गोपाळदेव सम्राटपदावर अधिष्ठित होऊन, चित्रफलकावर कोरलेल्या चित्राप्रमाणें सिंहासनावर तटस्थ बसुन राहिले.

• •

## १३

उत्तररात्रीं धर्मपाळ अत्यंत श्रमित होऊन गाढ झोपी गेला होता. राज्याभिषेकाच्या उत्सवप्रसंगीं त्याला भारी परिश्रम करावे लागलें होते. त्यामुळें अगदीं थकून जाऊन सभामंडपांतील एका आसनावर पडल्यापडल्या त्याला झोपेनें घेतले होतें. त्याच्या आसपास जमिनीवर हंतरलेल्या सतरंजांवर परिचारक, प्रतिहारी आणि दंडधारीहि अस्ताव्यस्त झोंपीं गेलें होतें. संपूर्ण राजधानींत अगदीं निस्तब्धता आणि प्रगाढ शांति पसरली होती.

राजमहालांतील बरेचसें दिवे आतां मालवण्यांत आलें होतें. त्यामुळें सगळीकडे मंद प्रकाश दिसून येत होता.

अशा वेळीं सभामंडपांत एका दीर्घकाय पुरुषानें मंद पावलानें प्रवेश केला व तो धर्मपाळ झोंपीं गेला होता त्या स्थानीं आला. नन्तर त्यानें हातानें हलवून धर्मपाळाला जागृत केलें. निद्रेच्या गाढ भरांत असल्यामुळें बराच वेळपर्यंत धर्मपाळ कांहीं झोंपेंतून जागा झाला नाहीं. शेवट त्या पुरुषानें जेव्हां मोठ्यानें गदगदा हलवून नांवानें हांक मारली, तेव्हां खडबडून जागें होऊन त्यानें विचारलें, " कोण आहे ? "

अस्फुट स्वरांत उत्तर मिळालें, " धर्मपाळ ! मी आहे. "

युवराज लगबगीनें उठून पहातों तों स्वामी विश्वेश्वरानंद पुढ्यांत उभे ! तेव्हां विस्मयचकित होऊन धर्मपाळानें त्यास म्हटलें,

" प्रभु ! एवढया रात्रीं आपण स्वत: इकडे येऊन मला कां उठविलेंत ? कांहीं अनिष्ट प्रकार तर नाहींना ?"

स्वामींनीं हंसून उत्तर दिलें, " नाहीं, तसा कांहीं एक प्रकार नाहीं. सर्व कांहीं ठीक आहे. पण धर्म ! आतां तुम्हांला मजबरोबर एके ठिकाणीं यावें लागणार आहे. मुखावाटें शब्दोच्चारहि न करतां निमूटपणें माझ्या बरोबर चला पाहूं !"

दोघेहि मंद पावलांनीं कांहीं न बोलतां सभागृहाच्या बाहेर पडले व गौड नगरीच्या राजमार्गावर येऊन पोहोंचलें.

अन्धारांत मुख्य राजमार्ग ओलांडुन ते हळूंहळूं भागीरथीच्या कांठीं येऊन पोहोंचलें. विश्वेश्वरानंदानीं तेथे येतांच बांसरी वाजविली. तीं ऐकतांच नदीकिनारी असलेल्या एका आम्रवृक्षाच्या आडून एक लहानशी नौका निघाली व ती टाजवळ येऊन पोंहोंचली. नंतर विश्वेश्वरानंद-स्वामींनीं त्यांत बसावयास धर्मपाळाला सांगितलें. तेव्हां विस्मयानें युव–राजानें प्रश्न केला, " प्रभु ! आपणाला या वेळीं कोठें जावयाचें आहे? "

संन्याशानें गंभीर स्वरांत उत्तर दिलें, " आपणांला नगराबाहेर चलावयाचें आहे, हें एकवार तुम्हांला सांगितलें आहेच ! "

" प्रभु ! पहांट होण्याला आतां फारसा अवधि उरलेला नाहीं, तेव्हां पिताजींनीं माझी चवकशी केल्यास कसें होणार ?"

" राजसभा भरण्यापूर्वींच आपण परत येऊं. "

" पण मातोश्रींना तरी निरोप पाठविल्यास बरें नाहीं कां होणार?"

" धर्मपाळ ! तुम्हांला माझा अविश्वास वाटतो कीं काय ?"

" तसे नव्हे, प्रभु !"

" तर मग निमुटपणें नौकेत बसा पाहूं !"

युवराज व संन्याशी दोघेहि नौकेंत बसले. त्याबरोबर नौका हांकारण्यांत आली. गौड नगरींतील शेंकडों घाट पसार करीत ती लहानशीं नांव एका पुरातन घाटाजवळ येऊन उभी राहिली. नावाड्यांना घाटावर थांबण्यास सांगून धर्मपाळाचा हात धरून विश्वेश्वरानंद किनाऱ्यावर उतरले आणि चालूं लागले, थोडया वेळांत एका विवक्षित स्थळीं येतांच ते एका दादरावरून एका जीर्ण अट्टालिकेच्या आंत शिरले.

ती अट्टालिका अन्ध:कारमय व जनशून्य होती. तिची दारें व जीर्ण खिडक्या सताड उघड्याच होत्या. ही जागा स्वामींच्या चांगल्या परिचयाची असावी असें दिसत होतें, कारण धर्मपाळाचा हात धरून ते बेधडक अनेक दालनें व खोल्या ओलांडून आडवी तिडवी वळणें घेत पुढें चालत होतें.

अशा प्रकारें कांहीं वेळ चालल्यानंतर ते एका जागीं थबकलें. धर्मपाळानें हातानें चाचपून पाहिले, तों समोर त्याला एक भिंत असलेली आढळली. त्या भिंतीला एखादा चोर दरवाजा आहे कीं काय हें शोधून काढण्याचा दोघांनीहि फार प्रयत्न केला. परन्तु त्यांना तो कांहीं सांपडेना. मात्र चौफेर फिरल्यानंतर ती भिंत एखाद्या खोलीचीच असली पाहिजे, असे त्यांस खात्रीपूर्वक वाटूं लागले, आतां ज्या मार्गानें ते या जागीं येऊन पोहोंचलें होते, तो मार्गही कांहीं केल्या त्यांना मिळेना !

हा प्रकार पाहून संन्याशी विश्वेश्वरानंद विस्मयचकित झाले. इतक्यांत त्यांच्या पाटीमागें कोणीतरी मोठ्यानें खदखदां हंसण्याचा आवाज त्यांच्या कानांवर आला. तो ऐकतांच धर्मपाळ कांहींसा घाबरला. स्वामींनी तीव्र स्वरांत प्रश्न केला, " कोण आहें ?"

अन्धारांतून उत्तर मिळाले, " मी ! "

" तूं कोण ?"

" मी ! "

" तुझे नांव काय ?"

" माझ्या नांवाशीं तुम्हांला काय करावयाचें आहे ? पण तुमचें तरी नांव कळूं द्या ! "

" माझे नांव चक्रराज विश्वेश्वरानंद. "

" आणि बरोबर कोणाला घेऊन आलां आहांत ?"

" मणिदत्तांच्या उत्तराधिकाऱ्यास. "

" त्याचें नांव ?"

" युवराज भट्टारक धर्मपाळदेव."

" हें खरें कशावरून ? यास साक्ष कोण ?"

" मी–चक्रराज विश्वेश्वरानंद. "

अकस्मात् खोलींतील अंधःकार नाहींसा होऊन तीव्र निळ्या प्रकाशानें ती खोली प्रकाशित झाली. त्या प्रकाशांत त्या विशालगृहाच्या एका कोंपऱ्यात आपण उभे आहोंत असें दोघांनाहि आढळून आलें. गृहाच्या एका बाजूला देवमूर्तिच्या सन्मुख एक ठेंगणा जीर्णदेहधारी वृद्ध उभा होता. त्या देवमूर्तिच्या मागील बाजूनें तो देदीप्यमान निळ्या रंगाचा प्रकाश चारी बाजूला पसरला होता. दोघांचीहि या वेळची मनःस्थिति लक्षांत येतांच वृद्ध खदखदां हंसून म्हणाला, " भिऊं नका, या बाजूला या."

दोघेहि पुढें होऊन देवप्रतिमेच्या सन्मुख येऊन उभे राहिले.

वृद्ध त्यांना म्हणाला, " आधीं देवाला नमस्कार करा पाहूं ! "

दोघांनींहि त्याप्रमाणें प्रणाम केल्यानंतर वृद्ध युवराजाला उद्देशून म्हणाला, " आपण मणिदत्ताचे कोणी आप्त लागतां काय ? "

धर्मपाळानें उत्तर दिलें, " नाहीं. "

" तर मग मणिदत्ताच्या धनावर तुमचा अधिकार कसा पोंचतो?"

" तें त्यांनीं अंतःकाळीं मला दिलेलें आहे." युवराज उत्तरले.

" कशासाठीं ?"

" तें मला माहित नाहीं. "

" तुम्हीं त्यांच्यावर कांहीं उपकार केला होता काय ? "

" नाहीं, तसेंच कांहीं म्हणतां यावयाचें नाहीं."

" खोटी गोष्ट ! "

अकस्मात् खोलींतील तो उज्जल प्रकाश नाहींसा झाला. घोरतम अंधारांतून पुनः शब्द ऐकूं आले, " खोटी गोष्ट ! "

स्वामी विश्वेश्वरानंद अंधारांत युवराजाला संबोधून म्हणाले, "धर्मपाळ ! मणिदत्तांच्या अंतकालीं तुम्ही त्यांच्या तोंडांत पाणी घातलें नव्हतें काय ?"

" होय, होय, ती गोष्ट मी साफ विसरून गेलों होतों. "

अंधारांतून पुनः शब्द झाला, " तर मग खोटें बोलण्याचें काय प्रयोजन होतें ?"

" मुद्दाम म्हणून मी कांहीं खोटें बोललों नाहीं. पण मला त्या गोष्टींची आठवण राहिली नव्हती. "

पुन: निळसर रंगांचा उज्वल प्रकाश खोलीभर पसरला. तेव्हां तो वृद्ध अद्यापिहि त्याच जागीं उभा असल्याचें त्या दोघांच्याही दृष्टीस पडले. त्यासरशीं ते दोघेहि भारी आश्चर्यचकित झाले. त्यांच्या बोलावण्यावरून आतां दोघेहि त्या देवमूर्तीच्या मागील बाजूकडे गेले. वृद्धानें ती देवप्रतिमा सारखी समोर धरली. त्याबरोबर तक्तपोशीचा एक दगड बाजूला सरकून त्या ठिकाणी एक जिना दिसूं लागला. त्या जिन्यावरून तो वृद्ध तळघरात उतरूं लागला व त्यानें आपल्यामागून येण्यासाठीं त्या दोघांनाहि खूण केली. ती पाहून धर्मपाळ अर्थसूचक दृष्टीनें स्वामींच्या मुखाकडे पाहूं लागला. स्वामींनी इशारतीनें त्याला आपल्या मागोमाग येण्याविषयीं खुणाविलें. तिघेहि तळघरात येऊन पोहोंचतांच जिन्यावरील सरकलेला तो दगड पुन: जशाचातसा आपल्या स्थानीं आला.

आतां आपण एका दगडांनीं बांधलेल्या भव्य तळघरांत उतरलों आहों हे संन्याशी व धर्मपाळ या दोघांनाही कळून आले. तेथें येण्याला त्या जिन्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता. तळघराजवळच बाहेर वाहत असलेल्या पाण्याचा खळखळाट ऐकूं येत होता. आणि त्या तळघराच्या कडेकडेला पाणी थोडेथोडें पाझरत असलेलें दिसत होतें. त्या तळघरांतहि चक्क निळा प्रकाश पसरला होता. तो वृद्ध त्या तळघरांच्या मधोमध उभा राहिला होता.

संन्याशी आणि धर्मपाळदेव यांनीं तळघराच्या चारी भिंती नीट तपासून पाहिल्या, परंतु धनराशीचा थांग कांही त्यांना लागेना. वृद्धानें त्यांची ही मन:स्थिति ओळखून मंद हास्य करून म्हणलें, " कसला विचार करतां आहां आपण ? मणिदत्तांनी खोटेंच सांगितलें अशी का आपली समजूत आहे ? या ठिकाणी इतकें अगणित द्रव्य आहे कीं, त्यापुढें कुबेराचें भांडारही फिके पडेल ! "

स्वामी विश्वेश्वरानंदांनीं विस्मयचकित होऊन विचारलें, " पण येथें तर आम्हांला त्यापैकीं कांहींहि दिसत नाहीं. "

वृद्धानें मंद हास्य करून उत्तर दिले, " मणिदत्त धोरणी व्यापारी होते. तेव्हां आपलें वडिलोपार्जित धन सहज लोकांच्या दृष्टीपुढें येईल असें ठेवतील ही गोष्ट आपणांला संभवनीय वाटते काय ? "

" मग आम्हांला येथें निष्कारण बोलावून आणण्याचें प्रयोजन काय ?" किंचित् रागावून युवराजांनी विचारलें.

वृद्धानें संथपणें उत्तर दिलें, " थांबा, सांगतों काय तें !"

इतकें म्हणून वृद्धानें तळघराच्या भिंतीपाशीं जाऊन एका दगडावर जोरानें मुष्टिप्रहार केला. त्यासरशीं भिंतींतील गुप्त लोखंडी द्वार चटकन् उघडलें गेलें. त्या द्वारामागें एक फार मोठी पण जीर्ण अशी लोखंटी पेटी होती. वृद्धानें त्या पेटीचें झांकण उघडून दाखविलें, तों ती सुवर्णमुद्रांनीं भरगच्च भरलेली असें दोघांनाहि दिसून आलें. वृद्धानें भिंतीला असलेली दोन चार गुप्त द्वारें उघडून त्यांत ठेविलेल्या तीन चार संदुकाहि त्या दोघांना दाखविल्या. त्या सर्व हिऱ्यामोत्यांनीं भरलेल्या होत्या. हें विपुल धन पाहतांच स्वामी व युवराज दोघेहि अगदीं स्तंभित झाले. तदनंतर वृद्धानें तीं गुप्तद्वारें एकामागून एक बंद केलीं.

कांहीं वेळानंतर धर्मपाळानें संन्याशाला प्रश्न प्रश्न केला, " प्रभु ! हें सगळें धन येथून एकदम आपणालांला कसें नेतां येईल ? "

वृद्धानें मध्येंच विचारलें, " कुठें न्यावयाचे आहे ?"

" कां बरें, आमच्या घरीं." धर्मपाळानें उत्तर दिलें.

" नाहीं, तें तूर्त आपणांस मिळणार नाहीं."

" कां ? मणिदत्तांनीं तें मला दिलेलें आहे ना ? "

" हें द्रव्य संपादन करण्याची पात्रता अद्याप तुमच्या अंगीं आलेली नाहीं."

" मग काय केल्यानें ती पात्रता अंगी येईल म्हणता ? "

" जेव्हां परोपकार आणि देशहितैषि कार्यांत तुम्ही आपलें जीवन व्यतित करूं लागाल तेव्हां ही संपत्ति तुम्हांला प्राप्त होईल. "

" पण तें मला कसें कळणार ? "

" आपण होऊनच ! दुसऱ्यानें सांगण्याची कांही आवश्यकताच भासणार नाहीं. "

युवराजांनीं संन्याशाला संबोधून म्हटलें, " प्रभु ! बबरदस्तीनें हें द्रव्य जर आपण येथून नेलें तर हा वृद्ध काय करणार ? "

संन्यासी यावर उत्तर देणार तोंच तो वृद्ध गरजला, " खबरदार युवराज ! या ठिकाणीं शक्तीचा प्रयोग करूं पहाल, तर जिवंतपणें येथून आपली सुटका केव्हांहि होणें शक्य नाहीं ही गोष्ट पूर्ण लक्षांत ठेवा."

अकस्मात खोलीतील उज्वल प्रकाश नाहींसा झाला. अंधारांतच स्वामी विवेश्वरानंदांनीं धर्मपाळाचा हात धरून म्हटलें, " धर्म ! जास्त शहाणपणा दाखविण्याचें हे स्थळ नव्हे. त्या वृद्धाच्या साह्याशिवाय आपणांला येथून बाहेर पडता येणें शक्यच नाहीं."

धर्मपाळ नम्र स्वरांत उत्तरला, प्रभु ! शिरजोरपणानें हें मी मुळीं बोललोंच नाहीं ! सहज विचारलें ! "

पुन: खोलीभर चकचकित प्रकाश पडला. तेव्हां त्या प्रकाशांत वृद्ध त्याच जागीं उभा असलेला दोघांच्याहि दृष्टीस पडला. वृद्ध त्यांना उद्देशून गंभीर स्वरांत म्हणाला, " आतां निमूटपणें तुम्ही आपल्या वाटेनें परत जा पाहूं ! या ठिकाणी शिरजोरपणा करूं पहाल तर जाण्याचा मार्गहि आपणांला सांपडणार नाही हें पूर्ण लक्षांत ठेवा ! "

वृद्धाच्या मागोमाग दोघेहि चालूं लागलें. वृ ानें वर येतांच मूर्ति ज्या जागीं होतीं तेथेंच व्यवस्थित सरकवून त्या दोघांनाहि जाण्यास सांगितलें. आतां पूर्वीं ज्या कोनाड्यांत त्यांना द्वार सांपडत नव्हतें, तेथेंच एक द्वार असल्याचे त्या दोघांच्याहि दृष्टोत्पत्तीस आलें. दोघेहि त्या अट्टालिकेंतून एकदांचे सुरक्षित बाहेर पडले. बाहेर पडतांच त्यांनीं मागें वळून पाहिलें, तों उष:कालच्या अंधुक प्रकाशांत पूर्वीं पाहिलेल्या द्वाराचा मागमूसहि त्यांना दिसेना !

● ●

## १४

वाराणशी—नगरींत गंगेच्याकांठीं आदिकेशवच्या घाटावर एक ब्राह्मण स्नान उरकून गायत्रीमंत्राचा जप करीत बसला होता. यावेळीं दिवसाचा प्रहर उलटून गेला होता. सूर्याच्या प्रखर तापामुळें घाटाच्या पायऱ्याहि अतिशय तप्त झाल्या होत्या. आदिकेशवच्या मंदिरांत वारंवार घंटानाद होऊं लागला होता. शेंकडों यात्रेकरू पतितपावनी भागीरथीच्या पवित्र जलांत स्नान करून देवदर्शनार्थ मंदिराकडे लोटले होते. ब्राह्मणाच्या पाठी-मागें कांहीं अन्तरावर एक दंडधर उभ्या उभ्या यात्रेकरूंना सावधगिरीनें वागण्याविषयीं बजावीत होता. त्याच्याजवळच एक परिचारक रक्तवर्णाचें एक छत्र घेऊन उभा होता. घाटावर पिंपळाच्या वृक्षाखालीं असलेल्या एका दगडी फरशीवर एक योद्धा बसला होता.

ब्राह्मणाला अत्यन्त विलंब झालेला पाहून तो म्हणाला, “ महाराज! आणखी किती वेळपर्यंत आपण जप करीत बसणार ? आतां लौकर आटो-पाल तर बरें होईल ! हें पहा, इतक्या वेळांत बसल्या बसल्या माझ्या पायांत पेटकेहि येऊं लागले. ”

ब्राह्मणानें उत्तर न देतां कांहींशा रागीट मुद्रेनें त्याच्याकडे पाहिलें व पुनः तो आपल्या देवपूजेंत मग्न झाला. तेव्हां तो सैनिक कांहींशा रोष-युक्त स्वरांत म्हणाला, “ काशीत येऊन ब्राह्मणांची धर्मनिष्ठा बरीच बोकाळलेली दिसते. स्वदेशीं असतांत तर इतक्यांत जेवणावर तीनतीनदां हात मारून मोकळेहि होतां. ”

इतक्यांत एक प्रौढ व तरुण असे दोघेजण गंगेच्याकांठीं येऊन तेथील एका वृक्षाखालीं उभे राहिले. प्रौढानें म्हटले, “ आपण जर आतांच नदी ओलांडून पैलतीरीं जाल, तर कसलीहि विपत्ति येणार नाहीं. ”

दीन मुद्रेनें तो तरूण म्हणाला, “ जयसिंह ! अशा वेळीं नदीपार होऊन मी जाऊं तरी कुठे ? या वेळीं मी अगदींच असहाय्य स्थितींत आहे. मला आणखीहि एक दिवस वाराणशींत राहूं द्या ! ”

" युवराज ! आजपर्यंत मी आपल्या परमपूज्य पित्याच्या अन्नावर पोसलों गेलों आहे. म्हणूनच एक हितचिंतक या दृष्टीनें वाराणशी सोडून तत्काळ कोठें तरी निघून जाण्याविषयीं मी आपणांस सल्ला देत आहें. आपण नगरांत राहिल्यास आपणांवर केव्हां दारुण प्रसंग ओढवेल याचा कांहीं नेम नाहीं; आणि कदाचित् मीहि संकटांत येऊन पडेन. आपणांला हरप्रयत्नानें गिरफदार करण्याची राजाज्ञा झालेली आहे असे मी ऐकलें आहे. आपण नगरांतच आहांत, आणि ही गोष्ट मला माहीत असूनहि मी आपणांस कैद केलें नाहीं असे जर इंद्रराजांना कळेल, तर ते मला जीवेंच मारतील. गंगेच्या पैलतिरीं कान्यकुब्जाधिपतींचा अधिकार पोंचत नाही. तेव्हां तेथें जाऊन आपणांला सैन्य जमवितां येणें शक्य होईल. " जयसिंह म्हणाला.

" तर मग काय ? पितृराज्यांत वास करण्याचा मला अधिकार, नाहीं म्हणतां ? "

" काय सांगूं युवराज ! पण यावेळीं दैव आपणांस प्रतिकूल आहे. एवढी गोष्ट मात्र खरी ! "

" तर मग युवराज या नांवानें संबोधून माझा असा उपहास करूं नका जयसिंह ! केवळ अंगावरच्या वस्त्रानिशीं मी या वेळीं प्रतिष्ठान दुर्गांतून पलायन करून आलेंलों आहे. मजजवळ ना पैसा, की खायला अन्न ! अशा परिस्थितींत मी परदेशांत जावें तरी कोणत्या आधारावर ! मला वाटलें होते कीं, आपण नक्की आश्रय द्याल व एवढ्याचखातर मी वाराणशीला आपल्यापाशीं आलों. "

" युवराज ! मी एक साधारण नगरपाळ ! मी जरी श्रीमंत नाही, तरी मजपाशीं असलेल्या थोड्याशा द्रव्यसंग्रहापैकीं कांहीं मी आपणांला आनंदानें देतो. ते घेऊन आपण शक्य तितक्या लवकर कान्यकुब्ज देशाच्या हद्दीबाहेर निघून जावें हें बरें ? "

" पण मी एकटां कसा जाऊं ? "

" चक्रायुध ! आपण राजपुत्र आहांत; अस्त्रविद्येचें आपणांला

शिक्षण मिळालेले आहे. असे असून आपण इतके भितां कां ?"

जयसिंह ! वाराणशीक्षेत्र म्हणजे साक्षात् देवाधिदेव महादेवाचे निवासस्थळ ! या स्थळीं कोणाहि राजाचा अधिकार नाहीं. महादेवाच्या या नगरींत कोणीहि भुकेकंगाल रहात नाहीं अगर आश्रयहीन नसतो असे जें म्हणतात, त्यांत कांहीं तथ्य नाहीं का ? या विशाल पुण्यतीर्थांत हजारों भिक्षुक आणि लाखों यात्रेकरू यांची जर सोय होते, तर माझ्यासारख्या एका असहाय्य निराश्रिताला येथें आश्रय मिळणार नाहीं कां ? तसे जर असेल, तर फार खेदाची गोष्ट समजली पाहिजे !"

ब्राह्मणाचा जप यावेळीं संपून तो घाटावर येऊन पाहातों तों, तो सैनिक वरील संभाषण अगदीं लक्षपूर्वक ऐकत आहे. तो तरूण म्हणत होता, "हें पहा, जयसिंह ! वडिलोपार्जित राज्याचा त्याग करून माझ्याच्यानें येथून जाववत नाहीं. मी तर विश्वनाथाच्या पाषाणमूर्तीला घट्ट मिठी मारून येथेंच राहीन. आपण मला खुशाल कैद करून कान्यकुब्जाला पाठवून द्या. काशिविश्वनाथाचे देवस्थान जर खरोखरीचें जागृत असेल, तर यावेळीं साक्षात् देवाधिदेव महादेवच माझ्या रक्षणार्थ धांवून येईल !"

जयसिंह म्हणाला, "युवराज ! असा वेडेपणा करूं नका. आपण बाराणशींत राहिलांत तर येथें कोणीहि आपलें रक्षण करूं शकणार नाही. मी आपला हितैषी आहे. म्हणून सांगतों कीं, वाटेल तें करून आपण आत्ताच्या आत्तां वाराणशी सोडून जा."

इतक्यांत ब्राह्मणानें येऊन मध्येंच युवकाला विचारलें, "आपण कोण ? आणि यावेळीं कसल्या संकटांत आहांत ?"

अत्यंत दीनवाणीनें युवराज चक्रायुध म्हणाला, "आश्रयार्थ हिंडणारा मी एक कंगाल भिकारी आहे, महाराज ! या अफाट कान्यकुब्ज राज्यांत मला एकहि आश्रयस्थान उरलेलें नाहीं."

"कां बरें ?"

"एक दिवस मी या राज्याच्या युवराजपदावर आरूढ होतों; परन्तु आतां दैवदुर्विलासानें या राज्यांत रहावयास मला वीतभरहि जागा नाहीं."

युवकाच्या खांद्यावर हात ठेवून ब्राह्मणानें ममतापूर्वक स्वरांत आश्वासन दिलें. " भि ऊं नका. मी तुम्हांला आश्रय देईन. "

तो तरूण आणि जयसिंह दोघेंहि विस्मयचकित होऊन एकदम म्हणाले, " महाराज ! आपण कोण ?"

" मी गौडचा राजपुरोहित. माझें नांव शिवशंकरशर्मा. "

" आपण आश्रय दिल्यास गौडाधिपति आपणांवर रागावणावर नाहींत का " जयसिंहानें प्रश्न केला.

" आमचे गौडाधिपति म्हणजे कांहीं असे तसे सामान्य कोटींतले नाहींत. गोपाळदेवांचें तें पुत्र ! त्यांचे नांव धर्मपाळदेव ! आपण गोपाळ-देवांचें नांव कधीं ऐकलें आहे काय ?"

" होय महाराज ! ऐकलेले आहे. गौडच्या सर्व प्रजेनें मिळून त्यांची सम्राटपदावर योजना केलेली होती, असे आम्हीं ऐकिलेलें आहे. गुर्जराधिपतींनासुद्धां त्यांच्यापुढें कित्येकदां हार खावीं लागलेली आहे. "

तो तरुण ह्या वेळपर्यंत सचित मुद्रेनें खालीं मान घालून उभा होता. तो मध्येंच म्हणाला, " पूर्वपापाचें वैर मनांत आणून धर्मपाळदेव मला माझ्या शत्रूंच्या स्वाधीन तर नाहीं ना करावयाचें ?"

ब्राह्मण हें ऐकून दृढतापूर्वक म्हणाला, " युवराज ! महाराज धर्मपाळदेव अशा नीच वृत्तीचें नाहींत. त्यांचे हृदय अत्यंत थोर आहे. ते आपणांला आश्रय तर देतीलच, पण आपलें गमावलेलें राज्यहि आपणांला परत मिळवून देतील. "

विषादमय हास्य करून तो तरूण म्हणाला, " महाराज ! हें अगदीं असंभाव्य दिसते. समस्त आर्यावर्तांत माझ्यासारख्या अभाग्याला आश्रय देऊन इंद्रराजाचे वैर कोणी संपादन करील असे मला वाटत नाहीं. "

तरुणाचे हें निरुत्साजनक भाषण ऐकून आपल्या मनाचा दृढनिश्चय दर्शविण्याच्या हेतूनें ब्राह्मण नदीच्या पाण्यांत उतरून मोठ्यानें म्हणाला,–

" ऐका युवराज ! मी शिवशंकरशर्मा–गौडचा राजपुरोहि–गंगच्या या पवित्र जलांत उभा राहून काशीक्षेत्रांत विश्वेश्वराला साक्षी ठेवून अशी प्रतिज्ञा करितों कीं, गौडाधिपति धर्मपाळदेवांच्या मदतीनें मी आपलें गेलेले राज्य आपणांस परत मिळवून देईन."

ही प्रतिज्ञा ऐकतांच तो तरुण स्तंभित होऊन उभा राहिला. इतक्यांत हा वेळपर्यंत तेथेंच एका बाजूला बसलेला सैनिक त्या ब्राह्मणापाशीं येऊन म्हणाला, " महाराज ! आपण हें काय केलेंत ? मागचापुढचा विचार न करतां एवढी घोर प्रतिज्ञा केलीत, पण महाराज काय म्हणतील याचा कांहीं विचार केलांत का ? आपण लाडूजिलब्या यांवर हात मारण्यांतच काय ते पटाईत आहांत अशी माझी हा वेळपर्यंत समजूत होती; पण वाटेल ती प्रतिज्ञाहि करण्यांत आपला हातखंडा आहे हें मात्र आजच मला समजून आलें."

अतिशय गंभीर भावानें ब्राह्मण म्हणाला, " हें पहा नंदकुमार ! थट्टेलासुद्धां कांहीं काळवेळ असतो. सांगा पाहूं. ही गोष्ट थट्टेवारी नेण्याजोगी आहे का ? "

नंदकुमारानें यांवर कांहीं उत्तर दिलें नाहीं.

ब्राह्मण आणि सैनिक दोघेहि वाचकांना परिचितच आहेत. गोपाळदेवांना सम्राट्पदाचीं प्राप्ती झाल्यास आज तीन वर्षें लोटलीं होतीं, या तीन वर्षांच्या दरम्यात नूतन साम्राज्य अगदीं भक्कम पायावर उभारलें गेलें होतें. पूर्वेस कामरूप देश, उत्तरेस हिमाद्रीच्या पायथ्याकडील प्रदेश, दक्षिणेस महासमुद्र व पश्चिमेस शोण नदी अशा या नूतन साम्राज्याच्या चतुःसीमा होत्या, कल्याणीदेवीचा विवाह धर्मपाळदेवाबरोबर होण्याचें नक्की ठरलें होतें, परंतु हा वेळपर्यंत योग्य अवसर न मिळाल्याकारणानें विवाहसमारंभ लांबणीवर पडला, सध्यां गोपाळदेवांचा मृत्यु झाल्याकारणानें धर्मपाळदेव सम्राट्पदावर आरूढ झाले होते. पित्याच्या वर्षश्राद्धाकरितां मांडलिक राजांस निमंत्रण देण्यासाठीं त्यांनीं राजपुरोहित शिवशंकरशर्मा व नंदकुमार या दोघांची रवानगी केलेली होती. त्याप्रमाणें ते आपली कामगिरी संपवून परत गौडास येत असतां वाटेंत त्यांची युवराज चक्रायुधाशीं आकस्मिक गांठ पडली.

हर्षवर्धनाच्या मृत्यूनंतर कान्यकुब्जचें राज्य त्याच्या मामेभावास-भंडीस मिळालें होते. त्यांचा पुत्र आतां कान्यकुब्जाच्या सिंहासनावर आरूढ झाला होता. विक्रमसंवत् आठव्या शतकानंतर भंडीचा पुत्र इंद्रराज,

गुर्जराधीश वत्सराजाच्या सहाय्यानें आपल्या ज्येष्ठ भ्रात्याच्या लहानग्या मुलाचें म्हणजे चक्रायुद्धाचें राज्य कायमचें बळकावून बसला, व स्वतःच राजा म्हणून मिरवूं लागला. चक्रायुध वयांत आल्यावर कान्यकुब्ज देशांतून निसटला व सैन्याची जमवाजमव करून चुलत्यानें घशांत घातलेलें आपलें राज्य परत मिळविण्याचा प्रयत्न करूं लागला. वत्सराजाच्या साह्यानें इंद्रराजानें त्याचा लागोपाठ बरेच वेळां पराभव केला. शेवटीं निरुपाय होऊन गंगा व यमुना नदीच्या संगमावर असलेल्या प्रतिष्ठान दुर्गांत आश्रयार्थ राहिला. सहा सहा महिनें शिकस्तीचे प्रयत्न करूनसुद्धां जेव्हां कांहीं चालेना, तेव्हां चक्रायुध प्रतिष्ठानच्या दुर्गांतून बाहेर पडून वाराणशीला जेमतेम जीव बचावून आला. वाराणशीचा नगरपाळ जयसिंह त्याच्या पित्याच्या विश्वासु नोकर होता म्हणून तो कदाचित् आपणांस आश्रय देईल असें चक्रयुधाला वाटलें. तो ज्या दिवशीं वाराणशीला येऊन पोहोंचला, त्याच दिवशीं आदिकेशवाच्या मंदिराजवळ गंगेच्या कांठीं त्याची व शिवशंकरशर्म्याची वर दर्शविल्याप्रमाणें गांठ पडली.

विस्मयचकित होऊन अजूनहि युवराज चक्रायुध उभाच होता. जयसिंह शिवशंकरशर्म्यापाशीं येऊन म्हणाला, " महाराज! आपण खरे. ब्राह्मण! कार्याचे महत्त्व जो नीट ओळखील तोच ब्राह्मण! युद्धकार्यांत आजपर्यंत माझें काळयाचें पांढरे केंस झालेले आहेत, हातांत खड्ग घेऊन येथें तर उद्यां दुसरीकडे याप्रमाणे समस्त आर्यावर्तांत मी हिंडलों आहे. अनेक राजे आणि पुरुष माझ्या नजरेखालून गेलेले आहेत; परंतु आपल्या इतका धीरोदात्त व थोर हृदयीं ब्राह्मण मला यापूर्वी कोठेंहि आढळला नाहीं. शरणांगताचें रक्षण करणें हा मोठ्यांत मोठा धर्म आहे. हा तरुण कान्यकुब्ज देशाचा राजाचा पुत्र आहे—गादीचा खरा वारस आहे. तथापि आज त्यांस घांसभर अन्न घालील अगर रहावयास वीतभर जागा देईल असा एकहि ' मायेचा पूत ' नाहीं.

या युवराजांच्या वडिलांच्या अन्नावरच जरी या म्हाताऱ्याचा देह पोसला गेलेला आहे तरी या वाराणशींत यास एक दिवसाचाहि थारा देण्याची आज माझ्यांत शक्ति नाहीं. विश्वनाथाच्या या पुण्यमय नगरींत

अन्नपूर्णेचें भांडार सर्वांना सदा खुलें असतें. तरी पण या हतभागी राजपुत्राला उपाशींच येथून जीवरक्षणार्थ पलायन करणें भाग आहे. आज आपण त्यास आश्रय देऊन मोठें परोपकाराचें कृत्य केलेलें आहे. जगांत असे कृत्य करणारे फारच विरळा ! तथापि आपण माझें ऐका आणि इंद्रराजाच्या राज्यांत आलेल्या या काशिक्षेत्राचा आजच्या आज त्याग करा."

"आपले म्हणणें यथार्थ आहे. आम्ही आतांच येथून निघतो."

"विश्वनाथ आपलें मंगल करो ! युवराज चक्रायुध ! मजवर रागावूं नका. या वृद्ध जयसिंहानें आपलें मीठ खाल्लेले आहे. ही गोष्ट तो प्राणांतीहि विसरणार नाहीं. जर पुन: कधींकाळीं इंद्रराजाशीं आपलें युद्ध जुंपलें, तर हा जयसिंह आपणांला विसरून गेलेला नाहीं हें खास आपल्या दृष्टोत्पत्तीस येईल. त्या वेळीं माझी ही तरवार आपल्याचतर्फे रणक्षेत्रावर चमकेल."

अश्रुभरीत नेत्रांनीं चक्रायुधाला कडकडून मिठी मारून जड पावलांनीं वृद्ध जयसिंह तेथून निघून गेला. राजकुमार शिवशंकरशर्मा, नंदकुमार व चक्रायुध यांसह गौडाच्या मार्गास लागला. उत्तर प्रदेशांत चाललेल्या कूटराष्ट्रनीतीच्या स्थिर तडागांत याप्रमाणें अवचित एक मातीचें ढेंकूळ पडल्या कारणानें त्यांत अनेक लहरी उत्पन्न झाल्या; आणि त्यांतील एक तरंग गौडापर्यंत येऊन पोंहोंचला. दुसरा तरंग कान्यकुब्ज आणि भिल्लमाळला जाऊन थडकला. चक्रायुधाला गौडांत आश्रय मिळाला ही गोष्ट मारवाडांत वत्सराजाला व महोदयांत इंद्रराज उर्फ इंद्रायुधाला स्पष्ट कळून चुकली.

● ●

## १५

रात्रीचा चवथा प्रहर संपतांसंपतां गौड नगरांतील मधुसूदन घाटा-वर एक नौका येऊन उभी राहिली. त्यापूर्वीहि दुपारीं एक छोटीशीं नांव तेथें बांधून ठेवलेलीं होती. मोठ्या नौकेंतील नावाड्यांनीं ओरडून त्या लहानग्या नावेस तेथून बाजूला सरकण्यास सांगितलें. परन्तु त्या नावेंतील सर्वजण झोपेच्या भरांत असल्याकारणानें कोणासहि त्यांची हाक ऐकूं आली नाहीं. त्यामुळें मोठी नांव घाटापाशीं येऊन पोहोंचताच तिच्या जोराच्या धक्क्यानें त्या लहानग्या नावेला बांधून ठेवणारे दोरखंड तुटले आणि ती भागीरथी नदींत दूरवर जाऊन हेलकावे खाऊं लागली. पण तिचें दोरखंड तुटतांक्षणींच एक दीर्घकाय पुरुषानें तींतून किनाऱ्यावर उडी घेतलीं होती.

मोठ्या नावेंतून मशाल घेऊन दोघे नाविक खालीं उतरलें आणि पुढें चालूं लागले. दुसऱ्या दोघां नावाड्यांनीं नावेंतील एक छोटींशी शिडी घाटाचें पायऱ्यापर्यंत सोडली. तेव्हां त्या लांकडी शिडीवरून एक ब्राह्मण आणि त्याच्या मागून दोन शस्त्रधारी सैनिक खालीं उतरलें. त्यांच्या मागून तिघे चौघे परिचारक व आणखी कांहीं शस्त्रधारी सैनिक नावेंतून उतरून घाटाजवळील रस्त्यांत येऊन उभें राहिलें.

ज्या दीर्घकाय पुरुषानें छोट्या नावेंतून बाहेर उडी घेऊन आत्मरक्षण केलें होतें. तो घाटालगतच्या एका मंडपांत घोर अन्धारांत एका वृक्षाआड दडून उभा राहिला. आणि जेव्हां तो ब्राह्मण आपल्या बरोबर दोन शस्त्र-धारी योद्धे घेऊन घाटावर उतरला, तेव्हां दीर्घकाय पुरूष देवालयाच्या मंडपांत जाऊन छपून बसला.

घाटावरच मधुसूदनाचें मंदिर बांधलेलें आहे. त्या विशाल मंदिराचा गगनचुंबित घुमट गौड नगरापासून दहा गांवें दूर इतक्या लांबूनहि दिसत असे. घाटापासून निघालेला रस्ता मंदिराच्या द्वारापर्यंत आलेला होता. तो दीर्घकाय पुरूष अंधारांत छपून उत्सुकतेनें नवीन येणाऱ्या व्यक्तींचें संभाषण कान देऊन ऐकत होता.

ब्राह्मण म्हणाला, " युवराज ! महाराजांना आपण येणार असल्याची सूचना आगाऊ देतां न आल्यामुळें आपल्या स्वागतार्थ त्यांना येथें घेतां आलें नाहीं. जर आपल्या आगमनाची वार्ता आगाऊ त्यांना कळली, तर, ते जरूर या ठिकाणीं हजर राहते. तेव्हां मीच आतां त्यांच्याऐवजी कान्यकुब्जाधिपतींचा सत्कार करतों. यावें, कान्यकुब्जराज ! गौडदेश आज आपल्या आगमनानें कृतार्थ झाला आहे "

याप्रमाणें त्या शस्त्रधारी तरूणाला उद्देशून आणखीहि कांहीं संभाषण झालें. प्रत्युत्तरादाखल तो तरूण म्हणाला,--

" महाराज ! आपण गरिबाची थट्टा करीत आहां की काय ? कान्यकुब्जचा राजा कोण ? माझ्यासारख्या एका आश्रयहीन दुर्दैवी माणसाला खुद्द महाराज धर्मपाळदेव सामोरे येत आहेत असें म्हणणें हा निव्वळ उपहास आहे. "

हें ऐकतांच व्याकुळ चित्तानें तो ब्राम्हण म्हणाला, " महाराज ! कां म्हणून आपणांस असे वाटते ? आपण गौडराज्याचें सन्मान्य अतिथी आहांत तेव्हां अशी अयोग्य विधानें करून आम्हां गौडवासीयांना लाजवूं नका. "

प्रिय वाचक ! तो अस्त्रधारी सैनिक म्हणजे कान्यकुब्जचा युवराज चक्रायुध आणि तो ब्राम्हण राजपुरोहित शिवशंकरशर्मा हें आपण ओळखलेंच असेल ! "

चक्रायुध म्हणाला, " महाराज ! आपण कृपा करून मला आश्रय दिलांत याबद्दल मी आपला फार आभारी आहे; परंतु मला आपण असें ह्मणवूं नका. "

इतक्यांत दुसरा अस्त्रधारी पुरुष ब्राम्हणाच्या अगदीं कानाशीं लागून अगदीं हलक्या आवाजांत म्हणाला,--

" महाराज ! राजसभेंत राहून राहून वाक्पांडित्यांत तुम्ही पुरे तरबेज झालांत; पण आतां रात्र संपत आली आहे. तेव्हां घरी चलावयाचा आपला मनसुबा आहे कीं नाहीं ? आपण तर---"

विव्हल चित्तानें शिवशंकर मध्येंच म्हणाला, " नंदकुमार, गप्प बसा पाहूं ! "

"तर मग घरीं जाऊं या."

"घरीं कसें जातां येणार ? महाराज चक्रायुधांना कोठें ठेवून जाणार ?"

"हो, तेंहि खरेंच ! पण या स्थळीं उभें राहिल्यानें काय होणार ? चला. प्रथम नगरांत जाऊं या."

तिघेजण मंडपांतून निघून मंदिराच्या दिशेकडे वळले. तेथें येऊन पहातात तों लुटारूंच्या भीतीमुळें नगर-द्वारें व घाटावरील दिंडयाहि बंद असल्याचें त्यांना आढळून आले. नगरपालाच्या हुकुमान्वयें रात्रींच्या वेळीं नगरांत कोणाचाहि प्रवेश होऊं शकत नव्हता.

मधुसूदनाच्या मंदिराला लागून घाटाला जरी एक दरवाजा होता, तरी मंदिरांतून प्रवेश केल्याशिवाय नगरांत जातां येत नव्हतें. मंदिरांत राहणारें पुजारी या वेळीं मंदिराचीं दारें बंद करून अगदीं गाढ झोपेंत घोरत होतें. वारंवार मंदिराचें दार खडखडावून नंदकुमार त्यांना जागृत करण्याचा प्रयत्न करूं लागला. शेवटीं एकजण कंदील घेऊन दाराच्या फटींतूनच बऱ्याच वेळानंतर विचारूं लागला;—

"आपण कोण आहांत ?"

नंदकुमारानें उत्तर दिले, "आम्ही नगरांतीलच माणसें आहोंत. मी सेनापती नंदकुमार आणि हे राजपुरोहित शिवशंकरशर्मा ! आमच्या बरोबरचे हें पाहुणें कान्यकुब्जचे महाराज चक्रायुध आहेत. आमच्याबरोबर तीनचार परिचारक व तीस पायदळ सैनिक आहेत. दारें उघडा म्हणजे आम्हांला नगरांत जातां येईल."

"नगरपालांच्या आज्ञेशिवाय रात्रींच्या वेळीं इतक्या सैनिकांसह आम्हांला आंत घेतां यावयाचें नाहीं. रात्रहि आतां लवकरच संपेल; तेव्हां तोंपर्यंत आपण बाहेर मंडपांतच रहावें हें बरें ! प्रभात होतांच दारें उघडण्यांत येतील."

"आम्ही गौडची माणसें असूनसुद्धां आम्हांला नगरांत जाऊं देत नाहींत तेव्हा आपणांस काय म्हणावें ? शिवाय या वेळीं त्यांच्या समवेत कान्यकुब्जाधिपति महाराज चक्रायुध आहेत. त्यांना मंडपांत बाहेरच कसे

बसवून घ्यावयाचें ? तुम्ही मंदिराच्या अधिकाऱ्यांच्या कानांवर ही गोष्ट ताबडतोब घालाल तर चांगले !''

तो मनुष्य दरवाजापासून कोठेंसा मागें परतला व कांहीं वेळानें एका प्रौढ संन्याशाला त्यानें त्या ठिकाणीं बोलावून आणलें. नंदकुमारानें त्यांना पाहून प्रश्न विचारला, '' आपण मंदिराचें मुख्य धर्माधिकारी आहांत काय ? ''

उत्तर मिळालें, '' होय, आपण कोण ?''

'' मी गौडाचा सेनानायक नंदकुमार ! ''

'' ठीक, मग आपणाला काय पाहिजे ?''

'' आम्हांला नगरांत प्रवेश करावयाचा आहे. ''

'' रात्रीच्या वेळीं सशस्त्र सैनिकांना नगरांत जाऊं देतां येणार नाहीं. तूर्त आपण मंदिरांतच बसा; पहांट होतांच दरवाजे उघडण्यांत येतील.''

'' परंतु आमच्या बरोबर महाराज चक्रायुध आहेत. त्यांच्या आगमनाची वार्ता आगाऊ कळवितां न आल्याकारणानें कोणीहि सामोरें आलेले नाहीं. त्यांना बाहेर कसें बसवावें ? ''

'' नाइलाज आहे. या वेळीं तसें केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. मी महाराज चक्रायुधासाठीं चांगलेसें आसन पाठवून देतों.''

'' आसनाची कांहीं आवश्यकता नाहीं. तें आम्हांपाशीं आहे; पण अगोदर दरवाजे खुले करण्याची काय ती व्यवस्था करा. ''

'' नाहीं, तसें करतां यावयाचें नाहीं,''

'' पण आपण आम्हांला ओळखत नाहीं काय ?''

'' ओळखतों, तरी पण द्वार उघडतां येणार नाहीं. ''

'' तर मग आम्ही जबरदस्तीनें दार फोडून आंत घुसणार. ''

मंदिराधिपतीनें मागें वळून बरोबरच्या इसमास प्रश्न केला, '' कढईंत सप्ततेल भरपूर आहे ना ? ''

त्या मनुष्यानें उत्तर दिलें, '' होय, महाराज ! ''

हें शब्द कानीं पडतांच शिवशंकरशर्मा नंदकुमार आणि चक्रायुध या दोघांचाहि हात धरून त्यांना ओढीत ओढीत घाटाकडे पळाला. इत-

क्यांत जो पुरुषमंडपाच्या आंत अंधारांत इतका वेळ लपून राहिला होता, तो मंदिराच्याद्वाराजवळ आला आणि त्यानें हांक मारली, " गंगेश्वर ?"

मंदिराधिकारी एकाएकीं चमकून म्हणाला, " कोण ? "

आगंतुकानें उत्तर दिलें, " मी चक्रराज. "

" प्रभुच की काय ?"

" होय."

" दासाला अपराधाची क्षमा असावी, " प्रभु ! पण आपणच ते याबद्दल खात्रीलायक पुरावा काय ?"

" मंदिराच्या गाभाऱ्यांतील हरिहराची मूर्ती उचलून पहा."

" होय, आतां खात्री पटली. प्रभूंची काय आज्ञा आहे ?"

" दार उघडा. "

लगेच द्वार उघडण्यांत आले. तेव्हां आगंतुकानें मंदिरांत प्रवेश केला, मंदिराधिकाऱ्यानें पुनः दरवाजे लावून घेऊन त्यास भक्तिभावानें प्रणाम केला. आगंतुकानें सांगितलें, " या सर्वांना नगरांत जाऊं द्या. ही गौडाचीच माणसें आहेत हें मला पक्के माहीत आहे. "

" प्रभु ! खुद्द महाराजाधिराजांची आज्ञा आहे कीं, " रात्रींच्या वेळीं कोणीहि शस्त्रधाऱ्यास गौड नगराच्या आंत घेऊं नये."

" तुम्हांला कोणत्याहि प्रकारचें भय बाळगण्याचे कारण नाहीं. दार उघडण्याविषयीं मी आपणांस आज्ञा करतों."

पुनः मंदिराधिकाऱ्याच्या सांगण्यावरून द्वार उघडण्यांत आले. तेव्हां आगंतुक घाटावर जाऊन शिवशंकरशर्म्यास म्हणाला, " महाराज, चला, आपणांला मंदिराधिकारी बोलावीत आहेत."

राजपुरोहित भयानें कांपत कांपत म्हणाला, " कशाला ? कढईतील उकळलेलें तेल आमच्या अंगावर ओतण्यासाठीं कीं काय ?"

" छट्, भलतेंच ! आपणांला कोणत्याहि प्रकारचें भय बाळगावयास नको. मंदिराचे दरवाजे आपणांसाठीं उघडण्यांत आलेले आहेत."

सर्वजण मंदिराच्या प्रवेशद्वारांतून आंत शिरून नगरांत आले. मंदिराधिकाऱ्यानें आगंतुकाला विचारले, " प्रभु ! दार उघडेंच ठेवूं की काय?"

आगंतुकानें उत्तर दिले, " गंगेश्वर ! एक क्षणभर थांबा; मी ह्या इतक्यांतच परत येतों."

इतकें म्हणून तो घाईघाईनें घाटावर गेलेल्या रस्त्याच्या अनुरोधानें निघाला. त्या लहान नावेंतील नावाड्यांनीं जागृत होऊन नावेला परत कांठावर आणलें होते. नावेच्या समोरच तीरावर घोंगडे लपेटून घेऊन एक पुरुष खुशाल तणाणून झोंपला होता. आगंतुकानें त्याच्याजवळ येऊन सौम्य स्वरांत त्याला हांक मारली, " गौरचंद्र !"

तो पुरुष अंगाला आळोखेपिळोखे देत उठून म्हणाला, " काय आज्ञा आहे प्रभु !"

" तूं नांव घेऊन आताच्या आतां महालाच्या घाटावर जा."

" ठीक आहे प्रभु !"

" उद्यां मध्यरात्रीं एक लहानशीं नौका घेऊन वाघेश्वरीच्या मंदिराच्या घाटाकडे येऊन रहा."

" फार उत्तम !"

आगंतुक आतां मागें वळणार तोंच गौर म्हणाला, " प्रभु !"

" काय सांगावयाचे आहे तुला ? "

" तांदूळ सगळे संपून गेलेले आहेत."

मंदहास्य करून आगंतुक थट्टेनें म्हणाला, " उद्यां एकादशी आहे, तेव्हां कडकडीत उपोषण कर झाले !"

" दीर्घ निःश्वास सोडून गौर पुनः पेंगू लागला.

## १६

नगरांत प्रवेश केल्यावर शिवशंकर आणि नन्दकुमार दोघेहि दिङ्मूढ होऊन उभे राहिले. चक्रायुधाला घेऊन कोठे जावें याचा त्यांना मोठा पेंच पडला. नगरवासीजन अद्यापिही पहांटेच्या गुलाबी झोपेंत मग्न होते. सूर्यो-

दय होण्याला अजून थोडासा अवकाश होता. नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें राजमहालाची द्वारें सूर्योदयापूर्वीच उघडलीं जात नसल्याकारणानें चक्रायुधाला तेथें नेण्यांत कांहीं अर्थ नव्हता. तेव्हां पुढें कसें करावें या विचारांत तें पडले.

इतक्यांत मागील परिच्छेदांत वाचकांना परिचित झालेला आगंतुक त्या स्थळीं येऊन पोहोंचला. जनशून्य राजमार्गांवर त्या दीर्घकाय पुरुषाला एकाएकी आलेला पाहून शिवशंकरशर्मा चपापला; पण नन्दकुमार त्याला पाहून म्हणाला, " मधुसूदनाच्या घाटावर आम्ही आपणांला पाहिले होतेसें दिसतें ? तेच ना तुम्ही ?"

" होय तोच !"

" यावेळीं कुठें चालला आहांत ? "

" राजवाड्यात. "

" राजवाड्यांत ? पण तेथें आपला प्रवेश या वेळीं होणार कसा ?"

राजमार्गाच्या लगतच असलेल्या एका नागरिकाच्या घरांत अद्याप दिवा होता; आणि त्या दिव्याचा मंद प्रकाश त्या आगंतुकाच्या मुखावर खिडकीवाटे पडला होता. त्या प्रकाशांत आगंतुकाच्या चेहेऱ्याकडे दृष्टि जातांच चपापून शिवशंकरशर्मा म्हणाला, " महाराज ! आपण कोण ? आपलें नांव काय ?"

आगंतुक मंद हास्य करून म्हणाला, " शिवशंकर ! सांगा पाहूं मी कोण तो ?"

तें ऐकतांच राजपुरोहितानें त्या धुळींतच आगंतुकाच्या चरणांवर लोटांगण घेत म्हटले, " प्रभु ! अपराधाची क्षमा करा. अन्धारांत मला आपली ओळख पटली नव्हती. "

" मग आतां तरी ती पटली कां ?"

" होय–होय; आपण प्रभु विश्वेश्वरानंद ! प्रभु ! गौडांत कधीं आलांत ? "

" तुम्ही येण्याच्या अगोदर दोन घटका. सारी रात्र मी नौकेंतच काढली. " संन्याशी म्हणाला.

" प्रभु ! ईश्वरी योगायोगानेंच आपली आज अशी अवचित गांठ पडलेली दिसतें. मी या राज-अतिथीला आणून महान् संकटांत पडलों आहे प्रभु ! "

" राज-अतिथीची व आपली भेट कोठें झाली ? "

" काशींत. "

इतकें म्हणून शिवशंकरनें चक्रयुधाला आपण आश्रय दिल्याचें व प्रतिज्ञा केल्याचें सारें वृत्त त्यांच्या कानांवर घातले. तें ऐकून घेतल्यावर विश्वेश्वरानंद म्हणले, " फार चांगलें केलेंत आपण. आपल्या हृदयांत इतकी दया असेल असें हा वेळपर्यंत मला माहीत नव्हतें. आपल्या डोक्यांत इतकी बुद्धिमत्ता सांठविलेली आहे हें गौडराज्यांत एकलाहि माहित असेल किंवा नाहीं ही शंकाच ! "

" पण प्रभु-"

" पण काय शिवशंकर ?"

" प्रभु ! मी दुसरें एक कार्य झटपट करून मोकळा झालों आहें."

" कोणतें ते तरी कळूं द्या !"

" प्रभु ! आवेगाच्या भरांत पवित्र गंगेच्या पात्रांत उभे राहून चक्रायुधांना त्यांचें गतराज्य मिळवून देण्याची भीष्मप्रतिज्ञा मीं करून चुकलों आहें."

" काय म्हणतां ? "

" प्रभु ! त्या वेळीं मागचापुढचा कांहीं विचार न करतां मी अशी प्रतिज्ञा केली खरी ! पण ती तडीस जाणार कशी ? माझी ही प्रतिज्ञा जर शेवटास जाणार नाहीं, तर त्यामुळें केवळ माझें एकट्याचेंच नव्हे, तर समस्त गौडदेशाचें जगांत हंसे होणार आहे."

" शिवशंकर ! अंमळ शांत व्हा, आपण अगोदर कशी काय प्रतिज्ञा केली आहे ती मला आधीं ऐकवा."

" प्रभु ! काशीक्षेत्रांत आदिकेशवाच्या घाटावर-पवित्र गंगामाईच्या पुनीत जलांत उभें राहून मीं अशी प्रतिज्ञा केलेली आहे कीं, वाटेल त्या उपायानें चक्रायुधांना त्याचें पितृराज्य इंद्रराजापासून मिळून देईन."

शिवशंकरची ही प्रतिज्ञा ऐकून संन्याशी विश्वेश्वरानंद कांहीं उत्तर न देतां क्षणमात्र विचारांत पडले. तें काय प्रत्युत्तर देतात हें ऐकण्याच्या उत्सुकतेनें शिवशंकर त्यांच्या तोंडाकडे टकमका पहात राहिला. तेथून थोडया दूर अंतरावर युवराज चक्रायुध आणि नंदकुमार त्यांची वाट पहात होते. परिचारक आणि सैनिक त्या दोघांच्या मागें उभें होते. त्या वेळीं पूर्व दिशेस उषःकालाची स्पष्ट चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं होतीं. राजमार्गावरूनहि माणसांची रहदारी सुरू व्हावयास आरंभ झाला होता. पाहतां पाहतां पूर्वेकडील नीलाकाश बालसूर्याच्या आरक्त किरणांनीं प्रकाशमान झालें. तैलविहीन दीपकाप्रमाणें एकामागून एक सर्व तारका हळूहळू अस्तंगत झाल्या. अद्यापिहि स्वामी विवेश्वरानंद राजमार्गावर उभ्याउभ्या विचारांतच मग्न होते.

काशीक्षेत्रांत आदिकेशवांच्या घाटाजवळ पवित्र गंगाजलांत उभें राहून या अविचारी ब्राम्हणानें जी ही प्रतिज्ञा केली आहे तिचें काय करावें याचाच ते आपल्याशीं विचार करीत होतें मागचापुढचा मुळींच विचार न करतां या आश्रहीन तरूण राजपुत्राच्या केविलवाण्या स्थितीची दया येऊन शिवशंकरानें फार तर त्याला आश्रय देण्यापुरतीच प्रतिज्ञा केली असती तर वेगळी गोष्ट होती ! पण या राजपुरोहितानें ही दुसरी प्रतिज्ञा केली ती काय म्हणून ? कान्यकुब्जाधिपति इंद्रराज उर्फ इंद्रायुधाला जिकून वज्रायुधाच्या मुलाला राज्य मिळवून द्यावयाचें ही कांहीं सोपी गोष्ट नाहीं, महान् पराक्रमी गुर्जरराजाच्या इंद्रायुधाला भरपूर पाठिंबा आहे. त्याच्याशीं युद्ध पुकारणें म्हणजे अवन्ति आणि भिल्लमाळ या दोन्हीं देशांशीं अगोदर वैर संपादन केलें पाहिजे. तेव्हां आतां पुढें कसें करावें ? काय केल्यानें शिवशंकरची प्रतिज्ञा तडीस जाईल ! वगैरे गोष्टींचा तें आपल्याशींच विचार करूं लागले. याप्रमाणें तंद्रींत असतां तें अंमळ मोठयानें पुटपुटले, " शिवशंकराची ही प्रतिज्ञा तडीस जाईल काय ? "

राजमार्गाजवळील एका वृक्षाआडून पहांटेच्या अंधुक प्रकाशांत अस्पष्ट स्वरांत कुणीसें म्हणालें, " हो, जाईल ! "

स्वामी विश्वेश्वरानंदानीं या शब्दाकडे लक्ष दिलें न दिल्यासारखेंच केलें. ते आपल्याच विचारांत चूर होतें. गौडराज्यांत असें सामर्थ्य आहे

काय, कीं ज्याच्या बळावर धर्मपाळदेव रणसंग्रामांत एका दुष्ट जातीचें दमन करूं शकेल. या साम्राज्याच्या भांडारांत समस्त आर्यावर्त पालथें घालण्या-इतकी संपत्ति असणें शक्य आहे काय ? विश्वेश्वरानंदाच्या मनांतील हे सर्व भाग ओळखून कुणीसें अंधारांतून म्हटलें, " होय, आहे ! "

तो स्वर ऐकतांच विश्वेश्वरानंद एकाएकीं चपापले. घाईघाईनें ते वृक्षाच्या मागें जाऊन पाहतात तों तेथें कोणीहि नव्हतें. तेव्हां ते निराश होऊन थबकून तेथेंच उभे राहिले. इतक्यांत दुरून शब्द ऐकूं आले:—
" चक्रराज ! आतां वेळ टळून गेली. रात्रौ मणिदत्तांच्या गृहांत या."

ज्या दिशेकडून हे शब्द ऐकूं आले, त्या बाजूकडे संन्यासी धांवला, तें पाहून शिवशंकर, चक्रायुध आणि नंदकुमार हें तिघेहि त्यांच्या मागून धांवले, परंतु त्यांना तेथें कोणीहि आढळलें नाहीं. तेव्हां विश्वेश्वरानंदांनीं शिवशंकरना विचारलें, " कोणी बरें हें शब्द उच्चारले असावे ?"

" कोण जाणे ! आमच्या तर दृष्टीस येथें कोणी माणूस पडलें नाहीं."

" पण कोणीसें मजबरोबर यावेळीं बोललें खरें ! "

" नाहीं, तसा आपणाला निव्वळ भास झाला असावा. आम्हांला तर कांहीं ऐकूं आलें नाहीं ! "

पण इतक्यांत स्वामींच्या मुखावर आनंदाची रेषा उमटलेली दिसली. सहर्ष होऊन उत्तेजित स्वरांत त्यांनीं विचारलें, " शिवशंकर ! कान्यकुब्जा-धिपति कोठें आहेत ? "

तात्काळ शिवशंकरनें युवराज चक्रायुधाला त्यांच्यापाशीं आणिलें. चक्रायुधानें जवळ येतांच स्वामींना साष्टांग प्रणिपात केला. विश्वेश्वरा-नंदांनीं आशीर्वाद देऊन म्हटलें, " महाराज चक्रायुधाचा विजय असो ! "

चक्रायुध आणि नंदकुमार दोघेंहि विस्मयचकित होऊन स्वामींच्या मुखाकडे पाहूं लागले. क्षणभरानें शिवशंकरनें स्वामींना विचारलें, " प्रभु! पुढें कसें होणार ?"

" शिवशंकर ! तुम्हीं केलेली प्रतिज्ञा शेवटास जाईल."

हें ऐकतांच त्या सरलहृदयीं दयाळु ब्राह्मणानें त्या धुळीतच स्वामींच्या चरणांवर लोळण घेतलें. नंतर सर्व मिळून राजवाड्याकडे यावयास निघाले.

★ ★

## १७

आज प्रभातकालीं सूर्योदय होण्यांपूर्वींच महाराजाधिराज धर्मपाळदेव राजमहालाजवळील घाटांवर स्नान करीत होतें. आज स्वर्गस्थ महाराज गोपाळदेवांचा श्राद्धदिन. गंगेच्या कांठीं एक परिचारक नववस्त्र घेऊन उभा होता. घाटाच्या पायऱ्यांजवळ उभे असलेले शिपायी भिक्षुकांचीं गर्दी दूर लोटीत होतें.

महाराजाधिराज श्राद्धाचे दिवशीं स्नानसंध्या आटोपल्यावर मुक्त हस्तानें दानधर्म करणार आहेत, हें वृत्त कानीं येतांच गौडांतील गोरगरीब, अनाथ, दरिद्री, भिक्षुक यांच्या झुंडीच्याझुंडी त्या ठिकाणीं लोटल्या होत्या. घाटाच्या रस्त्याजवळ मुख्य न्यायाधीश आणि कोषाध्यक्ष उभें होतें. घाटाच्या एका बाजूला सूवर्ण मोहरांच्या थैल्याच्या थैल्या पडल्या होत्या. दुसऱ्या बाजूला एक ठेंगणासा व लांबट चेहेऱ्याचा गौडीय ब्राह्मण उभा होता. त्याला आज गंगातिरीं महाराजाधिराज गौडाधीपतींकडून एक गांव दान म्हणून मिळावयाचा होता. त्याच्याजवळ जरा दूर अंतरावर एक वृद्ध महाब्राम्हण उभा होता. त्या काळीं उच्च दर्जाचें सर्वच ब्राम्हण कांहीं सूवर्णदान स्वीकारित नसत. महाब्राम्हण म्हणजे थोडचा कमी प्रतीचें ब्राह्मणच श्राद्धाचे दान स्वीकारित असत. महाराजाधिराज गौडाधिपति याजवळ उभ्या असलेल्या ब्राम्हणाला सुवर्णदान देणार होतें. त्याच्याशिवाय दुसरा कोणीहि ब्राह्मण दान स्वीकारणार नव्हता.

एक दीर्घकाय काषायवस्त्रें धारण केलेला संन्यासी हळूहळू मनुष्यांच्या गर्दीतून मार्ग काढीत घाटाकडे येत होता. त्याचा दीर्घदेह आणि तेजस्वी मुखमुद्रा पाहून भिक्षुक भयानें एकीकडे सरकून त्याला जावयास वाट करून देत होते. संन्यासी हळूहळू घाटाजवळ येऊन पोहोंचला. त्याला पाहतांच पहारेकऱ्यांनीं आदरानें आपापली मस्तकें लववली.

घाटाजवळ संन्याशाला आलेला बघतांच मुख्य न्यायाधीश शंभुनाथ-

शर्मा व कोषाध्यक्ष उदारचंद्र यांनीं जमिनीवर सपशेल त्यांच्यापुढें लोटांगण घातले. त्यांना आशीर्वाद देत संन्याशानें विचारलें, " महाराजाधिराजाचे स्नान आटोपलें का ?"

उदारचंद्रानें प्रत्युत्तर दिले, " प्रभू ! परमेश्वर परमभट्टारक महाराजाधिराज गौडेश्वर श्रीमान् धर्मपाळदेव अद्याप स्नान करीत आहेत."

धर्मपाळदेवांनीं स्नान आटोपून उभ्या उभ्या घाटाच्या पायऱ्यांवर वस्त्रांतर केलें. नन्तर उदारचंद्रानें सुवर्णमोहरांनीं भरलेलें एक पिशवी त्यांच्या हातांत दिली. महाराजाधिराजांनीं परिचारकांच्या हातून सुवर्णकलश घेऊन उदक सोडलें व तें द्रव्य महाब्राह्मणास दान दिलें. तें पाहतांच तेथें जमलेल्या असंख्य भिक्षुकांनीं उच्च जयध्वनीनें सारें आकाशपाताळ दुमदुमून सोडलें. इतक्यांत शंभुनाथशर्मा भूर्जपत्रावर लिहिलेला एक लेख घेऊन तेथे आला व त्यानें तो महाराजांच्या हातीं दिला.

त्यावेळीं सुवर्ण मोहरांच्या थैल्यामागें उभा असलेला संन्यासी तेथून महाराजांजवळ येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच गौडाधिपतींनी त्यास अत्यंत आदरपूर्वक साष्टांग प्रणिपात केला.

संन्यासी--स्वामी विश्वेश्वरानंद—महाराजांना हाताला धरून उठवीत म्हणाले,--

" महाराजाधिराज ! आज हा विश्वेश्वरानंद गौडाधिपतींजवळ भिक्षा मागावयासाठीं आलेला आहे."

मंद हास्य करून धर्मपाळदेव म्हणाला, " प्रभु ! या गौडराज्यांत असें काय आहे, की, जें आपल्या अधिकारांत असूं शकणार नाहीं ? आपणांला न देतां येण्याजोगें असें माझ्यापाशीं काय आहे ?"

" धर्मपाळदेव ! मी जें कांहीं मागावयास आलेलों आहें, ते कितीहि दुर्लभ आणि कष्टसाध्य, असले तरी आपण देऊं शकाल." विश्वेश्वरानंद म्हणाले.

" प्रभु ! आपण मागण्यापूर्वीच ती वस्तु आपलीच होऊन चुकली आहे हें खास समजा," महाराज दृढतेनें म्हणाले.

" धर्मपाळदेव ! एका आश्रयहीन मनुष्याला आपण उदार मनानें आश्रय द्यावा; अशी मागणी मी आज आपणांपाशीं करीत आहे. प्रबलांच्या जुलुमांतून निर्बलांचे रक्षण करण्यासाठीं मी आपणाला आग्रह करीत आहे; तुम्ही त्याचें रक्षण कराल ना ? "

" प्रभू ! आपल्या शब्दांचा नीटसा अर्थबोध मला होत नाहीं. तरी पण आश्रयहीनाला अवश्य आश्रय देईनच देईन इतकें मात्र आश्वासन मी आपणांला खास देतो.

प्रबलांच्यां जाचांतून दुर्बलांचे रक्षण करण्यास माझ्याच्यानें होतील तितकें सारे प्रयत्न करण्यास मी बिलकूल मागें पुढें पाहाणार नाहीं. पण आपण कोणाविषयीं सांगतां आहां हें ?"

" गौडाधिपति ! कान्यकुब्जनरेश स्वर्गीय राजा वज्रायुधाच्या मुलाला–चक्रायुधाला–वज्रायुधाच्या भावानें गादीवरून हुसकवून लाविलेलें आहे. तो आज आपणाकडे आश्रयाची भिक्षा मागण्यासाठीं या गौड नगरात आलेला आहे. तुम्ही त्याला आश्रय देऊन त्याच्या संरक्षणाचा भार आपल्या शिरावर घ्याल काय ?"

" प्रभु ! युवराज चक्रायुध–सुप्रसिद्ध भंडीचा पुत्र–या नगरांत आलेला आहे असे आपण सांगतां ! पण हें माझ्या कानीं आलेलें नाहीं. सध्यां युवराज कोठें आहेत ?"

" येथें जवळच. पण जर आपण त्यास आश्रय देणार नसाल, तर त्यांना मी या जागीं घेऊन येणार नाहीं. " स्वामी म्हणाले.

" प्रभु ! मी जरूर आश्रय देईन. "

" धर्मपाळ ! पुरता विचार करून पहा बरें ! त्याला आश्रय दिल्यानें कान्यकुब्जाधिपति इंद्रायुधाचें वैर संपादन करावें लागेल, त्याचप्रमाणें भिल्लमाळचा पराक्रमी गुर्जरराजहि दुष्मन होईल. "

" प्रभु ! आश्रयार्थ आलेल्यांचें रक्षण करणें हा राजाचा मुख्य धर्म आहे. इतिहासप्रसिद्ध भरतवंशानें आश्रयासाठीं आलेल्यांचे संरक्षण करण्यांत आपले सर्वस्व गमाविलेलें आहे. हें नूतन गौडसाम्राज्य जरी घालवावें लागले अगर वंशपरंपरागत चालत आलेले हें माझ्या पित्याचे राज्य जरी गेले, तरी

जोपर्यंत या धर्मपाळाच्या देहांत प्राण आहे, तोंपर्यंत तो शरणांगताचे रक्षण करील. युवराज चक्रायुध यापुढें आश्रयहीन राहूंच शकणार नाहीं. स्वर्गस्थ पित्याचें पुण्यस्मरण करून मी प्रतिज्ञा करतों कीं, मी युवराज चक्रायुधाचें शेवटपर्यंत रक्षण करीन."

"शाबास, धर्मपाळ, शाबास ! तुमच्या तोंडून असेच वीरोचित शब्द बाहेर येतील अशी माझी मुळांतच अपेक्षा असल्यामुळें तर मी गंगेच्या कांठीं यावेळीं तुमच्याकडे आलों. आतां दुसरी प्रार्थना अशी आहे कीं, गोपाळदेवाच्या पुत्राला साजेसेच वागा!"

"काय म्हटलेंत प्रभु ?"

"हेंच कीं, चक्रायुधाला कान्यकुब्जाच्या गादीवर बसवा."

"प्रभु ! युद्धांत जयापजय ही तर ईश्वराधीन गोष्ट असते. तरी पण हें पवित्र गंगाजळ हातीं घेऊन सूर्यदेव आणि परमात्मस्वरूपी आपणांस साक्षी ठेवून मी प्रतिज्ञा करतों कीं, जोंपर्यंत धर्मपाळदेवाच्या शरीरांत रक्ताचा एखादा बिंदू असेल, जोंपर्यंत गौडांत एक मूठभर धान्य शिल्लक असेल, आणि जोंपर्यंत माझ्यापाशीं एक तरी शस्त्रधारी सैनिक उरलेला असेल, तोंपर्यंत चक्रायुधासाठीं मी लढतच राहीन. जरी सर्व जग मजवर उलटलें, तरी हा गोपाळदेवांचा पुत्र भंडीच्या पुत्राखातर केव्हांहि शस्त्र खालीं ठेवणार नाहीं." धर्मपाळदेवांनीं प्रतिज्ञा केली.

विश्वेश्वरानंदांनीं धर्मपाळदेवाच्या तोंडची ही भयंकर प्रतिज्ञा ऐकून घेतल्यानन्तर क्षणभरानें उच्च स्वरांत म्हटलें,—

"जय, महाराजाधिराजांचा जय ! गौडाधिपति धर्मपाळदेवांचा जय ! धर्मपाळदेव ! भारतवर्षाला आपण ललामभूत आहांत असे जें मी पूर्वीं अनुमान केलेले होतें; तें खरे ठरलेले पाहून मला भारी संतोष वाटतो."

संन्याशाच्या तोंडचें हें शब्द पुरें होण्यापूर्वीच हजारों भिक्षुकांनीं एकमुखानें महाराज धर्मपाळदेवांच्या नांवाचा प्रचंड जयनाद केला. गौडेश्वरांनीं पुन: विचारले,—

"प्रभु! युवराज चक्रायुध कोठे आहेत ?"

" ते राजपुरोहित शिवशंकरशर्म्मांबरोबर लोकांच्या गर्दीच्यामागें आहेत. "

" त्यांना येथें घेऊन येण्याविषयीं आज्ञा करा. "

विश्वेश्वरानंदाच्या आज्ञेनें उदारचन्द्र युवराज चक्रायुधाला आणावयासाठीं निघून गेला. आणि थोडया वेळांतच त्याला व शिवशंकरशर्म्याला तेथें घेऊन आला. धर्मपाळदेवानें चक्रायुधाला कडकडून मिठी मारून अलिंगन दिलें व प्रतिज्ञेचा पुन्हां उच्चार केला. नंतर पूर्ववत् दानविधीस प्रारंभ झाला.

• •

## १८

पंच नद्यांमध्यें आलेल्या हिरण्याचार प्रदेशाच्या दक्षिणभागीं एक उजाड देश आलेला आहे. तो देश सर्वस्वी रेताड व रूक्ष आहे. प्राचीनकाळीं या देशाचें नाव मरुमाड अगर मारवाड असे होतें. इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या अंतिमभागीं या विशाल मरुप्रदेशांत उर्फ मारवाड देशांत गुर्जर नांवाची एक जात राज्य करीत होती. त्यावेळीं हुनापर नांवाचा एक गुर्जर गांधार देशापासून नर्मदेच्या किनाऱ्यालगतच्या प्रदेशांत राज्य करीत होता. बर्बर नांवाची एक हलकी जात दीर्घकालापासून आर्यावर्तांत वस्ती करून राहिल्यामुळें आर्यांची रीति, नीति सभ्यता आणि भाषा हळूहळू शिकून कुरूवर्षाची रीति, नीति साफ सारें विसरून गेली होती.

इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या मध्यकालीं त्या प्रदेशांत गुर्जर लोक अधिकाधिक प्रबळ होत चालले. मरुभूमि–मारवाडसारख्या रूक्ष प्रदेशांत वास्तव्य केल्याकारणानें ती जात अत्यंत बलवान व फार कष्टसहिष्णु अशी झाली; आणि पंजाबात वसाहत करून राहिलेली उर्बर जात त्यांच्याहस्तें वारंवार पराभूत झाली. मालव प्रदेशाच्या लगतच्या प्रदेशापासून तों सरस्वतीच्या किनाऱ्याबरील ठाणेश्वरपर्यंत आणि गंगाकिनारीं

फार दूरवर कान्यकुब्जापर्यंत या गुर्जरांच्या राज्याचा विस्तार झालेला होता. त्या वेळच्या गुर्जर राजधानीचे नांव भिल्लमाळ असे होते.

भिल्लमाळ नगर मरुभूमि उर्फ मारवाडच्या दक्षिण सीमेवर आलेलें होतें. विशाल, उजाड, हैराण अशा मानवशून्य मरूभूमींत ज्या स्थळीं पर्वतांच्या रांगा संपत आलेल्या होत्या, त्या स्थळीं पर्वतराजीजवळच दुर्भेद्य दुर्गांच्या मध्यभागीं गुर्जरराजांची राजधानी शोभत होती. आमच्या कथानकाच्याकाळीं गुर्जर राजधानीचे हें शहर फारच लहान होतें.

परंतु ते अशा दुर्भेद्य स्थळीं आलेले होतें कीं, कोणाही शत्रूचीं तेथें चालून येण्याची हिंमतच होत नव्हती. त्या नगराच्या सभोंवतीं काळ्या दगडांनीं बांधलेला एक मजबूत कोट होता, आणि त्याला लागूनच सभोंवार एक फार खोल असा खंदक होता. ठिकठिकाणीं फार मजबूत अशीं लोहजडित सिंहद्वारें आणि त्यामागें लहान लहान किल्लेकोट उभारले होते.

हेमंतऋतूच्या मध्यान्हकाळीं भिल्लमाळ नगराच्या किल्ल्यापासून तीन गांव दूर एक प्रवासी रस्त्याजवळ आलेल्या खर्जुरवृक्षराजीच्या शीतल छायेंत बसून विश्रांति घेत होता. त्याच्या सन्मुख दोन उंट त्या रखरखीत वाळूंत खजुरीच्या कुंजालगत आलेल्या एका खळग्यांतील पाणी पिऊन विश्रांति घेत पडले होते. ऊंटासारखा कष्टसहिष्णु प्राणी दुसरा कोणीहि नसेल. हा प्राणी जेव्हां आपली लांबलचक मान रेताड प्रदेशांत खुपसून बसतो, तेव्हां त्याच्या सहनशीलतेची कमाल होऊन चुकली असेंच त्याच्या धन्यानें उमजावयाचें असतें, आणि तें अगदीं यथार्थ आहे.

सूर्याच्या तापानें धगधगीत रेतीच्या अरण्यांतून वाहणारा तीव्र उष्ण वायु आणि अग्निस्फुल्लिंगाप्रमाणें चटके काढणारे वाळूचे कण प्रवाशाला अगदीं ' दे माय धरणी ठाय ' करून सोडीत होते. वस्त्राचा एक लहानसा तुकडा वारंवार पाण्यांत भिजवून तें पाणी आपल्या मस्तकावर व तोंडावर वारंवार शिंपडून घेऊन मुशाफर हुःश हुःश करीत तेथें बसला होता. जलाशयाच्या मागील बाजूलाच एक फार प्राचीन असें देवालय होतें. तें ठिकठिकाणीं पडून भग्न झाल्याकारणानें अगदी जीर्णावस्थेंत होतें.

त्याची एकच भिंत काय ती चांगल्या स्थितींत उभी असलेलीं दिसत

होती. भर दोन प्रहरची वेळ असल्यामुळें त्या पडक्या देवळांत छायेचें असें मुळीं नांवच दिसत नव्हतें. इतक्यांत अकस्मात् कोणाचाशा पावलांची चाहूल लागल्यानें प्रवाशानें मागें वळन पाहिलें, तो त्या जीर्ण देवालयाच्या द्वारापाशींच भगवीं वस्त्रें धारण केलेला एक संन्याशी उभा ! प्रवासी त्याला पाहतांच एकाएकीं दचकून उभा राहिला, मघा जेव्हां तो त्या जला· शयापाशीं येऊन पोहोंचला तेव्हां त्याठिकाणीं त्याला कोणीहि आढळलें नव्हते. संन्याशीं झोळींतून कमडंलु काढून त्या प्रवाशापाशीं आला व त्यानें भिक्षेसाठीं तो त्याच्यापुढे धरला.

परंतु मान हलवून भिक्षा देण्यास आपण असमर्थ असल्याचे प्रवाशानें दर्शविलें. तेव्हां संन्यासी म्हणाला, " मला आपणापासून धनाची अपेक्षा नाहीं, परंतु मी भारी क्षुधित असल्याकारणानें आपणांशी जें कांहीं अन्न शिल्लक असेल, त्यांतून मला थोडेसें द्या ! "

प्रवासी रागानें म्हणाला, " माझ्याजवळ खाण्याचें कांहींहि नाहीं. हें पहा, समोर तें शहर दिसत आहे, तेथें तुम्ही जा म्हणजे तुम्हांला खावयाला मिळेल. "

संन्याशानें मंद हास्य करुन म्हटलें, " तें मला ठाऊक आहे. तुम्ही आणखी निराळें मला सांगावयास नको. शहरांत जाऊन पोहोंचावयाला अजून एक प्रहर तरी उशीर लागेल. आणि संबंध दिवसाचा मी उपाशीं आहें. म्हणून तर एवढी भिक्षा मी तुमच्यापाशीं मागत आहें. हे भोलानाथ! सकाळपासून पोटांत अन्नाचा कणही नाहीरे ! आतां संध्याकाळीं केव्हां मिळेल तेव्हां खरें ! या दोन प्रहरीं हे प्रवासी महाशय कुठे भेटले, तर त्यांजकडूनहि कांहीं मिळण्यासारखें नाहीं. आतां करूं तरी काय ? अहो महाशय ! तुम्हीं भिक्षा नाहीं म णतां तें कां ? माझ्यासारख्या गरीब संन्याशाला असे निरर्थक कष्ट नकाहो देऊं ! एखाद्या दिवशीं तुम्हांलासुद्धां माझ्यासारखा भिक्षा मागण्याचा प्रसंग येईल. "

संन्याशाचें हे शब्द ऐकतांच प्रवासी अत्यंत क्रोधायमान होऊन म्हणाला, " मी तुला भिक्षा नाहीं म्हटली म्हणून तूं मला असा शिव्याशाप देतोस काय, गोंसावड्या ? तूं–"

" अरे बाबा ! जरा शांत हो. मी संन्याशी आहें. काम, क्रोध, लोभ आणि दुर्गुणांचा मी कधींच त्याग केलेला आहे. मी कधीं कोणाला शाप देत नसतों; मग तुलाच कसा– "

"चूप रहा गोंसावड्या ! शाप देऊन आणखी पुनः नाहीं म्हणतोस?"

" बाबारे ! माझ्या म्हणण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, आज तूं मोठा चक्रवर्ती राजा असलास, तरी उद्यां रस्त्यावरील एखाद्या भिकाऱ्यापेक्षांहि अधम स्थितीस येऊन पोंहोंचणार नाहीं कशावरून ? "

" हें पहा गोंसावड्या ! आतां जास्त बोलूं नकोस, नाहीं तर परिणाम चांगला होणार नाहीं. " प्रवासी अत्यंत संतप्त होऊन म्हणाला.

" अरे बाबा ! तूं कांहीं अद्याप चक्रवर्ति झालेला नांहींस; मग तुला एवढा राग कां ? " संन्याशानें शांत स्वरांत विचारलें.

" मी सध्यां चक्रवर्ति नसलों म्हणून काय बिघडलें ? पुढें मागें मी कधीं चक्रवर्ती झालों तर ?"

" मग आतांच होईनास ! माझें त्यांत काय बिघडलें ?"

" ठीक, ठीक ! होणारच मी चक्रवर्ती !"

" परन्तु––"

" परन्तु काय ? " मोठ्या तोऱ्यांत प्रवाशानें विचारलें.

" परन्तु मी म्हणतों कीं, तूं केव्हांहि चक्रवर्ती राजा होऊं शकणार नाहींस. "

" अहो संन्याशी महाराज ! तुम्हांला सामुद्रिक विद्या अवगत आहे काय ?"

" जी कांहीं थोडीबहुत येत होती, ती या क्षुधेच्या आगीमुळें पार विसरून गेलों ना ! "

इतकें म्हणून संन्याशानें आपल्या झोळींतून एक चामड्याची पिशवी बाहेर काढून ती पाण्यानें भरली व आपले हातपाय धुतले. प्रवासी कुतुहलपूर्वक त्याच्याकडे पाहूं लागला. संन्याशानें नन्तर एक कसलासा काळा प्रवाही पदार्थ भिक्षापात्रांतील पाण्यांत मिसळला व त्यानें तें पाणी पिऊन टाकले. हें पाहून प्रवाशानें व्याकुळ होऊन प्रश्न केला, " संन्यासीमहाराज ! हें तुम्ही काय प्राशन केलें ?"

प्रश्नाचें प्रत्युत्तर न देतां भिक्षापात्र पुन: झोळींत टाकून काठीवर भार देऊन संन्याशी उभा राहिला. तेव्हां प्रवाशानें पुनः विचारलें.

" संन्याशीमहाराज ! चाललांत कुठें ?"

गंभीर स्वरांत संन्याशानें उत्तर दिलें, " ज्या स्थळीं भिक्षा मिळूं शकेल तेथें–नगरांत. "

" थांबा, आपणांला एक गोष्ट विचारावयाची आहे. " प्रवासी म्हणाला.

" कांहीं चिंता नाहीं. एक सोडून खुशाल हजार प्रश्न विचारा; परन्तु मला आतां फारच थोडा वेळ राहिलेला आहे. अजून मला तीन गांवें चालून जायचें आहे. " संन्याशी म्हणाला.

" जर तुम्हीं कृपा करून या माझ्या दोन उंटांपैकीं एकावर बसाल, तर एका प्रहरांऐवजीं एका घडींत पोहोंचूं शकाल. "

" अरे बाबा ! एक मूठभर अन्न द्यावयास तूं तयार नाहींस; मग जर कां मी तुझ्या उंटावर स्वार झालों तर तूं माझें मुंडकेंच उडवशील. "

" देव, माझ्या हातून अपराध झाला. त्याबद्दल मला क्षमा करा. " दीनवाणीनें हात जोडून प्रवासी म्हणाला.

" छे, छे, मला तुझ्या बोलण्याचा मुळींच राग आलेला नाहीं. जें कांहीं विचारावयाचे असेल तें खुशाल विचार. "

" संन्याशीमहाराज ! मी आपणांला असें विचारतों कीं, अशा भयंकर उन्हांत आपण पायींच चालत नगरांत जाणार कीं काय ?"

" होय, गुरूंनीं दिलेल्या अमृतरसाच्या पानामुळें भूकतहान, उष्मा आणि परिश्रम सर्व कांहीं दूर झालेला आहे. "

" खरेंच कां सांगतां हें तुम्ही ?" आश्चर्यानें प्रवाशानें विचारलें.

" बाबारे, मी तुला खोटें सांगण्यासाठीं का भर दुपारीं या जुन्या देवमंदिराकडे आलों असें तुला वाटतें ?"

" नाहीं. मी असे कुठें म्हणतों ?"

" तर मग ?"

" हें पहा. मी मूळचा कान्यकुब्जाचा; पण सध्यां राहतों प्रतिष्ठा-

नांत. इतका उष्मा सहन करावयाचा मला सराव नाहीं. म्हणून म्हणतों, जर प्रभु दया करून प्रसाद म्हणून मला--"

" अमृतरस पिण्याची तुझी इच्छा आहे काय ?" संन्याशानें प्रश्न विचारला.

" होय, प्रभूंच्या हातचा प्रसाद मिळाल्यास मी फार कृतार्थ होईन."

" घे तर मग हा !"

इतकें म्हणून संन्याशानें झोळींतून चामडयाची पिशवी बाहेर काढली आणि तींतील काळया रंगाचा कसलासा प्रवाही पदार्थ भिक्षापात्रांतील पाण्यांत मिसळून तें पात्र प्रवाशाच्या हातांत दिलें. प्रवाशानें तें घटघटां पिऊन टाकलें. तें पिऊन झाल्यावर तो म्हणाला, " हा अमृतरस भारीच मधुर आहे !"

" होय, फारच मधुर !" संन्यासी म्हणाला, " आतां तुला भूक-तहान, उष्मा किंवा परिश्रमाची काळजी करायला नको."

किंचित् उत्तेजित स्वरांत प्रवासी म्हणाला, " प्रभु ! आपले म्हणणें सत्य आहे. हिरव्याचार कुंजांतून सुगंधित वाऱ्याची झुळुक लागल्याप्रमाणें अत्यंत शीतलता मनाला वाटत आहे. आणि हें पहा--जणूं काय चांदण्या रात्रीं पवनाच्या थंडगार लहरी येताहेत असें भासतें."

प्रवासी असें म्हणून खजुरीच्या झाडाला टेंकून बसला आणि मंद हास्य करून म्हणाला, " अहाहा ! प्रिये सखे ! कोण ग आहेस तूं ?"

संन्याशानें जवळ येऊन प्रवाशाला विचारलें, " कां, नगरांत नाहीं का चलावयाचें ?"

अर्धवट मिटल्या डोळयांनीं पहात प्रवासी गुंगींत म्हणाला, " कोण तूं ? या वेळीं माझी गुलाबी झोंपमोड कां करीत आहेस ? येथून चालता हो. मला भारी थंडी वाजत आहे. ग्रीष्मकाल येईल तेव्हां मी इकडून जाणार; समजलास ?"

" प्रवासी इतकें म्हणून त्या रखरखीत तापलेल्या वाळूंतच झोंपीं गेला. एका क्षणांत तो मोठमोठयानें घोरूंहि लागला.

तो अगदींच बेभान झाला आहे असें जेव्हां संन्याशानें पाहिलें, तेव्हां

त्यानें उंटांच्या पाठीवरील सर्व सामानसुमान काढून एकामागून एक सर्व जमिनीवर ठेवावयास सुरूवात केली. त्यातून एकही वस्तू न चोरतां तीक्ष्ण दृष्टीनें त्या तो तपासूं लागला. त्यानंतर संन्यासी प्रवाशाच्या अंगावरील सारे कपडे, आंगरखा, मांडचोळणा, कमरबंद, फेंटा, शेला, शिरस्त्राण वगैरे सर्व बारकाईनें तपासूं लागला. शेवटीं निराश होऊन प्रवाशाच्या जोडयाचे तळवे उघडून तो तलास करूं लागला. तेथें त्याला दोन चिठ्या मिळाल्या. सन्याशानें त्यांतील मजकूर वाचून त्या पुनः जागच्याजागी ठेवून दिल्या व सामानसुमानहि पुनः जसेंच्या तसें व्यवस्थित ठेवून दिले. जलमिश्रित मादक पदार्थांच्या प्रभावानें प्रवासी अजून गाढ निद्रेंत मग्न होता.

संन्याशानें खर्जूरकुंजांतून बाहेर येऊन बांसरी वाजविली ती ऐकतांच दूर असलेल्या पर्वतप्राय रेतीच्या ढिगामागून एक घोडेस्वार आपल्या हातांत दुसऱ्या एका घोडयाचा लगाम धरून तेथें आला. संन्याशी त्याला म्हणाला, " नंदकुमार ! तुमचें म्हणणेंच सत्य ठरलें ! हा माणूस खरोखर इंद्रायुधाचा दूत आहे. याच्या जोडयांत इंद्रयुधाचीं पत्रें छपविलेलीं आहेत. आतां तो मादक अमृतरसाच्या प्रभावानें गुंग होऊन पडलेला आहे."

दोघेजण नंतर घोडयावर स्वार होऊन तेथून थोडयाच वेळांत दिसेनासे झाले.

• •

## १९

हेमंतऋतूच्या प्रभातकालीं बालसूर्याच्या मधुर किरणांनीं विंध्याचल पर्वताचें उंच शिखर सोनेरी रंगानें रंगलें होतें. तेव्हां नगराच्या प्रत्येक द्वारांत मंगलवाद्यें वाजूं लागल्यामुळें गुर्जरपति झोंपेंतून जागृत झाला. तरुण अरुणाचे कोमल किरण जेव्हां पर्वताच्या पायथ्याशीं असलेल्या भिल्लमाळ नगराच्या उच्च राजमहालावर पडले, तेव्हां गुर्जरराज नाग-

भट्टानें सभामंडपांत प्रवेश केला. नानाप्रकारचीं सुशोभित वस्त्रें परिधान करून आणि मस्तकावर जरीचे मंदिल बांधून गुर्जर प्रधानमंडळ सभागृहांत बसलें होतें. मंडपाबाहेर त्यांचें अस्त्रधारी सैनिक कोलाहल करीत उभे होते. त्यांच्या मागें भिल्लमाळचे नागरिक आणि गुर्जर देशांतील कांहीं शेतकरी राजदर्शनासाठीं उभें होते. राजानें दरबारांत प्रवेश करतांच प्रधानमंडळ उठून उभें राहिलें. राजाच्या आगमनामुळें जरी सैनिकांचा कोलाहल अंमळ शांत झाला, तरी सगळ्या मनुष्यांना कांहीं राजदर्शन घडून आलें नाहीं.

प्रधानमंडळ आपापल्या जागीं पुन: स्थानापन्न झाल्यावर एक सैनिक राजापाशीं येऊन व लवून अभिवादन करून म्हणाला, " कान्यकुब्जांच्या इंद्रायुधमहाराजांकडून एक दूत आलेला असून तो आपली मुलाखत घेऊं इच्छित आहे. "

अप्रसन्न मुद्रेनें नागभट्टानें कान्यकुब्जाच्या दूताला दरबारांत घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. गुर्जरराजाचा महाप्रतिहारी भूधर यानें राजाज्ञे-प्रमाणें वाचकांना पूर्वपरिचित असलेल्या प्रवाशाला घेऊन पुन: दरबारांत प्रवेश केला.

कान्यकुब्जदेशाच्या दूताचें डोळे मादक पेयाच्या प्रभावानें अद्यापिहि लालभडक दिसत होतें. त्यानें गुर्जरपतीला योग्य रीतीनें अभिवादन करून इंद्रायुधाचे पत्र त्याच्या हातीं दिलें. राजाज्ञेनें मुख्य प्रधान बाहुकधवलानें तें पत्र वाचण्यास आरंभ केला--

" परमेश्वर परममाहेश्वर परमवैष्णव परमभट्टारक महाराजाधिराज श्रीमत् नागभट्टदेवांच्या सेवेशी समस्त आर्यावर्त क्षोणीश चक्रवर्ती भंडीकुलावतंस महोदयाधिपति परमेश्वर परमभट्टारक महाराजाधिराज इंद्रायुध निवेदन करीत आहे कीं, राजद्रोहाच्या अपराधावरून स्वर्गस्थ महाराजाधिराजांचा पुत्र चक्रायुध यांस या राज्यांतून हद्दपार करण्यांत आलें होतें. वंशपरंपरागत राजद्रोही असलेल्या व आतां सम्राट पदवी धारण केलेल्या गौडाधिपतीनें त्याला आश्रय दिलेला आहे.

वाराणशी-काशीच्या मंडलेश्वरानें आणि प्रधान मंडळानें असा समाचार पाठविला आहे कीं, विद्रोही गौडाधिपतीच्या पुरोहितानें काशीच्या

पवित्र क्षेत्रांत, पतितपावनी गंगेच्या पुनीत जलांत उभे राहून हातांत जल धारण करून अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, गौडाधिपति धर्मपाळदेव चक्रायुधाचें रक्षण करील आणि त्याला त्याच्या वडिलोपार्जित राज्यासनावर बसवील.

" मुख्य प्रधान
हरिहरसेन
( महाराजांच्या हुकुमावरून )"

पत्र पुरतें वाचून होतांच नागभट्टानें मंद हास्य करून म्हटलें—

" दूता ! कान्यकुब्जाचे राजे एका सहाय्यहीन पुतण्याच्या भीतीनें एवढें गर्भगळित व्हावेंत या गोष्टीचें मला भारी नवल वाटतें. "

दूतानें कांहीं उत्तर न देता मौन धारण केलें. तेव्हां नागभट्टानें मुख्य प्रधान बाहुकधवलास प्रश्न केला, " सचिव ! गौडदेश कोठेसा आहे ? सरस्वतीचें तीरीं कीं दशदवर्ताचें कांठीं ?"

" महाराजाधिराज, गौडदेश मगधाच्या पूर्व सीमेच्या टोंकास आलेला आहे. आपल्या स्मरणांत असेलच कीं, गौडबंगालच्या नागरिकांनीं स्वर्गस्थ महाराजाधिराज वत्सराजाच्या प्रबल प्रतापानें भयभीत होऊन युद्ध न करतां गौडबंगालची श्वेत रंगाची दोन राजछत्रें त्यांना स्वेच्छापूर्वक पाठवून दिली होती. "

बाहुकधवलाच्या तोंडचें हे शब्द ऐकतांच गुर्जर प्रधानमंडळ मोठमोठ्यानें हंसू लागलें. परन्तु क्षणभरांतच त्यांच्या तोंडावरील तें हास्य मावळून त्याची जागा गंभीरतेनें पटकावली. वंगवासीयांनीं वत्सराजाच्या भयानें जीं ही श्वेतराजछत्रें युद्ध केल्याविना त्यास समर्पण केलीं होती, ती राष्ट्रकूटचा राजा ध्रूवधारावर्ष यानें वत्सराजास पराभूत करून परत हस्तगत करून घेतली होती. पराजयाचें हें शल्य अजूनहि गुर्जरवासीयांच्या मनांत भारी डांचत होते. कांहीं वेळ मौन धारण केल्यानंतर नागभट्टानें प्रश्न केला, " गौडराजाला सम्राट् ही पदवी केव्हांपासून मिळाली ?"

कान्यकुब्जाच्या राजदूतानें प्रत्युत्तर दिलें, " थोड्या दिवसांपूर्वीं गौडच्या सामंत मंडळानें आपल्यांतील एका सामंतास निवडून सम्राट् पदावर स्थापिलें. "

" त्या राज्याचा विस्तार कितीसा मोठा आहे ?" नागभट्टानें पुन: प्रश्न केला.

" लौहितीच्या तीरापासून तो हिरण्यव्हापर्यंत तें राज्य पसरलेलें आहे."

नागभट्ट पुन: मंद हास्य करून म्हणाला, " या साम्राज्याच्या सम्राटाच्या भयानें महोदयपति इंद्रायुध भयभीत झाले असतील, तर त्यांना वानप्रस्थाश्रम स्वीकारण्यास सांगितलें पाहिजे."

गुर्जराजाचें हे शब्द ऐकतांच प्रधानमंडळांत पुन: हास्यध्वनि उमटला. लज्जेनें चूर होऊन कान्यकुब्जदेशाचा दूत खालीं मान घालून मुकाट्यानें उभा राहिला. कांहीं वेळानंतर नागभट्टानें प्रश्न विचारला, " कान्यकुब्ज सोडल्यास तुम्हांला किती दिवस झाले ?"

" सुमारें चार महिने." दूतानें उत्तर दिलें.

" भिल्लमाळाला तूं आजच आलास वाटतें ?"

" नाहीं. नगराच्या सीमेवर कालच दोन प्रहरीं येऊन पोहोंचलों होतों."

" मग कालच्या काल नगरांत कां आला नाहींस ?"

" महाराजाधिराज ! काल मी महान् संकटांत पडलों होतों."

" तूं राजदूत ! तुजवर महान संकट तें कसलें ?"

" महोदयपति इंद्रायुधांच्या आज्ञेनें मी येथें गुप्त वेषानें आलों आहे."

" तूं कोणत्याहि वेषांत असलास तरी या नगराच्या सीमेवर तुजवर असें कोणते संकट कोसळले होतें तें तरी कळूं दे !"

" महाराज ! एका संन्याशानें रेतीच्या मैदानांत मी विश्रांति घेत असता कसलासा काळा प्रवाही मादक पदार्थ मला पाण्यातून पाजला. त्यामुळें जवळजवळ तीन तास बेशुद्ध पडलों होतों."

" तुझी कांहीं वस्तु चोरीस तर नाहीं ना गेली ?"

" नाहीं."

" तर मग तुला मादक पेय पाजण्याचे त्याला काय कारण होतें ?"

" कोण जाणे ! असें करण्यांत त्याचा हेतु कोणता तेंच माझ्या लक्षांत येत नाही."

" ठीक आहे. आतां तूं विश्रांति घे. उदयीक कान्यकुब्जाधिपतीला काय उत्तर द्यावयाचें तें देईन."

नागभट्टाला लवून प्रणाम करून दूत तेथून निघून गेला.

तो गेल्यानंतर नागभट्टानें बाहुकधवलाला प्रश्न केला, " बाहुक ! नगराच्या सीमेवर कान्यकुब्जराजाच्या दूताला पाण्यांतून मादक पदार्थ पाजून कोणी बरें बेशुद्ध केले असावें असें तुम्हांस वाटतें ? त्याची एकहि वस्तु चोरीला गेलेली नाहीं."

मस्तक नम्र करून अमात्यानें उत्तर दिलें, " महाराजाधिराज ! हें गौडबंगाल काय असावें तें माझ्या मुळींच लक्षांत येत नाहीं."

त्या वेळीं सभागृहाच्या दुसऱ्या बाजूला बसलेला वृद्ध पुरोहित महाशंकरशर्मा आसनावरून उठून उभा राहिला आणि आरक्त दृष्टीनें म्हणाला, " वसिष्ठगोत्रज गुर्जरप्रतिहारवंशीयांचें सदैव शुभचिंतकच असणार; म्हणून या वृद्ध ब्राह्मणाला वाचाळपणाबद्दल क्षमा असावी. चालुक्यवंशाचें अमात्यराज बाहूकधवल यांच्या ध्यानांत न येण्याजोगी या गुर्जराज्यांत एक तरी घटना असणें शक्य आहे काय ? ऐका, बाहुकधवल ! लज्जेमुळें महाराजांसमक्ष असत्य बोलूं नका. आर्यावर्तांत आणि दाक्षिणात्यांत देव-ब्राह्मणांचे शत्रु कोण, तें तुम्हाला माहीत नाहीं का ? भंडीचे वंशज आणि अग्निकुळ यांचे एकमात्र आश्रयस्थान कोणते ? हर्षाच्या पश्चात् अंधकारांत इकडून तिकडे एखाद्या लुटारूप्रमाणें कोण रखडत फिरत आहेत ? त्यांनींच कान्यकुब्जाच्या राजदूताला मादक पेय पाजून तें गुप्त पत्र वाचून पाहिलेलें आहे."

वृद्ध पुरोहिताचे हे शब्द ऐकतांच सर्व सभा अगदीं स्तंभित झाली. मात्र वृद्ध अमात्य बाहुकधवल सिंहासनाजवळ एखाद्या पाषाणमूर्तीप्रमाणें निश्चल उभा राहिला. क्रोधानें नागभट्टाचा चेहरा अगदीं लालबुंद झाला. क्रोधानें थरथर कांपत तो सिंहासनावरून उठून उभा राहिला. महाशंकरशर्मा पुन: बोलूं लागला, " महाराज ! वृद्धाचा हा उपदेश ऐका; बौद्धधर्मीय लोकच राज्याचे खरे शत्रु आहेत. बौद्धधर्मीचा उच्छेद करून आपण देवब्राह्मणाचे रक्षण करा. जर असें कराल तर नहुश, ययाति आणि अंबरीष या राजांप्रमाणें जग आपल्या कीर्तीचे पोवाडे गाईल ! "

तें ऐकून नागभट्ट म्हणाला, " पुरोहित महाराज ! आपलें म्हणणें सत्य आहे. बौद्धधर्मीय आर्यावर्ताचे खरे शत्रु आहेत. जर बौद्धधर्माचा वेळींच नायनाट न केला, तर ब्राह्मणधर्म लयाला जाईल. मी महाराजाधिराज वत्सराजाचा पुत्र हें माहीत असूनसुद्धां माझाहि अपमान करावयास या लोकांस दिक्कत वाटली नाहीं. मग इतरांविषयीं तर बोलावयासच नको ! त्यांनीं केलेला हा अपमान मी कदापिहि विसरणार नाहीं. कोण आहे रे तिकडे भूधर ?"

" महाराजाधिराजांची काय आज्ञा आहे ? " असें म्हणत हात जोडून भूधर पुढें झाला.

" विहारस्वामी मणिधरसेन कोठें आहे ? " नागभट्टानें विचारलें.

" या नगरांतच महाराज ! " भूधरनें उत्तर दिलें.

" जा, एका क्षणांत त्याला कैद करून माझ्यासमोर आणून हजर कर. " नागभट्टानें हुकूम केला.

महाप्रतिहार भूधर अभिवादन करून सभागृहाबाहेर पडला. तो निघून गेल्यानंतर अमात्यराज बाहुकधवलाचे तोंड उघडलें. त्यानें गुर्जर-पतीचा हात धरून म्हटलें,--

" तात, आठवण ठेवा; मीहि आपल्याला बंधुसमान आहे; आणि माझेहि वाडवडील दीर्घकालापासून प्रतिहारवंशाची सेवा बजावीत आलेले आहेत. तात, मी बौद्धधर्मी आहे हें सर्वांना माहितच आहे, आणि आपणहि जाणत असालच ! परंतु बाहुकधवल प्रतिहारवंशाचे अमंगल इच्छितो असे सांगणारा जगांत एकहि सांपडणार नाहीं. महाराज ! बौद्धधर्माचें आचार्य मणिधरसेन यांनीं किंवा कोणी श्रमण भिक्षुकानें कान्यकुब्ज देशाच्या राज-दूताला मादक पेय पाजून तें गुप्त पत्र वाचलें असेल, तर निःसंशय तो शिक्षेस पात्र आहे. आपण राजे आहांत ! प्रत्येक प्राण्याच्या जीवनमरणाचे अधीश्वर आहांत. आपल्या केवळ अंगुलीनिर्देशानें आर्यावर्त बौद्धधर्मी-यांच्या रक्तानें रंगून जाईल. एका अपराध्याबरोबर शेंकडों निरपराधी जीवांची हत्या होईल. आपण महान् बुद्धिशाली आहांत. म्हणून म्हणतों कीं, विचार करा आणि क्रोधाच्या स्वाधीन होऊन अन्याय्य आचरण करूं

नका. योग्य विचार करून न्यायानें गुन्हेगाराला योग्य ते शासन करा, एवढीच या वृद्ध चालुक्याची विनंति आहे. "

" बाहुकधवल ! प्रिय मंत्रिवर ! मी क्रोधायमान झालों होतों ही गोष्ट खरी आहे. परंतु मी शपथ पुरस्सर सांगतों कीं, विचार केल्याविना मी कोणालाहि प्राणदंडाची शिक्षा ठोठावणार नाहीं. मुख्य न्यायाधीश आणि महादंडनायक मणिधरसेनाचा योग्य तो न्याय करतील. "

गुर्जरराजाचें हें शब्द ऐकतांच महापुरोहित महाशंकरशर्मा दीर्घ निःश्वास सोडून पुनः आसनस्थ झाला. इतक्यांत एका पहारेकऱ्यानें येऊन राजास निवेदन केलें कीं, महाप्रतिहार भूधर बौद्धाचार्य मणिधरसेनासह दरवाजावर उभे असून आज्ञेची वाट पहात आहेत. तें ऐकून बाहुकधवल तात्काल सभागृहाचा त्याग करून सामोरा गेला. तत्क्षणीं मणिधरसेन आणि भूधर यांनीं दुसऱ्या दरवाजानें सभागृहांत प्रवेश केला. सिंहासनान्मुख उभे राहून महाप्रतिहार भूधर म्हणाला--

" महाराजाधिराज, दासानुदासाचा अपराध क्षमा करा, आचार्य मणिधरसेनांना कैद करून आणण्यासाठीं आपल्या हुकूमाप्रमाणें मी तांतडीनें जात होतों, इतक्यांत समोरून हेंच इकडे येतांना वाटेंतच भेटले. तें आपणालाच भेटावयास येत आहेत असें त्यांच्या तोंडून समजल्यानें मी त्यांना बंदिवान केलें नाहीं. "

नागभट्टानें त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून मणिधरसेनास प्रश्न केला, " आचार्य, आपण राजसभेंत कशासाठीं येत होतां ?"

" नगरपालाविरूद्ध फिर्याद देण्यासाठीं. "

" कशाची फिर्याद ?"

" गेल्या रात्रीं दोन भिक्षुकांना नगरपालानीं नगरांत प्रवेश करूं दिला नाहीं, त्याबद्दलचीं ! "

" ते भिक्षुक कुठें गेलें होतें ?"

" गांवोगांव भिक्षा मागण्यास. "

" ठीक, आपल्या फिर्यादीचा विचार केला जाईल; पण याबेळीं

आमच्याकडे बौद्धसंघाविरुद्ध एक फार मोठी फिर्याद आलेली आहे."

"कशाबद्दल महाराज ?"

"काल दोन प्रहरीं कान्यकुब्जदेशाचा एक राजदूत माझ्या नांवचे एक गुप्त पत्र घेऊन माझ्याकडे येत होता; पण तो नगराच्या सीमेवर आल्यानंतर तुम्ही अगर तुमच्यापैकीं कोणी तरी भिक्षुकानें त्या राजदूताला मादक पेय पाजून तें गुप्त पत्र वाचलें."

"महाराजाधिराज ! धर्म सर्वत्र विद्यमान आहे. धर्माला साक्षी ठेवून मी सांगतों कीं फिर्याद सर्वस्वी खोटी आहे."

"तर मग या बाबतींतील तुमचें निरापराधित्व शाबीत करून दाखवा."

"ज्यानें माझ्याविरुद्ध फिर्याद केलेली आहे, त्यानें प्रथम मी अपराधी आहें हें पुराव्यानें सिद्ध करून दाखवावें,"

ठीक. पण या गोष्टीला कांहीं कालावधि लागेल, जोंपर्यंत या फिर्यादीचा निकाल लागणार नाहीं, तोंपर्यंत तुम्हांला कैदेंत रहावें लागेल."

"काय, मला कैदेंत रहावें लागेल म्हणता ?"

"केवळ तुम्हांला एकट्यालाच नव्हे, तर गुर्जरराज्यांतील सर्व बौद्धधर्मीय भिक्षुकांना !"

"जशी महाराजांची इच्छा !"

● ●

## २०

श्राद्धक्रिया समाप्त झाल्यानंतर महाराजाधिराज धर्मपाळदेव राजमहालयांतील एका दालनांत बसून विश्रांति घेत होते. गर्गदेव सर्व ब्राह्मणांना यथोचित दान देऊन संतोषित करीत होते. दुसरीकडे महाकुमार वाक्पाल आणि राजकुटुंबांतील इतर पुरुष ब्राह्मण भोजनाच्या तयारींत गुंतले होते, अशा वेळीं संन्याशी विश्वेश्वरानंद महाराज धर्मपाळदेव बसले होते त्या जागी आले. त्या वेळीं महाराज मस्तकावर हात टेकून कसलासा

विचार करीत होते. पण स्वामी विश्वेश्वरानंदांना आलेले पाहतांच ते उठून उभे राहिले.

संन्याशी विश्वेश्वरानंद धर्मपाळदेवांजवळ जाऊन अगदीं हलक्या आवाजांत म्हणाले, " धर्मपाळदेव ! आज रात्रौ तुम्हीं अंतःपुरांत जाऊं नका."

विस्मयचकित होऊन सम्राटांनीं प्रश्न केला, " कां बरें प्रभु ?"

" आज रात्रौ तुम्हांला एके ठिकाणीं घेऊन जावयाचें आहे."

" कोठें प्रभु ? आज श्राद्धाचा दिवस. तेव्हां परगांवीं आतां जावयाचें नाहीं शिवाय श्राद्धाच्या दिवशीं नदी ओलांडणें हेंसुद्धां निषिद्ध आहे."

" आपणांला परगांवीं जावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें नदीहि ओलां-डावयाची नाहीं."

" मग मला कोठें नेणार प्रभु ? "

" या नगरांतच."

" काय म्हणतां ? या नगरांत ? "

" होय धर्मपाळ ! गौडनगरांतच एका स्थळीं आपणांला जावयाचें आहे. बरोबर शस्त्रास्त्रांची मुळींच जरूरी नाही, तेव्हां ती बरोबर घेण्याची कांहीं आवश्यकता नाहीं.

" शस्त्रास्त्रेसुद्धां नको म्हणतां, प्रभु ? " धर्मपाळदेवांनीं प्रश्न विचारला.

" जर तुम्ही बरोबर शस्त्रास्त्रें घ्याल, तर आपला हेतु सिद्धीस जाणार नाहीं." स्वामींनीं सांगितलें.

" आत्मरक्षणार्थसुद्धां हत्यारें जवळ नको म्हणतां ? "

" धर्मपाळ ! जोपर्यंत विश्वेश्वरानंदाच्या देहांत प्राण आहे. तों-पर्यंत तुमच्या शरीराला स्पर्श करण्याची कुणाचीहि प्राज्ञा नाहीं.

" प्रभु ! माझ्या दुराग्रहाबद्दल मला क्षमा असावी. परंतु ज्या स्थळीं आपणांला जावयाचें आहे, त्या स्थळाचें नांव समजून घेण्याची अनिवार उत्कंठा माझ्या मनाला लागलेली आहे."

" आपण राजवाड्याबाहेर पडलों की, मी ते नांव आपणांस सांगेन." स्वामींनी आश्वासन दिलें.

संध्याकाळ होण्यापूर्वी ब्राह्मणभोजन समाप्त झालें. गौडाधिपति महाराजधिराज धर्मपाळ जेवण आटोपून परत दिवाणखान्यांत आले. अजूनहि राजमहालाजवळच्या आंगणांत शेंकडों दरिद्रीं, अनाथ, भिक्षुक जेवीत होते. गर्गदेव आणि कुमार वाक्पाळ यांचे कामकाज अजूनहि आटोपलें नव्हतें, अंधार पडतांच चोहींकडे दीपमालांचा लखलखाट झाला. परन्तु दिवाणखान्यांतील दिवें धर्मपाळदेवांच्या आज्ञेनें मालविण्यात आलें. सुमारें रात्रींचा एक प्रहर लोटल्यावर विश्वेश्वरानंदांनीं त्या ठिकाणीं प्रवेश केला.

त्यांनीं आज भगव्या वस्त्राऐवजीं रक्तवर्ण वस्त्रे परिधान केलीं होतीं. त्यांच्या गळ्यांत रुद्राक्षाऐवजीं मोठ्याल्या शिंपल्यांची माळ होतीं आणि हातांत हाडांपासून बनविलेलीं एक कांठीं होती. त्यांना येतांना पाहून धर्मपाळदेव उठून उभे राहिलें. दुरुनच विश्वेश्वरानंदांनीं त्यांना विचारलें. " धर्मपाळ ! तुम्ही मजबरोबर यावयास तयार आहांत ना ? "

" होय प्रभु ! माझी तयारी आहे. " उत्तर मिळालें.

" तर मग चला मजबरोबर ! "

दोघेहिजण दीपमालांनीं प्रकाशित असलेल्या राजमहालांतून बाहेर पडून राजमार्गावर आले, विश्वेश्वरानंदांनीं येतांना बरोबर दोन वस्त्रें आणली होतीं, त्या वस्त्रांनीं दोघांनींहि पायांपासून डोईपर्यंत आपलें आंग अगदीं झांकून घेतलें. नंतर ते पुढें चालूं लागलें राजवाड्यासमोरील आंगण पसार केल्यानंतर धर्मपाळदेवांनीं विचारले, " प्रभु ! आज आपणाला कोणत्या स्थळीं जावयाचें आहे ?"

अस्फुट स्वरांत स्वामींनीं सांगितलें, " मणिदत्ताचें घरीं, धर्मपाळ ! आज मणिदत्ताचें दान ग्रहण करावयाचें आहे. "

" प्रभु ! तें दान तूर्त देतां येत नाहीं असें त्यांनीं आपणांला सांगितलें होतें ना ? तें धन मिळविण्याची योग्यता अद्यापि माझ्या अंगीं आलेलीं नाहीं."

" आजपासून ती पात्रता आपल्या अंगी आलेली आहे." स्वामींनीं गंभीर स्वरांत म्हटलें.

" असे आपण कशावरून म्हणतां प्रभु ? "

" आज सकाळीं घडून आलेला प्रसंग आठवतो ना ?"

" कोणता प्रसंग ?"

" चक्रायुधाला आपण आश्रय दिला तो. "

" होय. पण ही गोष्ट इतक्यांत त्यांच्या कानींहि गेली म्हणतां ?"

" खात्रीनें. ही गोष्ट त्यांना कळली आहे. "

या नंतर दोघेहि कांहीं न बोलतां मुकाट्यानें विशाल राजमार्ग सोडून एका अरुंदशा बोळानें चालूं लागले. सुमारें तासभर तो अंधकारमय मार्ग आक्रमल्यानंतर एका जीर्ण अट्टालिकेपाशीं ते येऊन पोहोंचले. ती अट्टालिका पहातांच ते मणिदत्ताचे गृह असे धर्मपाळदेवानें तात्काळ ओळखले.

त्या पुरातन जीर्ण गृहाच्या द्वारांत कोणींहि माणूस नव्हतें. त्याचप्रमाणें दारेंहि लावून घेण्यांत आलीं नव्हतीं. नगराच्या त्या भागांतील लोक दिवे मालवून निद्राधीन झालें होतें. चोहों दिशांस शांतता पसरली होती. मध्येच एखाददुसरा निशाचर पक्षी आकाशमार्गानें उडून जात होता.

नेहमींच्या संवयींप्रमाणें धर्मपाळदेवांनीं आपला हात आपल्या कमर पट्ट्यांकडे नेला; पण तेथें तरवार नाहींशीं पाहून ते चमकले. लगेच स्वामींच्या आज्ञेप्रमाणें ती आपण राजवाड्यांतच ठेवून आलों, या गोष्टींचें त्यांना स्मरण झालें.

विश्वेश्वरानंदांनीं त्या अंधकारमय गृहांत प्रवेश केला. कांहीं दूर गेल्यानंतर दोघेहीजण थबकले; कारण त्या ठिकाणीं बऱ्याचशा माणसांच्या पावलांची त्यांना चाहूल लागली. चारी दिशांस घोर अंधार पसरला होता. त्या पुरातन गृहांत अंधारांत वारंवार त्यांना ठोकरा लागत होत्या. स्थिर उभे राहिल्यानंतर धर्मपाळदेवांनीं विचारले, " प्रभु ! कांहीं ऐकलें का आपण ? "

अस्फुट स्वरांत स्वामी म्हणाले, " होय, कांहीं ऐकूं येतें खरें; पण आपण अगदीं भिऊं नका. "

मन्द हास्य करून गौडाधिपति म्हणाले, " नाहीं, मी भीत नाहीं. पुष्कळशा माणसांच्या पावलांची चाहूल ऐकूं येत आहे. त्याचप्रमाणें घरांत फार दिवसांचा केरकचरा सांठलेला दिसतो. अंधार असला तरी पुष्कळ दिवसांत या घरांत कोणी फिरकले नसावें असें वाटतें. "

" होय धर्मपाळदेव ! तुमचे म्हणणें खरें आहे. या घरांत पुष्कळ दिवसांपासून कोणीहि माणूस आलेलें नाहीं व येथील केरकचराहि कोणी काढलेला नाहीं. आपल्या तर्काप्रमाणें आज येथें बरींच माणसें जमलेलीं आहेत ही गोष्ट खरी आहे. लौकरच आपण त्यांना पाहूं. "

दोघेजण पुन: पुढें चालूं लागले. कांहीं दूर गेल्यानंतर त्यांनीं एका अंधाराच्या कोठडींत प्रवेश केला. परंतु त्यांचा आंत प्रवेश होतांच मागील खेपेप्रमाणेंच पूर्ववत द्वार बंद झालें आणि चारी बाजूंना विटांच्या भिंती दिसूं लागल्या. त्या भिंतीच्या आंतील भागांत प्रवेश करण्याचा एकहि रस्ता त्यांना दिसेना. त्यावेळीं रात्रीचा दुसरा प्रहर असल्यामुळें नगरांत मंगलवाद्यें वाजूं लागलीं होतीं. देवमंदिरांत होणारीं मध्यरात्रींचीं आरती व शंखनादांचा ध्वनि कानांवर येत होता तीं वाद्यें बंद होतांच अंधरांतून कोणीसा प्रश्न विचारला, " तुम्हीं कोण ?"

स्वामींनी उत्तर दिलें, " मी चक्रराज विश्वेश्वरानंद."

" आणि हा दुसरा कोण ?"

" हे गौडाधिपति महाराजाधिराज धर्मपाळदेव. "

" यावें. महाराजाधिराज धर्मपाळदेव, यावें ! आम्ही आपलें स्वागत करतों." एकाएकीं ध्वनि ऐकूं आला. तत्क्षणीं तेथील निस्तब्धतेचा आणि भयाणतेचा भंग करून करुण स्वरांत कोमल कंठांतून निघालेला एक संगीत ध्वनि कर्णपथावर आला. तो मधुर गीतध्वनि फार दुरून एखाद्या कोमल स्त्रीच्या कंठांतून निघत आहे असा धर्मपाळदेवांना भास झाला. गायन संपतांच अंधारांतून पुन: कोणीसा प्रश्न विचारला, " चक्रराज विश्वेश्वरानंद आणि गौडाधिपति धर्मपाळदेव ! आपणाला काय पाहिजे?"

" मणिदत्ताची धनसंपत्ति. " संन्याशानें प्रत्युत्तर दिलें.

एकाएकीं त्या गृहांत चक्क नील प्रकाश पडला. पूर्वीं आपण एकवार ज्या गृहांत आलों होतों तेंच गृह हें धर्मपाळदेवांनीं ओळखलें. गृहाच्या एका बाजूला कसल्याशा देवाची मूर्ती होती. तिच्या मागून तो नील प्रकाश येत होता; आणि त्या देवमूर्तीच्या सन्मुख पूर्वपरिचित, दीर्घदेहधारी, तोच ठेंगणा व कुरूप वृद्ध उभा होता. उज्वल प्रकाश जेव्हां घरभर पसरला

तेव्हां तो वृद्ध म्हणाला, " गौडाधिपति महाराजाधिराज धर्मपाळदेव ! आपलें स्वागत असो ! "

गुडघे टेकून धर्मपाळदेवानें त्याला प्रणाम केला. वृद्धानें विश्वेश्वरानंदाकडे ढुंकूनहि पाहिलें नाहीं. वृद्ध उठून उभा राहिला. आणि म्हणाला, " महाराजाधिराज ! या दीनाच्या अपराधाची क्षमा करा. परमपूज्य आचार्य मंडळाच्या आज्ञेनें अंधारांत हा वेळपर्यंत आपणांला तिष्ठत ठेवावें लागलें. आर्यावर्त आणि दाक्षिणात्याची भट्टारक–आर्य–महा–संगीति महाराजांच्या भेटीची मार्गप्रतीक्षा करीत आहे; तरी या वाटेनें चलावें."

धर्मपाळदेव आणि विश्वेश्वरानंद दोघेहि चालूं लागलें, पण त्यांना फार दूर जावें लागलें नाहीं. त्यांच्या समोरील भिंत नाटकाच्या पडद्याप्रमाणें एका बाजूला सरकली. धर्मपाळदेवानीं विस्मयचकित होऊन पाहिलें तों समोर एक विशाल दिवाणखाना असलेला त्यांना दिसला. तींत मुंडण केलेले शेंकडो भिक्षुक अर्धवर्तुलाकार उभे होते. त्या खोलीच्या मध्यभागीं एक सुवर्णसिंहासन होतें. त्यावर एक चैत्य, एक ग्रंथ आणि एक बुद्धाची मूर्ति होती. या त्रिरत्नांस धर्मपाळदेव आणि विश्वेश्वरानंद या दोघांनींहि साष्टांग प्रणिपात केला.

ते पाहून त्या साधुमंडळांतून एक भिक्षुक पुढें येऊन म्हणाला, " गौडाधिपति महाराजाधिराज धर्मपाळदेव, यावें ! महाराज ! भारतवर्षीय भट्टारक–आर्य–महासंगीति आपल्या दर्शनासाठीं या स्थळीं आलेले आहेत. "

धर्मपाळदेवांनीं जमिनीपर्यंत मस्तक लववून सर्व साधूंना प्रणाम केला. त्यासरशीं त्यांच्यासमोर असलेल्या अतिशय वृद्ध महास्थवीरानें जमिनीपर्यंत मस्तक टेंकून गौडाधिपतीस उलट प्रणाम केला. तें पाहून धर्मपाळदेवांना भारी नवल वाटलें. वर सांगितलेल्या साधूनें धर्मपाळदेवांचा हात धरून त्यांना त्रिरत्नांच्या सुवर्णमय सिंहासनाजवळ नेलें व तो म्हणाला, " गौडेश्वर ! या त्रिरत्नांना स्पर्श करून शपथ घ्या कीं, येथें जें जें कांहीं पहाल किंवा ऐकाल, तें केव्हांहि बाहेर प्रकट करणार नाहीं."

धर्मपाळदेवांनी त्रिरत्नांना स्पर्श करून त्याप्रमाणें शपथ घेतली. तेव्हां वृद्ध भिक्षु तेथून दूर उभा राहून म्हणाला, " गौडेश्वर ! मी बौद्धधर्माच्या आचार्यमंडळांतील सर्वांत वृद्ध साधु आहें. माझें नांव बुद्धभः. आपल्यासमोर जे हे सगळे साधु उभे आहेत, ते सर्व आर्यावर्त आणि दक्षिणात्य बौद्ध-संघाचें नेतें आहेत. आज कांहीं विशिष्ट कारणास्तव आम्हीं सर्व या ठिकाणीं जमलों आहोंत. आज कांहीं दिवसांपूर्वी गौडवासी मणिदत्तानें राढ देशांत गंगेकांठीं स्वतःच्या विपुल संपत्तीचें आपल्याला दान केलें हें खरें ना ? "

" होय. " धर्मपाळदेवांनीं नम्रपणें उत्तर दिलें.

" आपण आणि चक्रराज विश्वेश्वरानंद कांहीं दिवसापूर्वी मणिदत्ताचीं संपत्ति नेण्यासाठीं इकडे आला होतां हें खरें ना ? "

" होय. आम्ही आलों होतों. "

" त्यावेळीं संघाच्या आज्ञेनें तूर्त धन मिळावयाचे नाहीं. पण ते मिळविण्याची पात्रता अंगीं आल्यावर तें मिळेल असे मीच तुम्हांला सांगितलें होतें ना ? "

" होय. "

" आज कान्यकुब्जाच्या निराश्रित राजकुमाराला आश्रय देऊन मणिदत्ताच्या संपत्तीचे उत्तराधिकारी होण्याची पात्रता आपण आपल्या अंगीं आणलेली आहे. दुर्बलास प्रबलांच्या जाचांतून सोडविण्याची प्रतिज्ञा करण्यांत जो मनाचा थोरपणा आपण प्रगट केलेला आहे; त्यावरून मणिदत्ताच्या संपत्तीच्या आपल्या हातून केव्हांहि दुरुपयोग होणार नाहीं, अशी बौद्धधर्ममंडळाच्या आचार्यांची पूर्ण खात्री होऊन चुकलेली आहे.

गौडेश्वर आर्यावर्तांत सद्धर्माचा ऱ्हास होत आहे. बंगाल आणि लाट-देशांत शाक्यराजकुमाराच्या धर्माचे अस्तित्व कांहींसे राहिलेलें आहे आणि तें सुद्धां अगदीं नामशेष होण्याच्या बेतांत आहे.

दक्षिणपंथांत अनार्य अत्याचार करीत आहेत आणि त्या स्थळीं धर्माला कवडीचाहि मान राहिलेला नाहीं. जे खरें धर्मनिष्ठ आहेत आणि जे सद्धर्माचें प्रतिपालन यथायोग्य करीत आहेत. त्यांची इच्छा हीच कीं,

संसारमुक्त होऊन खरें निर्वाण प्राप्त करून घ्यावें. महाराजाधिराज हर्षाचा पुत्र निधन पावल्यानंतर आर्यावर्तांत सद्धर्माचा विनाश होत चालला आहे. बौद्धधर्माची आचार्य मंडळी तेव्हांपासून आश्रयाच्या शोधार्थ फिरत आहे. आर्यावर्तांत वैश्यगण सद्धर्मानुरागी असल्याकारणानें जे निपुत्रिक असतात ते सद्धर्मानुसार आपली संपत्ति सद्धर्माच्या सेवेसाठीं अर्पण करीत असतात. म्हणून मणिदत्ताची संपत्ति आतां बौद्ध संघाच्या आचार्यांच्या मालकीचीं आहे. महासंगीति–बौद्धधर्मांच्या आचार्य मंडळानें पुष्कळ विचाराअंतीं असे ठरविलें आहे कीं, या संपत्तीचा जर सद्धर्मासाठीं विनियोग करण्यांत येईल, तर ती आपणांला समर्पण करावी."

" सद्धर्माची सेवा म्हणजे काय ? " धर्मपाळदेवांनीं प्रश्न विचारला.

" बौद्धधर्माचें रक्षण करणें. " वृद्ध स्थविरानें उत्तर दिलें.

" सद्धर्माचें रक्षण करतांना अन्य धर्मीयांचें नुकसान होईल असें कांहीं करण्याची आवश्यकता नाहीं ना ?"

" नाहीं, बिलकूल नाहीं. " प्रत्युत्तर मिळालें.

" तर मग माझी कोणत्याहि प्रकारची हरकत नाहीं, " धर्मपाळदेव म्हणाले.

" गौडाधिपतींना बौद्धसंगाच्या आचार्यमंडळाचें दुसरेंही एक सांगणें आहे. "

" ते कोणतें ?"

" गौडाधिपति सद्धर्मनिरत, पराक्रमी आणि न्यायपरायण आहेत. म्हणून महासंगीतीचा असा आग्रह आहे कीं, गौडेश्वरांनीं सर्व भारतवर्षांत अत्याचाऱ्यांच्या जुलुमापासून सद्धर्मीयाचें रक्षण करण्याचा भार स्वतःच्या शिरावर घ्यावा. "

" मोठ्या खुषीनें मी तो भार ग्रहण करीत आहे. "

" तुम्ही काय म्हणालांत ? पुनः सांगा पाहूं. "

" अत्याचाऱ्यांच्या जुलुमापासून सद्धर्मीयांचें रक्षण करावयास मी केव्हांही मागेंपुढें पाहाणार नाहीं. "

" तिसऱ्यांदा पुनः हें सांगा पाहूं. "

" सद्धर्मीयांचे मी रक्षण करीनच करीन अशी दृढ प्रतिज्ञा करतो. "

धर्मपाळदेवांच्या तोंडचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच सर्व साधूंनीं आणि बुद्धभद्रानें धर्मपाळदेवांचा जयजयकार केला. नंतर बुद्धभद्र पुन: म्हणाला--

" महाराजाधिराज ! खरोखरीच रक्षण करीन अशी पुन: आणखी एकवार आपणाला शपथ घ्यावी लागेल. बोला, मी महाराजाधिराज गोपाळदेवांचा पुत्र, परमेश्वर, परमसौगत, परमभट्टारक-महाराजाधिराज, गौडाधिपति धर्मपाळदेव त्रिरत्नांना स्पर्श करून अशी प्रतिज्ञा करतों कीं, आजपासून मी सद्धर्माची रक्षा करण्यांत आणि सद्धर्मीयांची सेवा करण्यांत स्वत:चे जीवित व्यतित करीन. "

धर्मपाळदेवांनीं बुद्धभद्रांनीं सांगितल्याप्रमाणें तेच शब्द पुन: उच्चारले प्रतिज्ञा पूर्ण होतांच पुन: गायनास सुरुवात झाली. त्याबरोबर शेंकडों भिक्षुक आणि भिक्षुकिणींनीं गृहांत प्रवेश करून त्रिरत्नांस आणि धर्मपाळ देवास प्रदक्षिणा घालावयास सुरुवात केली. तीनदां अशी प्रदक्षिणा करून झाल्यावर गायन बंद झाले. तेव्हां बुद्धभद्रानें तीन शरणमंत्रांचा उच्चार केला.--

" बुद्धं शरणं गच्छामि, धर्मं शरणं गच्छामि, संघं शरणं गच्छामि "

सर्वांनीं या त्रिशरण मंत्रांचा उच्चार करून त्रिरत्नांस प्रणाम केला. नंतर बुद्धभद्र म्हणाला, " महाराजाधिराज ! भांडारांत चलावे आता. "

धर्मपाळदेव पुढें निघाला तों नगरांत नगरद्वारांवर ठिकठिकाणीं चौथ्या प्रहरचे चौघडे वाजूं लागलें. सगळ्या देवमंदिरांतून आरतीचें शंखनाद होऊं लागले. धर्मपाळदेवांनीं स्वामी विश्वेश्वरानंदांना विचारलें,

" प्रभु ! अजुन रात्र कितीशीं आहे ? "

स्वामींनीं उत्तर दिले, " रात्र जवळजवळ संपत आलेलीं आहे. "

बुद्धभद्र, विश्वेश्वरानंद आणि धर्मपाळदेव भांडारांत जाऊन पाहातात तों तें अगदीं रिकामे असल्याचें दिसून आलें. विस्मयचकित होऊन धर्मपाळदेव म्हणाले, " महास्थिवर ! मणिदत्ताचे द्रव्य कोठें आहे ? "

मंद हास्य करून वृद्ध महास्थिवर म्हणाला, " मणिदत्ताचे सर्व द्रव्य

वाघेश्वरीच्या घाटावर नौकेंत चढविलेलें आहे. ती नौका आपण राजमहालांत घेऊन जा."

• •

## २१

प्रात:कालीं राजपुरोहित शिवशंकरशर्मा जलदजलद पावलें टाकीत गौडाच्या राजमार्गावरून राजमहालाकडें यावयास निघाला होता. या वेळीं गौडवासी अजून झोपेंतून जागेही झाले नव्हते. रस्त्यांतून क्वचित् एखाद् दुसरा इसम जातां येतांना दिसे. त्या वेळीं समोरून राजवाड्याच्या दिशेने पूजासाहित्य कमरेवर घेऊन एक रमणी येत होती.

शिवशंकरशर्म्याला उतावळीनें येतांना पाहून ती उभी राहिली. तो जवळ आला तेव्हां ती म्हणाली—

"कोण पुरोहितजी ? इतक्या पहांटेस कुठें चालली आहे आपली स्वारी इतक्या उतावळीनें ?"

पुरोहितानें तिच्या तोंडचे हें शब्द ऐकल्या न ऐकल्यासारखे केलें आणि तिच्याकडे न पाहिल्यासारखें दर्शविलें. त्याला तसेंच पुढें जातांना पाहून ती स्त्री पुन: म्हणाली—

"अहो महाराज ! सांगाल तर खरें एवढ्या पहांटेस कुठं निघाली स्वारी ती ?"

ब्राह्मण रागावून उभा राहिला पण कांहीं बोलला नाहीं. तेव्हां ती स्त्री पुन: म्हणाली, "महाराज ! ओळखलेंत कीं नाहीं आपण मला ?"

गाल फुगवून ब्राह्मण म्हणाला, "कोण ग तूं ?"

मंद हास्य करून रमणी उत्तरली, "विसरलांत वाटतें आपण मला इतक्यांत ?"

"पण तूं आहेस तरी कोण ? मीं तर तुला कधीं पाहिलेंहि नाहीं. तूं एक अपरिचित स्त्री भर राजमार्गावर उभी राहून माझ्यासारख्या पर-

पुरुषाशीं बोलत आहेस ! तुला लाज नाहीं कां वाटत ? तूं मला ओळख-
तेस काय ? " गंभीर भावानें शिवशंकरशर्मा म्हणाला.

" होय, मी तुम्हांला पुरे ओळखतें. जेव्हां त्या शिवमंदिरांत आपण पूजा करीत होता, तेव्हां ज्याच्याकडे पाहून पाहून माझे दोन्ही डोळे थकलें तेच तुम्ही शिवशंकरशर्मा, कीं दुसरें कोण ? आतां राजपुरोहित झालांत म्हणून डोळे फिरले वाटतें ? महाराजांचे पुरोहित होतांच पूर्वीच्या ओळखी-वर पाणी पडलें असेंच ना ? तरीच राजमार्गावर उभें राहून माझ्याशीं बोलण्यानें स्वतःचा दर्जा कमी होईल असें आपणाला वाटूं लागलेलें दिसतें. पण थांबा हं, पुरोहितजी ! गौडनगरांतील मोहल्या मोहल्यांतून फिरून मी आपण किती जाडे विद्वान् आहांत तें लोकांना कळविते. तुम्ही--"

" आणखी कांहीं कमीजास्त बोलशील तर तुला शपथ आहे माझी, मालती ! मी तुला ओळखलें नाहीं म्हणून हांक मारली नाहीं. माझी चूक-फार मोठीं चूक झालेली आहे, अजून झोंपेचा अंमल डोळ्यांवर असल्या-कारणानें खरेंच मी तुला ओळखले नाहीं. मालती ! इतक्यांतच तुला राग आला वाटतें ?" ब्राह्मण दीन मुद्रेनें म्हणाला.

" चला दूर व्हा ! मला ती तुमची खुशामत आतां नको." मालती मोठ्या फणकाऱ्यानें म्हणाली.

" अग मालती ! तुझे हात धरून–छे, छे, चुकलों–तुझे पाय धरून सांगतों कीं, असे मी पुनः कधीं–कधींहि–करणार नाहीं. जें व्हावयाचें होतें तें होऊन चुकलें. आतां तूं कृपा करून मला क्षमा कर."

त्याची ही उडालेलीं घाबरगुंडी पाहून मालतीला मनांतल्या मनांत अनिवार हंसूं कोसळलें. तरी वरकांति ती गंभीर मुद्रेनें म्हणाली, " महा–राज ! एवढ्या मोठ्या पहांटेस उठून लगबगीनें चालला आहांत कोठे ?"

ब्राह्मणानें मंद हास्य करून त्तर दिलें, " तूं नवीन बातमी ऐकलीं नाहींस ? गोकर्णास महाराजाधिराज धर्मपाळदेवांच्या श्वशुगृहीं श्रीफळ घेऊन मला जावयाचें आहे. मार्गांत गंगास्नानहि आयतेंच घडेल. या वेळीं महादेवीकडून पत्र घेण्यासाठीं मी राजमहालांत जात आहें. पहिल्या प्रह-रास सुरुवात होण्यापूर्वीं मला येथून निघालें पाहिजे. "

मालतीनें विचारलें, " पुन: कधीं येणार परत आपण ?"

" दहा दिवसांच्या आंत मी येईन परत-"

तीव्र कटाक्षपात करीत दासी म्हणाली, " मग या वेळीं आपण राजवाड्यांत जाणार तर ? "

" होय. "

" पण एकटे जाल ना ? "

" कां, कांहीं अडचण आहे कीं काय ?"

" वाटेत एक भयंकर स्थळ आहें हे माहीत ना ? "

" कोठें ? मला तर कांहीं ठाऊक नाहीं. "

" मग तें समजून घेण्याचीहि कांहीं गरज नाहीं. "

" छे, छे, छे, छे, मालती ! अग, तुला माझ्या गळाची शपथ आहे. काय तें सांग भयंकर स्थळाची गोष्ट तुझ्या तोंडुन ऐकतांच हें पहा मला कसें कांपरें भरलें आहे तें ! "

" पण यांत भय कसलें ? लोक म्हणतात कीं, चंडिकादेवीच्या मंदिरापाशीं जेथें चिंच, वड आणि पिंपळ आलेला आहे, तेथें एक ब्रह्म-राक्षस आहे."

त्या स्त्रीच्या तोंडचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच भयानें थर-थर कांपत शिवशंकरशर्म्यांनें तिचा जोरानें हात धरून म्हटलें, " मालती ! अग मालती ! "

" कां, काय आहे ? "

" तर मग मी एकटा नाहीं जाणार ! "

" मग मी काय करूं म्हणतां ? "

" तूं मला पोंचविण्यास ये."

" पण मला शिवालयांत गेलें पाहिजे तें ?"

" मागाहून जा ना ! "

" असें कसें करतां येईल मला, तुमच्या जागीं नवीन आलेला पुजारी स्वभावानें भारी कडक आहे."

इतक्यांत दुरून घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. तो ऐकतांच 'अरे बापरे ! ' असें म्हणून शिवशंकरशर्म्याने तेथून पलायन केलें. त्यानंतर एक घोडेस्वार भरधांव दौडत राजवाड्याच्या दिशेला निघून गेला. तो निघून गेल्यानंतर शिवशंकरशर्म्याच्या तोंडून निघालेली किंकाळी ऐकून मालती धांवत त्याच्याकडे गेली आणि पाहते तों स्वारीनें धुळीत सपशेल लोटांगण घातलेलें ! मालतीच्या पावलांचा आवाज ऐकून आपलें डोळे अर्धवट किलेकिले करून शिवशंकरशर्म्यानें तिच्याकडे पाहिले आणि पुन: डोळे मिटून धरून बेशुद्ध पडल्याचें ढोंग केलें. हा प्रकार मालतीच्या लक्षांत येऊन मंद हास्य करीत तिनें विचारलें, " महाराज काय झालें हो ? "

कांहीं वेळानंतर शिवशंकरशर्म्यानें उत्तर दिलें, " ब्रह्मराक्षस आला आहे. "

मालती म्हणाली, " तुम्ही तर एकच ब्रह्मराक्षस पाहिलात; पण दुसरेहि आणखी येत आहेत."

हें ऐकतांच कांहीं न बोलतां शिवशंकरशर्मा तेथून धूम पळत सुटला.

## २२

वृद्ध अमात्य उद्धवघोष गोकर्णदुर्गाच्या दरवाज्यासमोर पिंपळाच्या मोठाल्या वृक्षाखालीं बसला होता. दोघे वृद्ध सैनिक, दोघे जुने सेवक आणि कांहीं नागरिकहि तेथें बसलें होते. त्याच जाजमावर बसले होते. त्यांच्यांत या वेळीं कल्याणीदेवीच्या लग्नासंबंधींचीं वाटाघाट चालली होती. एक वयोवृद्ध नागरिक म्हणाला, " कुमारी आतां उपवर झाली आहे; तेव्हां या पुढें तिला अविवाहित ठेवणें योग्य होणार नाहीं."

तें ऐकून उद्धवघोष म्हणाला, " कुमारी वयांत आलेली आहे ही गोष्ट माझ्या पूर्ण लक्षांत आहे. माझा आतां अगदीं वृद्धापकाल आला असल्यानें महाराजाधिराज आतां लौकरच येऊन हें शुभकार्य उरकून घेतील तर बरें ! माझें पिकलें पान केव्हां गळून पडेल याचा नेम नाहीं.

या क्षणभंगुर देहाचा मुळींच भरंवसा नाहीं. माझ्या हयातींत कुमारीचा विवाह झालेला बरा !"

एक वृद्ध सेनानायक म्हणाला, "गौडाधिपति राजा धर्मपाळदेवाशीं कुमारीचा विवाह न करतां तिच्यासाठीं दुसरा एखादा वर पाहिल्यास बरें !"

हें ऐकतांच व्याकुळ चित्तानें उद्धवघोषानें विचारलें, "कां बरे ?"

"कां म्हणजे ? या शुभकार्यांत दोनतीनदां विघ्नें आल्याकारणानें या लग्नाचे फळ चांगलें मिळणार नाहीं अशी कुजबुज लोकांत सुरू झालेली आहे."

"नां-नाहीं. अशी कांहीं ती मोठीशीं विघ्नें नाहींत. पहिल्या खेपेस जेव्हां स्वर्गस्थ महाराज गोकर्णांतून गौडांत गेले, तेव्हां लग्नाचा योग जुळून न येतां फक्त वाङ्निश्चय उरकण्यांत आला. त्यानंतर स्वर्गस्थ महाराज गोपाळदेवांना सर्व सामंतांनीं मिळून सम्राट् ही पदवी अर्पण केली. आपल्या गोवर्धन मठाच्या विश्वेश्वरानंदस्वामींनीं या कृत्यांत प्रामुख्यानें भाग घेतला होता. सम्राट्पदारूढ झाल्यानंतर नवीन साम्राज्यांत शांतता स्थापन करण्यांत कांहीं वर्षें निघून गेली. या धामधुमींत लग्न अर्थातच लांबणीवर पडलें. आतां तुम्हींच सांगा केवळदास ! चोर दरोडेखोरांचा नीट बंदोबस्त केल्याशिवाय व अत्याचारी राजांचे पारिपत्य केल्याशिवाय देशांत शांतता कशी प्रस्थापित करतां आली असती ?"

गोकर्णवासी वृद्ध केवळदास अमात्यांच्या सन्मुख जाजमावर बसला होता. तो एक निश्वास सोडून म्हणाला, "प्रभु ! ती सर्व हकिगत मला माहीत आहे. ती मी केव्हांहि विसरणार नाहीं. त्या वेळीं दरोडेखोरांनीं जो धुमाकूळ माजविली होता, तींत माझे दोघे पुत्र व पांच पौत्र मारले गेले आहेत."

उद्धवघोष कांहींसा लज्जित होऊन म्हणाला, "तुमचे म्हणणें खरें आहे, केवळदास ! अराजकतेचा हा काळ सर्वांहून अधिक आपल्या हृदयांत डांचत राहणें स्वाभाविक आहे. त्यानंतर देशांत जेव्हां शांतता झाली, तेव्हां कल्याणीदेवीच्या लग्नाचें नक्की ठरलें. परंतु दुर्दैवानें लग्न होण्यापूर्वींच

महाराज गोपाळदेव स्वर्गवासी झाले. त्यामुळें लग्नाचा योग जुळून आला नाहीं. आतां महाराजांचें वर्षश्राद्धहि झालें आहे. तेव्हां मला वाटतें कीं, कल्याणीदेवीचें लग्न व्हावयास आतां विलंब लागणार नाहीं. हें पहा बहादुरसिंह ! गौडाहून एखादा दूत किंवा घोडेस्वार आज नक्की येथें आलाच पाहिजे."

वृद्ध सेनानायकानें प्रश्न केला, " याबाबत आगाऊ आपणाला कांहीं समाचार मिळालेला आहे काय ?"

" नाहीं, पण मला आपले वाटतें कीं, श्रीफळ घेऊन आज कोणीना-कोणी तरी तिकडून येईल. "

" प्रभू ! महाराजाधिराजांनीं इतक्या दिवसांत कांहींच कसें कळविलें नाहीं ?"

" केवळदास ! नवीन महाराजाधिराज गोकर्णदुर्गाची हालहवाल वावंवार घेतच असतात. गौडांतून पुष्कळदा समाचार घेऊन त्यांचा दूत येत जात असतो. महादेवीसुद्धां दुर्गस्वामिनीकडे दासीद्वारें समाचार पाठ-वीत असते."

" लग्नाबाबतच कीं काय ?"

" नाहीं बहादुरसिंह ! लग्नाबाबत त्यांनीं अद्याप कसलाच संदेश आणलेला नाहीं. "

" मग दूत येतात तरी कोणता समाचार घेऊन ?"

" तुम्हांला यांत कांहीं कळावयाचें नाहीं, कधींकाळीं तें कांहीं भेट घेऊन येतात, तर केव्हां महादेवीचें पत्र घेऊन येतात. तीर्थयात्रेसाठीं म्हणूनहि ते मधून मधून या बाजूला येत असतात. "

" कोणाच्या नांवाची पत्रें ते घेऊन येत असतात ?"

" दुर्गस्वामीनीच्या नांवची !"

" महाराजाधिराज धर्मपाळदेव स्वतः कधीं दुर्गस्वामिनीला पत्रें पाठवीत असतात काय ? "

" होय पुष्कळदां. राढदेशांत तीर्थयात्रेच्या निमित्तानें मागें जे आले होतें, तेंहि महाराजांचीं पत्रें घेऊनच ! केव्हां केव्हां युवराजांच्या पत्रांत

चंदन, कुंकुम इत्यादि सुगंधी द्रव्यें असून तीं पत्रें खाजगी स्वरूपाचीं असतात."

"प्रभु ! हें मला आज प्रथम आपल्याच तोंडून कळत आहे. राजे महाराजांचीं पत्रें गुप्त रीतीनें किमती वस्त्रांतून जात येत असतात; परंतु ताडपत्रावर कधीं लिहिलेलीं असतात काय ?"

"केवळदास ! तें सर्व समजून घेण्याची तुम्हांला कांहींएक आवश्यकता नाहीं."

इतक्यांत एक क्षीणकाय सैनिक हातांत एक लांब भाला घेऊन त्या जागीं आला.

उद्धवघोषांना अभिवादन करून तो म्हणाला, "प्रभु ! गौडाहून एक नौका आली आहे. तींत एक लठ्ठ ब्राह्मण बसला आहे; तो कांहीं त्या नौकेंतून खालीं उतरतच नाहीं."

विस्मयचकित होऊन उद्धवघोषानें विचारले, "केशव ! कां बरें तो खालीं उतरत नाहीं ?"

"प्रभु ! वर्षाऋतु संपल्याकारणानें नदीच्या पुढील भागांत जल सुकून अगदीं चिखलच चिखल झाला आहे. त्या चिखलांत कांहीं केल्या उतरण्यास ब्राम्हण कबूल नाहीं. प्रभु ! ब्राम्हण एखाद्या हत्तीसारखा लठ्ठ असल्यामुळें जर का तो एकदां चिखलांत रुतला, तर त्याला वर काढणें महामुष्किलीचें होईल."

"तो ब्राम्हण कोण आहे केशव ?" उद्धवघोषानें पुनः प्रश्न विचारला.

"ते कांहीं मी त्याला विचारलें नाहीं, प्रभु ! पण त्याच्या रागरंगावरून तो कोणी मोठा असावा." केशवनें उत्तर दिलें.

"तो दिसण्यांत एरव्ही कसा काय आहे ?"

"प्रभु ! दोन बैलांच्या गाडींतहि त्याचा देह मावण्यासारखा नाहीं. त्याचें वजनहि इतकें भारी असेल कीं, दोन बैलांनाही ते अवजड धूड खेचणें मुष्कीलीचे होईल."

" चल केशव ! राजधानींतून कोण आलेलें आहे तें तरी पाहूं या. महादेवींनें महाराजांच्या लग्नाचा दिवस नक्की करून ते कळविण्यासाठीं त्याला इकडे पाठविलेले असावें."

बसलेल्या जागेचा त्याग करून सर्वजण नदीकांठीं आले. तेथें येतांच शिवशंकरशर्मा होडींतूनच चोहींकडच्या चिखलाचें सूक्ष्मपणें निरीक्षण करीत आहे, असे त्यांच्या नजरेस पडलें. उद्धवघोषानें किनाऱ्यावरूनच विचारलें--

" आपण कोण ?"

" मी शिवशंकरशर्मा " प्रत्युत्तर मिळालें.

" आलांत कोठून ? "

" गौडनगराहून."

" राढदेशांत येण्याचा आपला उद्देश कोणता ? "

" उद्देश फार मोठा आहे. तो सांगण्यासाठीं पुष्कळसा वेळ हवा ! किनाऱ्यावर उतरल्यानंतर सर्व हकीकत सांगेन. पण किनाऱ्यावर मी कसा उतरूं तें आधीं सांगा."

शिवशंकरशर्म्याचा उडालेला गोंधळ पाहून बहादुरसिंहास अनिवार हंसूं लोटलें. तरी तें मनांतल्यामनांत दाबून तो हळूच उद्धवघोषास म्हणाला " प्रभु ! हें अवजड धूड किनाऱ्यावर कसें उचलून आणतां येणार ? जर का ही स्वारी एकदां चिखलांत रुतली, तर वर निघणें मुष्कील ! म्हणून नौकेंतच त्यांना पडायला सांगून नौकेलाच दोऱ्यांनीं बांधून ती किनाऱ्यास खेंचावयास सांगा."

त्याचें हें बोलणें ऐकून उद्धवघोषहि हंसूं लागला.

आपल्या प्रश्नाचें कोणीहि उत्तर देत नाहीं असें जेव्हां शिवशंकर-शर्म्यानें नौकेंतून पाहिलें, तेव्हां त्यानें पुन: विचारलें, " अहो ! मला उतरून घेण्याविषयीं आतां काय तजवीज करतां ?"

उद्धवघोषानें म्हटलें, " आपण कोण तें तर तुम्हीं अजून सांगितलें नाही."

" तें सांगतों कीं आतां ! माझें नांव शिवशंकरशर्मा."

" नांव तर आपण पूर्वींच सांगितले आहे. त्याशिवाय आणखी कांहीं विशेष सांगाल कीं नाहीं ? "

" मी महाराजाधिराज गौडाधिपति धर्मपाळदेवाचा पुरोहित."

" मग अजूनपर्यंत तसें कां सांगितलें नाहीं ?"

" परंतु गोकर्णांत येण्याचें कारण तूर्त मी सांगत नाहीं."

उद्धवघोषाला वाटलें कीं महादेवीनें लग्नाचा दिवस नक्की करून कळविण्यासाठीं राजपुरोहिताला गोकर्णास पाठविलें असावें. तेव्हां अधीर होऊन तो बहादुरसिंहास म्हणाला, " अहो बहादुरसिंह ! हे राजपुरोहित आहेत बरें ! कल्याणीदेवीच्या लग्नाचा दिवस नक्की ठरलेला दिसतो; आणि तो समाचार घेऊन हे आलेले आहेत. म्हणून त्यांची थट्टामस्करी करणें योग्य नव्हे. तेव्हां भलतेंसलतें कांहीं बोलत जाऊं नका. अरे केशव ! दुर्गाजवळच एक मोठें आंब्याचें झाड पावसाळ्यांत उलथून पडलें आहे. त्या ठिकाणीं ही नौका नेऊन बांधण्याची व्यवस्था करा. तेथून पुरोहितमहाराजांना सहज उतरतां येईल."

नावाड्यांनीं नौका वल्हवून त्या जागीं आणली. थोड्याच वेळांत बहादुरसिंह आणि केशव यांच्याबरोबर शिवशंकरशर्म्याची स्वारी चिखलांत पाय न ठेवतां गोकर्णदुर्गाच्या द्वारापाशीं येऊन पोहोंचली. तेथें येतांच उद्धवघोष व इतर अधिकाऱ्यांनीं त्यांचें यथोचित स्वागत केलें. गौडच्या राजपुरोहितासाठीं दु र्गांतील एक प्रशस्त खोली लगेच रिकामी करून देण्यांत आली. नंतर शिवशंकरशर्मा उद्धवघोषास म्हणाला,---

" मी फार महत्त्वाचा समाचार आणला आहे. पुनः युद्धास लौकरच तोंड लागणार आहे. महाराजाधिराज गौडाधिपतींनीं सर्वस्वास मुकलेल्या कान्यकुब्जदेशाच्या युवराजास अभयदान दिलेले असून, त्यास त्याचें राज्य परत मिळवून देण्यासाठीं तें जारीनें युद्धाची तयारी करीत आहेत. गौडेश्वरांनीं सर्व सामंतांना बोलावून आणण्यासाठीं देशोदेशीं दूत रवाना केलेलें आहेत. कान्यकुब्जाधीश इंद्रायुधानें तर इतक्यांत मंडलादुर्गावर आक्रमणहि केले आहे."

शुष्ककंठानें उद्धवघोषानें विचारले. " तर मग लग्न केव्हां करणार ?"

ह्या प्रभुभक्तिपरायण वृद्धाला वाटले होते कीं, ३ र ३ ले द हे र

संपलें. या खेपेला कल्याणीदेवीचें लग्न जरूर होणार ! शिवशंकरशर्मा पुढें बोलूं लागला,--

" महादेवी लग्नाचा दिवस नक्की करून तो शुभसमाचार इकडे माझ्याबरोबर कळविण्यास अगदीं तयार झाल्या होत्या-परंतु ज्या दिवशीं मी तेथून निघालों, त्याच दिवशीं एका घोडेस्वारानें अशी बातमी आणली कीं, मंडलदुर्गास शत्रूंनीं वेढा दिलेला आहे. ही बातमी कळतांच तूर्त लग्न तहकूब ठेवण्यांत आलें आहे. हें इकडे कळविण्यासाठीं मुख्य प्रधान गर्गदेवांनीं मला मुद्दाम पाठविलें. असा चिंताजनक समाचार घेऊन इकडें यावयाचे माझ्या मनांत नव्हते. पण काय करावें ? असा हा खेदयुक्त समाचार घेऊन येण्याची आज दुर्दैवाने मजवर पाळी यावी ना ?"

बिचारा उद्धवघोष हा समाचार ऐकतांच एक दीर्घ सुस्कारा टाकून मटकन् खालींच बसला. लौकरच ही गोष्ट दुर्गस्वामिनीच्याहि कानांवर गेली. कल्याणीदेवीलासुद्धां ही गोष्ट समजली.

● ●

## २३

हिंवाळयाच्या दिवसांत सूर्योदय होण्यापूर्वी पांच इसम पाटलीपुत्राच्या खिंडारांतून पश्चिम दिशेकडे चालले होते. भरतखंडाची हीं जुनी राजधानी आज जनशून्य, वैराण आणि उजाड झालेली दिसत होती. जागोजागीं लहानमोठ्या झुडुपांचीं अगदीं गर्द दाटी झाली होती; आणि त्यांत व्याघ्र, वृक, शृगाल इत्यादि श्वापदांची वस्ती झाली होती. चारी बाजूंचीं जमीन गवतानें अगदीं झांकून गेली होती. दगडांनीं बांधलेला राजमार्ग हिरव्याचार शेतांमधून निघालेला होता. त्या मार्गाच्या दोन्ही बाजूंलाहि गर्द झाडी आली होती. या झाडीच्या आंतील भागांत ठिकठिकाणीं विटांनीं बांधलेल्या भिंती, स्तंभ आणि भग्न देवालयांचें अवशेष दिसून येत होते. मधून मधून शेवाळांनीं भरलेले लहान लहान ओढे आणि जलप्रवाहामुळें कलकल निनाद करणाऱ्या लहानशा नद्याहि आढळून येत होत्या. एकेकाळीं मगधदेशाची–उत्तरपथाची राजधानी जी पाटलीपुत्र नगरी, तिची आज

अशी दशा झालेली होती ! महाराजाधिराज बिंबिसार, अजातशत्रु, चंद्र-गुप्त, बिंदुसार, अशोक, पुष्पमित्र, अग्निमित्र आणि समुद्रगुप्त वगैरे नृपा-लांनीं कोटयवधि सुवर्णमोहरा खर्चून पाटलीपुत्र नगराची शोभा वृद्धिंगत केली होती. परंतु आमच्या कथानकाच्या काळीं या नगराची अशी शोचनीय स्थिति झाली होती; आणि हें नगर व्याघ्र, वृक, आणि शृगाल इत्यादि पशूंचें निवासस्थल बनून गेलें होतें. अरेरे ! कालाची कुटिल गति म्हणतात ती हीच !

वर सांगितलेल्या पांच जणांपैकीं एकजण म्हणाला, " आतां चला, आपण गंगेच्या किनाऱ्यानें सरळ जाऊं या."

दुसरा म्हणाला, " पण गाडया तिकडें कशा येऊन पोहोंचतील ?"

" कां बरें ? आपणांपैकीं कोणी तरी एक येथें राहील."

परंतु अशा भयंकर स्थळीं एकटें रहावयास कोणीहि कबूल होईना. तेव्हां दोघांना तेथें ठेवून बाकी तिघे जण गंगेच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें पुढें जावयास निघाले. पहिला म्हणाला, " गंगेच्या किनाऱ्याजवळील रस्ता तो हाच असें आपणांला कसें ओळखतां येणार ?"

" कां बरें ? या अरण्यांतून निघालेल्या या वाटेनें आपण सरळ गेलों, कीं गंगेच्या कांठीं पोहोंचूं."

" कशावरून असें म्हणतोस हें तूं ?"

" कशावरून म्हणजे ? आपण ज्या मार्गानें आतां जात आहोंत तो वाराणशी आणि प्रतिष्ठानचा रस्ता आहे. आपण पूर्वेकडून पश्चिमेकडे चाललों आहोंत, आणि गंगा उत्तर दिशेस आहे. म्हणून याच रस्त्यानें आपण गेल्यास कांठी पोहोंचूं. पण बाबारे, या निबिड वनांत जर कां आपण रस्ता चुकलों तर, तुझें कसेंरे होणार ? "

" या जंगलांत निदान दिवसा तरी नक्की दिशा कोणती तें सांगतां येईल. परंतु या नगराच्या चोंहीकडे पुष्कळ वाटा असल्यामुळें कोणत्या वाटेनें जावयाचें तेंच कळेनासे होते. पहा, हें चारी बाजूंना शेंकडों राज-मार्ग दिसतात कीं नाहींत ते ! ज्या स्थळीं झाडें वाढलेलीं नाहींत तेथें हें राज-मार्ग आलेलें आहेत, राजमार्ग पक्क्या दगडांनी बांधलेलें असल्यामुळें तेथें

मात्र अद्याप झाडें उगवलेलीं नाहींत. या राजमार्गाच्या दोन्ही बाजूंला मोठाल्या घरांचे अवशेष अद्याप शिल्लक असल्यामुळें आपण वाट चुकलों तर त्यांत कांहीं नवल नाहीं."

तिघेहि जण उत्तर दिशेनें गंगेच्या रोखानें जाऊं लागले. कांही वेळानंतर पाटलीपुत्र नगराचें खिंडार पसार करून ते गंगाकांठच्या वालुकामय प्रदेशांत येऊन पोहोंचले. त्या स्थळीं एका प्राचीन घाटाजवळ शेंकडों घोडेस्वारांनीं तळ दिलेला होता, त्यांनीं या तिघाजणांना पाहून सहर्ष त्यांचें स्वागत केलें. नुकत्याच आलेल्या तिघांपैकीं एकास एका घोडेस्वारानें विचारलें,

"आपण जाणार कोठें ?"

"कोण, जगपाळ कीं काय ?" त्या घोडेस्वारास ओळखून ज्याला प्रश्न विचारण्यांत आला होता तो इसम म्हणाला.

"होय, पण तुम्ही कोण ?"

"कां, ओळखलेंत नाहीं मला तुम्ही ? मी मदनपाळ."

बोलत बोलत तिघेहि अगदीं छावणीजवळ आले. तेव्हां मदनपाळानें विचारले, "जगपाळ ! रस्त्यांत तुम्हांला कोठें शत्रूसैन्य आढळलें काय ?"

जगपाळानें उत्तर दिले, "उदंडपुरचा किल्ला सोडून येथें येईपर्यंत एकहि सशस्त्र सैनिक आमच्या दृष्टीस पडला नाहीं, मग शत्रूचें नांव कशाला ?

"कनोजी मोठें लढवय्ये असतात असें म्हणतात तें खोटें तर मग एकूण ?"

"प्रथमतः साहस करून त्यांनीं मंडलादुर्गावर आक्रमण तर केलें, परन्तु वचनपाळाचें सैन्य तेथें जाऊन पोहोंचताच कनोजी सैन्य वेढा उठवून कोठें पळून गेलें कोण जाणें. मला वाटतें तें परत स्वदेशीं निघून गेलें असावें; कारण त्यानंतर त्यांचा थांगच लागत नाहीं."

"बरें, पण वचनपाळ सध्यां कोठें आहेत ?"

"ते शोणनदीच्या संगमावर तळ देऊन महाराजाधिराजांची वाट पहात आहेत. त्यांच्याजवळ सध्यां पांच हजार सैनिक आहेत आणि युद्धासाठीं तें सारे अगदीं अधीर झालेले आहेत. ते म्हणतात कीं, अवघ्या पांच

हजार सैनिकांनिशीं महाराजाधिराज गोपाळदेवांनीं मरुनिवासी गुर्जरराजास वरेंद्रभूमींतून हांकून लाविले होते—मग आम्ही पांच हजार सैनिक वाराणशी आणि चरणाद्रि काबीज करूं शकणार नाहीं काय ? परंतु सेनापतींच्या आज्ञेशिवाय शोणनदी उतरून ते पलीकडे कसे जातील ?"

" महाराजाधिराजांची सेना एक दोन दिवसांत शोणनदीच्या संगमावर येऊन पोहोंचेल. " आगंतुक तिघांपैकीं एक म्हणाला.

" महाराजांबरोबर आणखी कोणकोण सामंत आणि सरदार आलेले आहेत ?"

" गौडनगरांतील सर्व सैन्य त्यांच्याबरोबर आहे. महाकुमार वाक्पाळदेव व महाअमात्य गर्गदेव यांना राजधानीच्या संरक्षणार्थ मागें ठेवण्यांत आलेले आहे. उद्धारणपूरचें राजे कमलसिंह, दंडभुक्तिचें रणसिंह ढेकराधिपति प्रमथसिंह, देवग्रामचे वीरदेव आणि पद्मवंषाचे राजे जयवर्धन हें सारें गौडनगराहून महाराजाधिराजांबरोबर निघाले आहेत. उदंडपूरचें वृद्ध राजे भीष्मदेवही महाराजांबरोबर आलेलें आहेत. या वेळीं युद्ध ' न भूतो न भविष्यति ' असें होणारसें दिसते. "

" मदनपाळ ! तुम्हांला वेड तर नाहींना लागले ? अहो, शत्रूचाच जर ठिकाणा नाहीं तर युद्ध होणार कसें ? तीरभुक्तीच्या सामंतांनीं वचनपाळाची भेट घेऊन महाराजाधिराजांची आधीनता आनंदानें स्वीकारलेली आहे. महाराजांचे खास पथक इकडे केव्हांसे येईल ? "

" फार करून दोनप्रहरीं भोजनाच्या वेळेला ते इकडे येऊन पोहोचेल असा अंदाज आहे. "

दिवसाचा प्रथम प्रहर उलटल्यावर तंबूंच्या सामानसुमानासह गाड्या घाटावर येऊन पोहोंचल्या. अल्प वेळांतच गंगेच्या कांठीं वड आणि पिंपळाच्या झाडांखालीं शेंकडों तंबू उभारण्यांत आले.

मदनपाळ आणि त्याचे सोबती जेवण करण्यांत गुंतले. तिसऱ्या प्रहरीं पांच हजार घोडेस्वारांसह महाराजाधिराज धर्मपाळदेव गौड साम्राज्यांतील सामंतासह त्या जागीं येऊन पोहोंचले. स्नानविधि व जेवणखाण आटोपल्यावर ते लगेच वचनपाळांच्या शिबिराकडे निघाले. शेंकडों अंगरक्षक सैनिक त्यांच्याबरोबर होतें. बाकी सर्व सैन्य विश्रांति घेत छावणींतच राहिले.

• •

## २४

दुसऱ्या दिवशीं प्रभातकाळीं गौडीय सामंत एकामागून एक येऊन धर्मपाळदेवांच्या सन्मुख उभे राहिले. तेथें खुद्द सेनापती वचनपाळ नग्न तरवारीनिशीं महाराजांच्या तंबूच्या दरवाज्यांतच झोंपलेलाआहे असें त्यांच्या दृष्टीस पडले. त्यांच्या पायांजवळच धर्मपाळदेवांचा एकनिष्ठ हुजऱ्या गुणाधर झोंपलेला होता. हें पाहून वृद्ध भीष्मदेव हिरवेंचार गवत वाढलेल्या ओलसर जमिनीवरच बसला, इतर बरोबरीच्या सामंतांनींहि त्याचेंच अनुकरण केलें. कमळसिंह म्हणाला. " अद्याप महाराज झोंपेंतून जागृत झालेलें दिसत नाहींत."

" हो, महाराज जागें झाले असते तर नागव्या तरवारीनिशीं वचनपाळ अद्यापि येथे झोंपला नसता."

भीष्मदेव म्हणाला, " हें पहा कमळसिंह ! आता विलंब लावणें उचित नाहीं. शत्रुसैन्याचा ज्या अर्थी कोठें पत्ता लागत नाहीं, त्या अर्थी होईल तितक्या त्वरेनें वाराणशीवर आक्रमण करणें योग्य होईल."

उद्धवघोषानें मध्येंच विचारलें, " प्रभु ! आगाऊ कळविल्याशिवाय कान्यकुब्ज देशावर चढाई करणें न्याय होईल काय ? "

" हें पहा उद्धव ! कान्यकुब्ज देशाच्या राजानें ज्या अर्थी आगाऊ कळविल्याशिवाय मंडलदुर्गावर आक्रमण केले, त्या अर्थी आपणहि न कळवितां त्याच्या राज्यावर स्वारी केल्यास तें अन्यायाचें कृत्य ठरणार नाहीं. ज्याअर्थी युद्धाला आतां त्याच्याकडूनच सुरुवात झालेली आहे. त्याअर्थी त्याच्या राज्यावर स्वारी करण्यांत कोणताहि दोष नाही. फार करून कान्यकुब्जचे सैन्य करुषदेशांत अगर वाराणशींत आपली वाट पहात राहिलें असावें. इंद्रायुधाकडून आणखी कुमक येतांच पुनः युद्धाला तोंड लागेल असा रंग दिसतो."

कमलसिंह म्हणाला, " प्रभु ! आपले म्हणणें सत्य आहे. उद्धवघोष! आपणांला आतांच शोणनदी उतरून करुषदेशांत प्रवेश केला पाहिजे. "

जयवर्धन म्हणाला, " भीष्मदेव ! बराच उशीर होत आला; तथापि अद्याप महाराज जागृत झालेले नाहींत. ते उठल्यावर बाहेर येऊन सर्व सैन्यास कूच करण्याचा हुकूम फर्माविपर्यंत पहिला प्रहर होईल. म्हणून आपण एव्हांच घोडेस्वारांच्या पथकांना पुढें घालून दिल्यास बरें होईल. पाटलीपुत्र येथें ठेवण्यांत आलेलें आपलें पांच सहस्त्र सैन्यही आज येथें येऊन पोहोंचेल. ते सैन्य शोणनदीच्या संगमाचें रक्षण करील. ढेकरीयराज! याबाबद आपलें मत कसें काय आहे ? "

ढेकरीयराज प्रमथसिंहानें उत्तर दिलें, " हें पहा भीष्मदेव ! आम्ही राढदेशचें लोक. युद्ध करणें एवढेंच आम्हांला माहीत ! राजनीतीचा आम्हांला गंधही नाहीं. वरेंद्रराज राजनीतींत आणि बुद्धिबलांत आमच्या-हून सर्वतोपरी वरचड आहेत. या साधारण बाबतींतहि आमचें डोकें चालत नाहीं."

भीष्मदेवानें सांगितलें, " बदुवम्बाराजांचें म्हणणें सत्य आहे. स्वर्गस्थ गोपाळदेवांनाहि कांहीं अज्ञ लोक असें मानीत असत; पण त्यांच्यासारखा धैर्यवान, विचारी आणि दूरदर्शी पुरुष वरेंद्रभूमींत सांपडणें विरळा ! भूत, भविष्य आणि वर्तमान स्थितीचा पूर्ण विचार केल्याशिवाय तें केव्हांहि पुढें पाऊल टाकीत नसत. तुम्ही आतां वचनपाळांना जागें करा; आणि कमळसिंह ! तुम्हीं दंडधरांना येथें बोलावून आणवा पाहूं ! "

प्रमथसिंहानें उठवितांच वचनपाळ डोळे चोळीत झोंपेंतून जागा झाला; आणि तंबूसमोर सर्व सामंतगणास जमिनीवर बसलेले पाहून फार लज्जित होऊन उठून उभा राहिला. इतक्यांत कमळसिंहाच्या बोलावण्या-वरून कित्येक दंडधर त्या ठिकाणीं येऊन पोहोंचले. राजसामंतांनीं नंतर आपापल्या फौजेस कूच करण्याची आज्ञा फर्माविली. तेव्हां वचनपाळानें विस्मयचकित होऊन भीष्मदेवांस प्रश्न केला, प्रभु ! काय हकिगत आहे? "

मंद हास्य करून भीष्मदेवानें उत्तर दिलें, " आम्हीं आतांचे आतां शोणनदी उतरून जाण्याचें ठरविलेलें आहे. तुम्हीहि तुमच्या सैन्यास कूच करण्याचा हुकूम फर्मावा. महाराज झोंपेंतून जागृत होतांच तत्काल सर्व सैन्यास कूच करण्याचा हुकूम जाहीर करण्यांत येईल. "

वचनपाळ अधिकच आश्चर्यानें वृद्धाच्या तोंडाकडे टकमका पाहूं लागला. तें पाहून प्रमथसिंह म्हणाला--

" वचनपाळ! आम्ही सूर्योदयापूर्वीच या ठिकाणीं येऊन बसलों आहोंत आणि आतांच कूच करावें असे सर्वानुमतें ठरलेले आहे. महाराजांना-सुद्धां आमचा हा विचार पसंत पडेल अशी आशा आहे. "

तें ऐकून वचनपाळानेंसुद्धां एका घोडेस्वाराला पाठवून आपल्या सैन्यास तयार राहण्यास हुकूम केला. इतक्यांत गुणधरानें सर्व सामंतास बसण्यासाठीं आसनें आणून दिलीं. तीं पाहतांच प्रमथसिंह म्हणाला,--

" आतां यांचीं कांहीं जरूरी नाहीं. योध्यांना तृणासनेंच सुखदायी असतात. "

युद्धासाठीं प्रयाण करण्याचा हुकुम ऐकतांच सर्व सेनेनें हर्षभरित होऊन प्रचंड जयघोष केला. तो ऐकून धर्मपाळदेव झोपेंतून जागे झाले. लगेच ते उठून तंबूबाहेर आले त्यांना पाहतांच सर्व सामंतगण उठून उभे राहिले. त्याच वेळीं वृद्ध उद्धवघोष कुणालासा प्रणाम करीत आहे असे प्रमथसिंहाच्या दृष्टीस पडले. तेव्हां त्यानें मागे वळून पाहिलें तों संन्याशी विश्वेश्वरानंद, युवराज चक्रायुध आणि एक क्षीण देहधारी वृद्ध असे तिघे-जण उभे!

मस्तकाचे मुंडण केलेल्या त्या वृद्धाचा देह अगदीं क्षीण होता आणि तोंड लांबट होते. विश्वेश्वरानंदांना पाहतांच महाराज धर्मपाळदेव व इतर सामंत यांनीं त्यांना भक्तिपुरस्सर प्रणाम केला आणि चक्रायुधाला अभि-वादन केलें. स्वामींना उद्देशन महाराज धर्मपाळदेव म्हणाले--

" प्रभु! केव्हां आलांत? आम्ही गेल्या रात्रीं मध्यरात्रींपर्यंत जागत आपली वाट पहात होतों, परंतु आपल्या आगमनाचीं बातमी कांहीं आम्हांला नव्हती. "

स्वामींनीं उत्तर दिले, " महाराज! आम्ही हें नुकतेंच येत आहोंत. आमच्याबरोबर एक नवीन माणूस आहे. "

" कोण तो?"

" ओळखा पाहूं आपण. "

स्वामी एकीकडे झाले. तेव्हां गौडांत मणिदत्ताच्या घरीं ज्या वृद्ध मिक्षूनें आपणांकडून त्रिरत्नांची शपथ घेवविली, तो वृद्ध भिक्षु समोर उभा आहे असें महाराजांच्या दृष्टीस पडलें. महास्थविर बुद्धभद्रानें मंद हास्य करून म्हटलें, " महाराज ! मगधदेशांतील राजसभेंत शेंकडों वर्षानंतर आज एक भिक्षु स्वेच्छापूर्वक आलेला आहे."

सस्मित मुखानें महाराज म्हणाले, " यावें महास्थविर ! "

या वेळीं संधी साधून उदंडपुरचा वृद्ध राजा म्हणाला, " आम्ही केव्हांपासून आपली वाट पहात या ठिकाणीं बसलों आहोंत."

" तात ! अपराधाची क्षमा करा." महाराज विनयानें म्हणालें.

" आतांच शोणनदी उतरून जाण्याची सेनेला आज्ञा झाल्यास बरें! " वृद्ध भीष्मदेव म्हणाला.

" ठीक आहे. पण नीट व्यवस्थितपणें कुच करावयास सांगा. ढेकरी-यराज ! आपण युद्धकलानिपुण आहांत; म्हणून मी आपणांला विचारतों कीं, कूच करण्यापूर्वींच सेनेच्या पिछाडीच्या रक्षणाची काय तजवीज केली आहे ? "

जयवर्धन म्हणाला, " महाराज ! वयोवृद्ध आणि महाबुद्धिमान भीष्मदेवांचे म्हणणें अगोदर काय तें ऐकून घेऊन मग काय तो हुकूम फर्मावा."

भीष्मदेव म्हणाला, " महाराज ! कान्यकुब्जाच्या सैन्यानें मंडला-दुर्गावर आक्रमण केलें होतें; पण पुढें तें सैन्य वेढा उठवून कोठें चालतें झालें त्याचा सुगावा कांहीं लागला नाहीं. मंडलादुर्गाशिवाय मुदगिरीस अथवा हिरण्य पर्वतांत रोहिताश्वदुर्गांत अगर शोणनदीच्या संगमावर कोठेंही तें सैन्य आमच्याशी सामन्यास उभें राहीलसें संभवनीय दिसत नाहीं. आज सतत पंधरवडाभर वचनपाळ शोणनदीच्या संगमावर शत्रु-सैन्याच्या हल्ल्याची वाट पहात आहे. पण इतक्या दिवसांत शत्रूचें चिट-पांखरूंही या बाजूला फिरकलेलें दिसत नाहीं. कान्यकुब्ज देशचे सैन्य कांहीं मोठेंसें नाहीं; त्यामुळें तें कुमक येण्याची वाट पहात असावें. या प्रसंगाचा आपण वेळींच उपयोग करून घेतला पाहिजे आणि लगेच चढाईचें धोरण

अंमलांत आणलें पाहिजे. ही नामी संधी जर आपण आज फुकट घालविली, तर पुढें कुमक येऊन पोहोंचल्यावर शत्रूला पराभूत करणें जड जाईल."

धर्मपाळदेव म्हणाले, " पण तात ! आपण शत्रुराज्यांत प्रवेश कसा करणार ?"

" महाराज ! शत्रुराज्य आहे तरी कोठें ? करुष देशानें केव्हांही कान्यकुब्जाच्या राजाची आधीनता स्वीकारलेली नाहीं."

जयवर्धन म्हणाला, " महाराजांपाशीं पांच हजार सैन्य आहेत. शोण नदीच्या संगमावर वचनपाळाचे पांचहजार घोडेस्वार आहेत. मिळून दहा हजार. शिवाय अंगरक्षक घोडेस्वारांची सेना दोन हजार. बारा हजारांची ही फौज वाराणशी काबीज करूं शकणार नाहीं काय ? "

वचनपाळ म्हणाला, " होय, निःसंशय काबीज करील. बारा हजार तर राहो. पण महाराज जर मला आज्ञा देतील, तर माझ्या पांच हजार फौजेनिशींच मी वाराणशीं जिंकून कान्यकुब्जावर हल्ला चढवीन.

प्रमथसिंह म्हणाला, "आपलें पायदळ सैन्य अद्याप कितीसें दूर आहे ? "

विश्वेश्वरानंदांनीं उत्तर दिलें, " मध्यंतरी जर कोठें खोळंबा झाला नाहीं तर, तीनचार दिवसांत तें येथें येऊन पोहोंचेल."

भीष्मदेव म्हणाला, " तें सैन्य येऊन पोहोंचल्यावर चरणाद्रि अथवा वाराणशीला वेढा घातला पाहिजे. परंतु तूर्त शोणनदीच्या संगमापासून चरणाद्रिपर्यंतचा प्रदेश घोडेस्वारांच्या बळावरच काबीज करावा लागेल."

कमळसिंह म्हणाला, " महाराज ! कूच करण्याची सर्व तयारी झालेली आहे. तरी आतां आपली आज्ञा व्हावी."

" पण शोणनदीच्या संगमाचें रक्षण कोण करील ?"

वचनपाळ मध्येंच म्हणाला, " महाराज ! मी शोणनदीच्या संगमावर माशा मारीत स्वस्थ पडून रहाणार नाहीं. तशी जर आपण मला आज्ञा कराल, तर मी गळ्याला फांस लावून घेऊन प्राणत्याग करील. "

" तर मग कोण राहील ? भीष्मदेव ! तुम्ही रहाल काय ?" धर्मपाळदेवांनीं प्रश्न केला.

" महाराज ! असें कदापिही होणार नाहीं. वृद्ध भीष्मदेवाचें सारें आयुष्य अश्वारोही सेनेचे आधिपत्य स्वीकारून शत्रूंशीं झुंजण्यांतच व्यतित झालें आहे. दुर्गांचें अगर तीर्थांचें रक्षण करणें हें त्याचें काम नव्हे महाराज ! या युद्धांत शोण नदीच्या संगमावरच पडून रहावयास कोणीहि तयार नाहीं. वाराणशी, चरणाद्रि, प्रतिष्ठान व कान्यकुब्जाच्या युद्धांत अवश्य विजय मिळवूंच मिळवूं, अशी सर्व सामंतगणांनीं दृढ प्रतिज्ञा केलेली आहे."

" आपलें म्हणणें खरें आहे; पण पिछाडीचे कोणीना कोणीं रक्षण करणें फार जरूरीचें आहे."

उद्धवघोष म्हणाला, " महाराज ! युद्ध करावयास सर्व सामंत एका पायावर उत्सुक झालेले आहेत तेव्हां त्यांना बरोबर घेऊन आपण कूच करावें. मी पृष्ठभागाच्या रक्षणार्थ शोण नदीच्या संगमावर राहीन, परंतु पायदळ सेना येऊन पोहोंचल्यावर मीही तीच्या बरोबर यावयास निघेन, अशी महाराजांच्या चरणांपाशीं माझी नम्र विनंति आहे."

भीष्मदेव म्हणाला, " उद्धव ! त्यानंतर मग येथें रहावयाचें कांहींच प्रयोजन नाहीं."

धर्मपाळदेव म्हणाले, " होय, त्यानंतर आपण खुशाल पायदळ सेने-बरोबर या."

भीष्मदेव म्हणाला, " महाराज ! आतां आपण सैन्याला कूच कर-ण्याचा हुकूम फर्मावा."

" जरा थांबा," महाराज म्हणाले, " उद्धवघोषांबरोबर येथें किती सैन्य ठेवावें म्हणतां ? "

" दोन हजार सैन्य असलें म्हणजे पुरे !" भीष्मदेवानें सुचविलें.

" मग बाकीच्या पांच हजार सेनेनें शोणनदी आतांच उतरावी काय ?" कमळसिहानें विचारलें.

धर्मपाळदेवांनीं उत्तर दिलें, " होय."

भीष्मदेव म्हणाला, " पाटलीपुत्रांतील पांच हजार सैन्य आज संध्या काळच्या सुमारास येथें येऊन पोहोंचल. उद्धव ! तें येतांक्षणींच नदीपार करण्यासाठीं आपण त्या सैन्याला हुकूम सोडा."

भीष्मदेवांच्या तोंडचे हे शब्द पुरे होतात न होतात तोंच प्रमथसिंह आणि रणसिंह या दोघांनीं रणशिंग फुंकलें. रणशिंगाचा आवाज ऐकतांच हजारों सैनिकांनीं प्रचंड जयघोष केला. रणभेरीचा निनाद करीत तें सैन्य शोणनदी उतरूं लागलें. हजारों घोडेस्वारांच्या पदधुलीनें शोणनदीचा पट दुमदुमून गेला. गौडीय सेना जयध्वनि करीत बिनहरकत नदीच्या पैल-तीरास जाऊन पोहोंचली.

## २५

गौडीय अश्वारोही सेना शोणनदी उतरल्यावर दोन भागांत विभागली गेली. एक सहस्र घोडेस्वारांनिशीं महाराज धर्मपाळदेव, भीष्मदेव वीरदेव आणि प्रमथसिंह यांनीं शोणनदीपासून थोड्या दूर अंतरावर छावणी ठोकली. रणसिंह, कमळसिंह, जयवर्धन आणि वचनपाळ हे चौघेहि आपापल्याबरोबर प्रत्येकीं पांचपांचशें स्वारांचें पथक घेऊन शत्रूच्या शोधार्थ वेगवेगळ्या दिशेनें निघाले.

हजार स्वारांसह चक्रायुधानें हळूहळू वाराणशीकडे कूच केलें. दुसऱ्या दिवशीं हजार स्वारांच्या पथकांसह स्वामी विश्वेश्वरानंद त्यांच्या मागून निघालें. भीष्मदेवाच्या सल्ल्यानें महाराज धर्मपाळदेवांनीं असा हुकूम फर्माविला कीं, कोणत्याहि सेनापतीनें एकाच जागीं दोन दिवसांपेक्षां अधिक दिवस तळ देऊन राहूं नये. वचनपाळास तर हा हुकूम ऐकून फार आनंद झाला.

गौडीयसेना दोन दिवसांनीं करूषदेशास येऊन पोहोंचली. बाकी राहिलेलें पांच हजार सैन्य येऊन मिळतांच महाराज धर्मपाळदेवांनीं तळ हलवून पुढे प्रयाण केलें.

दुसऱ्या दिवशीं धर्मपाळदेव आणि भीष्मदेब दोन हजार सेनेसह मागे राहिले व बाकीचे चार हजार सैन्य प्रमथसिंह आणि वीरदेव यांनीं वाराणशीच्या रोखानें पुढें चाल केली,

तिसऱ्या दिवशीं वचनपाळ छावणींत परत न आल्याकारणानें भीष्म-देव पांचशें स्वारांच्या पथकासह चौथ्या दिवशीं अगदीं पहांटेस जावयास निघाला. पांचव्या दिवशीं धर्मपाळदेव येऊन पाहतात तों भागीरथीच्या पैलतिरीं गौडीयसेना मोठाले तंबू ठोकुन राहिलेली आहे; आणि नौकांत बसून हजारों सैनिक नदीपार होऊन वाराणशीकडे निघालेले आहेत, तेव्हां विस्मयचकित होऊन महाराज धर्मपाळदेव अश्वारूढ होऊन पुढें झाले; मार्गांतच त्यांना प्रमथसिंह, स्वामी विश्वेश्वरानंद आणि वीरदेव हें त्रिवग भेटले. जिज्ञासापूर्वक महाराजांनीं विचारलें.

" प्रभु ! काय वर्तमान आहे ? हें कोणाचें सैन्य नदी ओलांडित आहे ? "

" महाराज ! वर्तमान शुभच आहे. नदीपार होणारी ही आपलीच सेना आहे. "

प्रमथसिंह म्हणाला, " वचनपाळांनीं तीन दिवसांत सत्तर गांवें मागें टाकून चौथ्या दिवशीं गंगापार होऊन वाराणशीवर आक्रमण केलें. त्या वेळीं तेथें कान्यकुब्जाच्या राजाची दहा सहस्रसेना होती; तरीही वचन-पाळांनीं न डगमगतां अवघ्या पांचशें योध्यांसह शत्रूवर एकदम चाल केली.

महाराज चक्रायुध त्याच दिवशीं सायंकाळीं भागीरथीच्या कांठीं येऊन पोहोंचतांच त्यांना हें वर्तमान समजलें. तेव्हां त्यांनींहि लगबगीनें नदी ओलांडली. त्यांची वेळेवर कुमक आली नसतीं तर वचनपाळांच्या पांचशें सैनिकांपैकीं एकही जिवंत रहाताना ! कान्यकुब्जदेशाच्या राजाच्या हुकुमानें वाराणशीच्या आसपासच्या टापूंतील हजारों नौका जाळून टाक-ण्यांत आल्यामुळें उरल्यासुरल्या नौकांतून एका दिवसांत पांचशेंपेक्षां अधिक सैन्यास नदीपार होणें शक्य नाहीं. "

" मग आतां याला उपाय ? "

विश्वेश्वरानंदांनीं उत्तर दिले, " भीष्मदेव नदीच्या किनारीं येऊन थडकले आहेत. त्यांच्या आज्ञेनें रणसिंह सैनिकांसह आणखी नौकांच्या शोधार्थ चरणाद्रीकडे गेलेले आहेत. जयवर्धनांचा मात्र कोठेंच पत्ता लागत नाहीं. "

" आपले कितीसे सैन्य हा वेळपर्यंत नदीपार झालेले आहे ?"

" दोन हजार असेल ! "

" आणि नदीच्या कांठी किती सैन्य शिल्लक आहे ? "

" सुमारे सात हजार. "

नंतर तेथून सर्वजण गंगेच्या कांठीं ठोकलेल्या तंबूंत येऊन पोहोंचले. सम्राटांच्या आगमनाचा समाचार ऐकून गौडीयसेना हर्षभरानें जयध्वनि करूं लागली. सप्तसहस्र सैनिकांच्या कंठांतून निघालेल्या जयनिनादानें विश्वनाथाच्या मंदिराचे कळसहि कंपायमान झाले. हा जयध्वनि ऐकतांच वराणा संगमावर छावणी देऊन असलेल्या गौडीयसेनेनेंहि सिंहनाद केला. सम्राटांच्या आगमनाची वार्ता कळतांच वचनपाळ आणि चक्रायुध यांनीं दुप्पट उत्साहानें किल्ल्यावर हल्ला चढविला. परंतु दहा सहस्र सेनेपुढें दोन हजार फौज कितपत टिकाव धरणार ? वरणानदी आणि आदिकेशवाचे घाट गौडीयसेनेच्या रक्तानें माखून गेले तथापि किल्ला हस्तगत होण्याचें चिन्ह दिसेना.

संध्यासमयीं वाराणशीहून नौका मागें परतल्या. भीष्मदेव आणि विश्वेश्वरानंद यांना छावणींत ठेवन दोनशें सैनिक नौकेंत चढले. प्रमथसिंह, वीरदेव आणि कमळसिंह सम्राटाबरोबर वाराणशीस निघाले. रात्रींच्या प्रथम प्रहरीं महाराज धर्मपाळदेव वरणाच्या संगमावर येऊन पोहोंचले.

देहावर ठिकठिकाणीं जखमा झालेल्या स्थितींतच वचनपाळ आणि चक्रायुध महाराजांना सामोरे आले. महाराजांनीं आनंदून त्या दोघांहि वीरांस दृढालिंगन दिले व वचनपाळास युद्धाची हकिकत विचारली. तेव्हां वचनपाळ म्हणाला—

" महाराज! जे पांचशें सैनिक शोणनदीच्या संगमावरून माझ्याबरोबर आले होते, त्या सर्वांनीं महाराजांच्या सेवेंत धारातीर्थी प्राण अर्पण केलें. आहेत. त्यांतून एकहि नांवाला शिल्लक उरलेला नाहीं. महाराज ! पांचशें योध्यांपैकीं एकानेंहि वरणा नदीच्या अलीकडे देह ठेविलेला नाहीं. वाराणशी जरी त्यांना काबीज करतां आली नाहीं, तरी वाराणशीच्या दुर्गद्वारांवर अगर आदिकेशवाच्या घाटावर सर्वांनीं देहत्याग केला आहे. "

बोलतां बोलतां वचनपाळाचे दोन्ही नेत्र उज्वल झाले. तो म्हणाला, " महाराज ! इंद्रायुधाच्या हुकूमावरून जरी त्यांच्या सैनिकांनीं सर्व नौकांची होळी केली, तरी त्यांत आपले कोणतें नुकसान ! ज्या थोडया फार नौका शिल्लक आहेत, त्याही त्यांनीं जाळून टाकल्या असत्या तरीही आपलें कांहींही बिघडलें नसतें ! महाराज, मी आपल्या पायांना स्मरून अशी प्रतिज्ञा करतों कीं, एक तर प्रभात होण्यापूर्वी वाराणशी हस्तगत करीन किंवा तसें न झाले तर--"

" तर काय वचनपाळ ? " महाराजांनीं कुतुहलानें प्रश्न केला.

" जर सूर्योदयापूर्वी आम्ही वाराणशी हस्तगत न केली, तर उद्यां प्रभातीं गंगेच्या तटावर एकहि जिवंत गौडीय सैनिक सूर्यदेव पाहूं शकणार नाहीं. " दृढतापूर्वक वचनपाळानें म्हटले.

" सत्य आहे, पण वचनपाळ ! वाराणशी हस्तगत झाली तर ती आज रात्रींच ! पुढें ती हस्तगत होण्याची आशाच करावयास नको."

" धर्मपाळदेवाचें हें शब्द ऐकतांच चक्रायुध कंपित झाला. तो म्हणाला, " महाराजाधिराज ! अशी भयंकर प्रतिज्ञा कां म्हणून ? केवळ माझ्याखातर आजच गौडाचें सिंहासन रिकामे करणार कीं काय ?"

" चक्रायुध ! आज रात्रींच गौडीय सिंहासन रिक्त व्हावें अशीच विधात्याची इच्छा असेल, तर तेथें कोणाचा इलाज चालणार ! वचन पाळांची प्रतिज्ञा अवश्य तडीस जाणार. आज रात्रीं आपण या किल्ल्यांतच प्रवेश करून विश्रांति घेणार आणि जर आमच्यानें असें न करवले तर–"

" तर उद्यां प्रभातीं जान्हवीच्या तटावर एकसुद्धां गौडीय योद्धा जिवंत दृष्टीस पडावयाचा नाहीं." वचनपाळानें गर्जना केली.

" होय, तुमचें म्हणणें खरें आहे वचनपाळ ! चक्रध्वज हातांत घेऊन मीच सेनेच्या मध्यभागी होईन. तुम्ही सगळ्या सैनिकांकडून तरवारीला आणि जान्हवीच्या जलाला स्पर्श करून शपथ घ्यावयाला लावा कीं, आज रात्रीं जर वाराणशी हस्तगत न झाली, तर कोणाहि अस्त्रधारी गौडीय योद्धयानें तंवुत मागें परततां कामा नये. "

इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या अंतिम भागीं धर्मपाळदेवांबरोबर जे गौडीय योध्दे चक्रायुधांच्या साह्यार्थ वाराणशीला आलेले होते, ते त्यापूर्वी कधीं गौड अथवा मगध देशांतून विदेशीं गेलें नव्हतें. इतक्या दिवसांत त्यांनीं फक्त आत्मरक्षण केलें होतें, आणि स्वदेशावर चालून आलेल्या शत्रूंना पिटाळून लाविलें होतें आजपर्यंत गौडीय सैनिकांनीं शत्रूच्या राज्यावर आक्रमण केलेलें नव्हतें. या कारणामुळें भीष्मदेव, प्रमथसिंह वगैरे मोठमोठे कसलेले सेनापतीसुध्दां वचनपाळाचें हे साहस पाहून स्तंभित झाले. परंतु खुद्द सम्राटांना व लहानसहान अधिकाऱ्यांना मात्र त्याबद्दल विशेष कांहीं वाटलें नाहीं. गौडीयसेना विदेशांत युध्दार्थ जाण्यासाठीं अगदीं उत्सुक झाली होती. सुशिक्षित आणि युध्दकलेंत पारंगत असलेली सेना ज्या स्थळीं जाण्यास अथवा जें कार्य करण्यास कचरली असती, तें कार्य हें नवशिक्के सैन्य अगदीं निर्भयपणें बजावीत होतें.

नवीन सम्राटाची आणि वचनपाळाची ही भयंकर प्रतिज्ञा ऐकून प्रमथसिंह अत्यंत चिंताक्रांत झाला. त्यांना त्या घोर प्रतिज्ञेपासून परावृत्त करण्याचे धैर्य त्यांस झाले नाहीं. मशाली पेटवून छावणीच्या रक्षणार्थ कित्येक सैनिकांसह तो वरणानदीच्या पलीकडे वाट पहात राहिला. दुसरा प्रहर उलटतांच वाराणशीच्या शेंकडों मंदिरांतून आरतीचें घंटानाद बंद होतांच धर्मपाळदेव हातांत चक्रध्वज घेऊन वरणानदीच्या पात्रांत उतरले. त्यांच्या मागोमाग कमळसिंह, वीरदेव, चक्रायुध आणि वचनपाळ हेंहि होतें. यावेळीं दोन सहस्र गौडीयसेना त्यांजबरोबर होती.

कान्यकुब्जाचीसेना त्याच्या कुमकेस येणाऱ्या फौजेची वाट पहात होती.

किल्ल्यांत शेंकडों मशाली पेटविण्यांत आल्या होत्या. त्यावेळीं हजारों शस्त्रधारी पुरुष त्या धूसरवर्ण नगराच्या किल्ल्यांत वावरतांना दिसूं लागले.

सम्राट् धर्मपाळदेव सुरक्षितपणें नदीपार होऊन किल्ल्याजवळ येऊन पोहोंचले. दुर्गावरून शिळांचा आणि तीरांचा एकसारखा वर्षाव होऊं लागला. उकळलेल्या तप्त तेलाच्या आणि गाळलेल्या शिशाच्या कढयाच्या

कढया त्यांच्या सैन्यावर किल्ल्यावरून ओतण्यांत येऊं लागल्या. तरी पण त्यांस न जुमानतां किल्ल्यास बाहेरच्या बाजूंनीं जागोजागीं शेंकडों शिड्या लावण्यांत आल्या.

विद्युत्‌वेगानें गौडीयसेना या शिड्यांवरून किल्ल्यांत घुसली. मनुष्य-बळ अधिक असतांहि कान्यकुब्ज देशाची फौज मागें मागें हटूं लागली. त्या सैन्याच्या अग्रभागीं हातांत एक भाला घेतलेला सैनिक मोठ्या शौर्यानें लढत होता.

वचनपाळानें त्यास लौकरच शस्त्रविहीन केलें; पण तो ठार झाला नाहीं. वचनपाळानें त्यास मारण्यासाठीं आपली नग्न तरवार वर केली. ती तरवार त्या निःशस्त्र योध्याच्या मानेवर पडणार तोंच चक्रायुधानें धांवत जाऊन वचनपाळाचा हात पकडून हळूच म्हटले—

" वचनपाळ ! जयसिंह आपला कैदी आहे, त्याला मारूं नका. "

धर्मपाळदेव आणि कमळसिंह यांस हा प्रकार पाहून भारी नवल वाटलें. ते चक्रायुधाला याचें कारण विचारणार तोंच नगरांत कोठेंशीं आग भडकलीं. ती पाहतांच गौडीयसेनेनें एकच जयघोष केला. कान्यकुब्जाची फौज आतां सैरावैरा पळूं लागली. सम्राट् किल्ल्यावरून खालीं उतरून नगरांत प्रवेश करणार, तोंच रक्तानें न्हालेल्या एका योध्यानें येऊन त्यांस प्रणाम केला. त्या योध्याच्या हातांत गौडीय चक्रध्वज पाहून तो आपल्याच सैन्यांतील आहे हें महाराजांनीं ताडलें. तेव्हां विस्मयानें त्यांनीं त्यांस विचारले, " आपण कोण ?"

मंदहास्य करून सैनिकानें प्रत्युत्तर दिलें, " महाराज ! इतक्यांतच ओळख विसरलांत कीं काय ? मी जयवर्धन !"

तेव्हां आनंदित होऊन सम्राट्, कमळसिंह, वीरदेव आणि वचनपाळ या सर्वांनीं त्यास कडकडून आलिंगन दिले.

जयवर्धन नौकांच्या शोधार्थ चरणाद्रीकडे जावयास निघाला होता. परंतु मार्गांतच त्यास कांहीं नौका आढळल्यामुळें त्यांच्या साह्यानें तो नदीपार झाला. संगमावर येतांच त्याला कळलें कीं, गौडीयसेनेनें वरणाच्या संगमावर हल्ला चढविलेला आहे,

नगरांतील दुसऱ्या कोणत्याहि स्थळीं शत्रूसैन्यानें आक्रमण केलेलें नाहीं, हें पाहून या बाजूच्या रक्षणार्थ असलेलें बरेचसें सैन्य वरणासंगमावर एकत्रित झाले होते; या संधीचा फायदा घेऊन त्यानें शत्रूच्या तेथें असलेल्या मूठभर सैन्याचा पराभव करून नगरांत प्रवेश केला.

पराभूत व भीतिग्रस्त झालेले कान्यकुब्जाचें हे लहानसें सैन्य पलायन करूं लागले. नंतर जयवर्धनानें नगरांत प्रवेश करून दुर्गरक्षणाची नीट व्यवस्था केली.

प्रभात होतांच धर्मपाळदेव आणि प्रमथसिंह विस्मयचकित होऊन पहातात तों हजारों घोडेस्वार नदी ओलांडित आहेत, तेव्हां प्रतिकारार्थ तेही सज्ज झाले; पण ते स्वार जवळ येतांच प्रमथसिंह महाराजांस उद्देशून म्हणाला, " महाराज ! हे तर गौडीय सैनिक आहेत; पहा, प्रत्येक घोडेस्वाराच्या हातावर चक्रध्वजाची निशाणी आहे. "

अर्ध्या घटकेनंतर त्यांना दिसून आलें कीं, घोडयाची लगाम हातांत धरून वृद्ध भीष्मदेव मणिकर्णिकेच्या दगडांनीं बांधलेल्या घाटावर अश्वारूढ स्थितींत चढत आहे. तेव्हां महाराजास नवल वाटून त्यांनीं विचारले-- " भीष्मदेव ! काय हकिगत आहे ?"

भीष्मदेव म्हणाला, " महाराज ! दोन हजार फौजेनिशी आपण वाराणशीला वेढा घातलेला आहे असे समजतांच सर्व गौडीय घोडेस्वार घेऊन कुमकेसाठीं मी निघालों. पण असाध्य साध्य करण्यांत आपण जें उदाहरण आज जगापुढें ठेविलेंत ते निःसंशय प्रशंसनीय आहे. आपल्या धीरोदात्त व वीरोचित वर्तनानें सर्व गौडीय सेनेला विलक्षण स्फुरण चढलेले आहे. भुकेतहानेनें व्याकुळ झालेलीं व युद्धाच्या श्रमानें श्रांत झालेली गौडीय सेना याच स्थितींत पुढें प्रतिष्ठानावर हल्ला करावयास उत्सुक झालेलीं आहे."

भीष्मदेवाचें हें भाषण ऐकून प्रमथसिंह म्हणाला, " महाराज ! आपलें अनुमान खोटें ठरलें. गौडीयसेनेला आपण अशिक्षित व नवशिकी समजत होतों. परंतु तिनेंच आज अचाट पराक्रम गाजविला आहे. आतां कान्यकुब्जाचें युध्द संपलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण कीं, वाराणशीच्या युद्धाचा परिणाम ऐकून इंद्रयुधाची सेना याउप्पर युद्धाला तोंड देईलशी वाटत नाहीं. "

● ●

## ——२६

रात्रीच्या शेवटच्या प्रहरीं भिल्लमाळ नगराच्या पूर्वेकडील दरजावर मंगल वाद्यांचा एकच गजर चाललेला होता. दरवाजावर अजूनही दिवे जळत होते. चौथ्या प्रहरचे पहारेकरी प्रभात जवळ आलेली पाहून आनंदानें डुलक्या घेत होते. एखाद दुसरा नागरीक राजमार्गावरून जात येत असतांना दृष्टीस पडे; परंतु नगराचे चारी दरवाजे मात्र अद्यापि बंदच होते. मंगल वाद्यें वाजविणांनीं बांसरी वाजविण्याचा आरंभ करतांच पूर्वेकडील दरवाजा कुणीसा ठोठावला. पहारेकऱ्यांपैकीं एकानें प्रश्न केला, "कोण आहे ?"

"जलदी दरवाजा उघड."

"दरवाजा उघण्याची वेळ अद्याप झालेली नाहीं."

"समय झाला नसला, तरी लवकर दरवाजा खोल."

पहारेकऱ्यानें विस्मयानें पुनःप्रश्न केला, "तुम्ही कोण ?"

"कां ?"

"तुम्ही कोणी विदेशी आहांत काय ?"

"विदेशीं असें तुम्ही कशावरून म्हणतां ?"

"मला वाटतें, गुर्जरराज्यांतील चालीरीतीविषयीं आपण अनभिज्ञ आहांत, खुद्द गुर्जरेश्वर आले, तरी रात्रीच्या वेळीं भिल्लमाळ नगराजा दरवाजा आम्हांस उघडतां येत नाहीं."

"पण रात्र तर आतां संपत आली आहे."

"नाहीं, अद्यापि अर्ध घटकेचा अवकाश आहे."

"तर मग तुम्ही महाराजांना कळवा, कीं, महाराजाधिराज, परम भट्टारक, परम माहेश्वर, अशेषभूपालमुकूटमणि--"

"काय म्हणालांत ?"

"कान्यकुब्जेश्वर आलेले आहेत."

"ठीक, त्यांना थोडा वेळ थांबण्यास सांगणें."

" असें कसें होईल ?"

" कां बरें, थोडा वेळ त्यांना थांबायलाच हवें ! "

" पण तुम्हांला मी काय सांगितलें तें नीट ऐकूं आलें ना ? खुद्द कान्यकुब्जाचें महाराज नगरद्वारांवर वाट पहात उभे आहेत."

" ठीक ! तरीपण आणखी थोडा वेळ वाट पहावीच लागणार."

" छे, हें अशक्य आहे. तुम्ही जलदी दरवाजा उघडून महाराज नागभट्टांना निरोप पाठवा कीं, महाराजाधिराज इंद्रायुध भिल्लमाळ नरेशांच्या येथें पाहुणे म्हणून आलेलें आहेत."

" होय, आपण काय म्हणतां तें मला समजलें. परंतु थोड्या वेळां-नंतर मी आपणांस अतिथिशाळेत घेऊन जाईल."

दरवाज्याबाहेर उभ्या उभ्या जी व्यक्ति पहारेकऱ्याबरोबर वरील-प्रमाणें वार्तालाप करीत होती, ती निराश होऊन मागें परतली. त्या विशाल द्वारापासून जरा दूर अंतरावर चार घोडे जुंपलेला सुसज्जित असा एक सुंदर रथ उभा होता. त्यानें रथाजवळ येऊन सारथ्याला प्रश्न विचारला, " महाराजाधिराज जागे झाले का ? "

रथाच्या पडद्यांतून एकानें उत्तर दिलें, " होय, मी जागाच आहे. भूपतसिंह ! तूं इकडे माझ्याजवळ ये. "

त्यानें जवळ जाऊन म्हटलें, " महाराज ! "

" कां; काय काम आहे ? आपण कोठें आलों आहोंत ? "

" भिल्लमाळ नगरांत. " उत्तर मिळालें.

" तर मग पडदे वर गुंडाळून घ्या; मी खालीं उतरतों. "

" महाराज ! रथ अद्यापि नगरद्वाराबाहेरच उभा आहे. "

" कां बरें ?"

" नगरद्वार बंद आहे. "

" द्वाररक्षकाला मी आल्याचें कळविलें काय ?"

" होय; पण अद्याप वेळ झालेली नसल्यामुळें दरवाजा उघडलेला नाहीं. "

" गुर्जरराजांना तरी सांगन पाठविलें आहे काय ? "

" होय, कळविण्यास सांगितलें आहे; पण मला वाटतें कीं, गुर्जरराव अद्यापि झोपेंतून जागृत झाले नसतील. "

इतक्यांत दिवसाच्या प्रथमप्रहरचीं मंगलसूचक वाद्यें वाजूं लागलीं. लगेच मोठाले लोखंडी खिळे असलेला नगरचा मुख्य दरवाजा खाड्‌दिशीं उघडण्यांत आला.

सारथ्यानें इंद्रायुधाच्या परवानगीनें रथ नगरांत हांकलला. पहारेकऱ्यानें त्यास कांहींहि प्रश्न विचारला नाहीं. भूपतसिंहहि अश्वारूढ होऊन रथाच्या मागोमाग नगरांत शिरला.

या वेळीं भिल्लमाळनगराच्या राजमार्गावर गाडीघोड्यांची खूपच गर्दी उडालेलीं पाहून रथांत बसलेल्या इंद्रायुधानें प्रश्न केला–

" अरुणसिंह, गुर्जरराजांनीं आमच्या स्वागताची कांहीं तयारी केली आहे काय ?"

सारथ्यानें विस्मयानें उत्तर दिलें, " नाहीं, तशी व्यवस्था केल्याचें कांहीं दिसत नाहीं. "

" तर मग रस्त्यावर इतकी गाडीघोड्यांची गर्दी कां म्हणून ? "

" महाराजाधिराज ! हा एक प्रवाशांचा तांडा चाललेला आहे, नगराचीं द्वारें उघडलेलीं पाहून हे लोक आतां बाहेर जाण्याच्या गडबडींत आहेत. "

क्षणावकाशांतच कान्यकुब्ज देशाच्या राजाचा रथ गुर्जरराजाच्या राजमहालाच्या दरवाजापाशीं येऊन उभा राहिला. त्या सुशोभित रथाचें ऐश्वर्य पाहून एकदोघे दंडधारी त्याचेजवळ आले. त्यांनीं भूपतसिंहास विचारलें, " अहो, हा रथ कोणाचा ?"

" महाराजाधिराज कान्यकुब्ज महोदय कुशस्थलेश्वर इंद्रायुधांचा. "

कान्यकुब्जचें महाराज इंद्रायुध आलेलें आहेत असें समजतांच एक दंडधारी धांवत धांवत राजवाड्यांत गेला. दुसऱ्या दंडधाऱ्याच्या हुकूमावरून द्वाररक्षकांनीं दरवाजावर उंची उंचीं वस्त्रें पसरलीं.

नंतर इंद्रायुध रथांतून खालीं उतरला. तो राजमहालाच्या पायऱ्या चढून जाणार तोंच, शुभ्रवस्त्रें परिधान केलेला एक पुरुष राजमहालाच्या

दिवाणखान्याचे द्वार उघडून पायऱ्या उतरून एकदम खालपर्यंत आला. त्याच्या मागें दहा सेवक, छत्र, चामरें, सुवर्णदंड वगैरे राजचिन्हें हातांत घेऊन खालीं उतरलें.

इंद्रायुध त्यांना येतांना पाहून खालींच थबकला. श्वेतवस्त्रें परिधान केलेल्या पुरुषानें मंदहास्य करीत म्हटलें--

" यावें, महाराज ! मार्गांत आपणाला कोणत्याहि प्रकारचा त्रास झालेला नाहीं ना ?"

" नाहीं, रस्त्यांत तसा कांहीं विशेष त्रास झाला नाहीं; परंतु भिल्लमाळ नगराच्या द्वारावर थोडा वेळ तिष्टत रहावें लागलें. कारण कीं, आमचा रथ ज्यावेळीं तेथें येऊन पोहोंचला, त्यावेळीं सूर्योदय झाला नव्हता.

श्वेतवस्त्रें परिधान केलेल्या पुरुषानें कान्यकुब्ज राजाला कांहींच उत्तर न देतां म्हटलें, " महाराज ! महालांत चलावें. "

इंद्रायुधानें गुर्जरराजाचा हात धरून हळूहळू पायऱ्या चढावयास आरंभ केला. अर्ध्या पायऱ्या चढून आल्यावर नागभट्टानें प्रश्न केला,

" महाराज ! आपलें दंडधर आणि छत्रधर आपल्या बरोबर आलेलें कोठें दिसत नाहींत ? "

लज्जेनें खालीं मान घालून इंद्रायुध उत्तरला, " ते बरोबर आलेलें नाहींत. "

" तर काय चक्रायुधानें कान्यकुब्ज काबीज केलें ? " नागभट्टानें विचारलें.

" नाहीं." प्रत्युत्तर मिळालें.

हें उत्तर ऐकतांच नागभट्ट विस्मयपूर्वक इंद्रायुधाच्या मुखाकडे पहात राहिला. इंद्रायुधानें लज्जेमुळें आपली मान वरतीं केली नाहीं. गुर्जर राजानें इशारत करतांच दहा सेवक छत्र, दंड, चामर वगैरे राज़-चिन्हे घेऊन आले व कान्यकुब्जाधिपतींला गराडा घालून उभे राहिले. नंतर दोन्ही राजे पुढच्या पायऱ्या चढूं लागले. आणखी थोड्या पायऱ्या चढल्याबर नागभट्टानें प्रश्न केला, " महाराज ! चक्रायुध सध्यां कोठें आहे ? "

" मला वाटतें तो या वेळीं प्रतिष्ठानांत असावा." इंद्रायुधानें उत्तर दिले.

आश्चर्यचकित होऊन गुर्जरराजानें पुन: प्रश्न केला, " तर मग आपण नगर सोडून कां म्हणून निघालांत ? "

इसवी सनाच्या आठव्या शतकाच्या उत्तरार्धांत नगर शब्दाचा अर्थ कान्यकुब्ज अथवा महोदय असा होत होता. इंद्रायुध अत्यंत लज्जित होऊन म्हणाला, " चक्रायुधाला त्वरेनें प्रतिष्ठानावर चाल करून येतांना पाहून महाराजांचे सैन्य मदतीसाठीं घेऊन जाण्यासाठीं भिल्लमाळनगरास आलें आहे. येतांना मी घाईघाईनें निघालों त्या कारणानें कोणीहि राजसेवक मजबरोबर आणतां आलें नाहींत."

" महाराजांच्या फौजेने चक्रायुधाला वाटेंत कोठेंच कां प्रतिकार केला नाहीं ?"

" केला होता. वाराणशीला माझी दहा हजार सेना होती. परंतु धर्मपाळानें फक्त दोन तीन हजार फौजेच्या जोरावर तिचा धुव्वा उडविला."

" चरणाद्रि किंवा प्रतिष्ठान यांपैकी एखाद्या ठिकाणीं युद्ध झालें होतें काय ? " नागभट्टानें प्रश्न विचारला.

" होय, चरणाद्रिसुद्धां त्यांनीं जिंकून घेतली. " इंद्रायुधानें उत्तर दिलें.

" आणि प्रतिष्ठान ? "

" मला वाटतें तें अद्याप शत्रूच्या हस्तगत झालें नसावें."

नागभट्टानें क्रोधानें आपलें तोंड फिरविलें. अत्यंत दीनवाणीनें इंद्रायुधानें त्याला विचारलें, " महाराज ! येथून आपण स्वारीला कधीं निघतां ? "

गुर्जरराज हळूच म्हणाला, " आपण आतां अगदीं थकून गेलेले आहांत, तेव्हां प्रथम थोडीशी विश्रांति घ्या; नंतर युद्धाविषयीं काय तें बोलूं."

राजमहालांत प्रवेश केल्यानंतर नागभट्टानें कान्यकुब्ज राजासाठीं रिकाम्या केलेल्या खोलींत त्याला नेऊन पोहोंचविलें व त्याच्या तैनातीस

एका नोकाराला ठेऊन तो स्वत: बाहेर निघून गेला. त्या खोलीच्या द्वाराजवळच एक प्रौढ योद्धा त्याची वाड पहात उभा होता. त्याला पहातांच नागभट्टानें विचारलें, " अमात्य ! आपण केव्हां आलांत ? "

" राजाधिराज ! हा मी नुकताच येतों आहे. कान्यकुब्जाधीश आले आहेत वाटतें ?,"

" होय, आपलेंच म्हणणें शेवटीं खरें ठरलें. चक्रायुधानें वाराणशी आणि चरणाद्रि जिंकून घेतल्याचें कळतांच हा कुलांगार राजधानीचा त्याग करून पळून आलेला आहे. आपण कान्यकुब्ज जिंकून घेणें हेंच आतां श्रेयस्कर होईल. इंद्रायुधांत पौरुषाचा लवलेशहि दिसत नाहीं. कान्यकुब्जाच्या गादीवर त्याची स्थापना करण्यांत कांहींहि अर्थ नाहीं."

" वडिलोपार्जित राज्याचा असा त्याग करणें त्याला खरोखरच शोभत नाहीं. गुर्जरांच्या बाहूंत जर बळ असेल, तर कान्यकुब्ज परत जिंकून घेतलेंच पाहिजे." बाहुकधवलानें सुचविलें.

" परंतु पुन: इंद्रायुधाला कान्यकुब्जाच्या सिंहासनावर बसविणें अगदीं निरर्थक आहे. कारण पुन: जरी त्याची गादीवर स्थापना केली, तरी तीच गत होणार. " नागभट्ट म्हणाला.

" तर मग त्याला कैद करून चक्रायुधाचा पक्ष स्वीकारला तर ? " अमात्यानें सल्ला दिली.

पण चक्रायुधाची गांठ यावेळीं कशी पडणार ? तो या वेळी विजयोन्मादानें कान्यकुब्जांत धिंगाणा घालीत असेल. शिवाय गौडदेशाधिपति धर्मपाळदेवाचें त्याला साह्य मिळालेलें आहे. त्याच्या पित्याच्या वेळेपासून आमचे त्याच्याशीं हाडवैर चालत आलेलें आहे. तेव्हां चक्रायुधाचा आमच्या बोलण्यावर विश्वास बसेल काय ?"

" आपलें म्हणणें सत्य आहे, महाराज ! पण या वेळीं चक्रायुध कोठें आहे ?"

" तो प्रतिष्ठानांत आहे असे मी ऐकतों. वाराणशी आणि चरणाद्रि धर्मपाळदेवानें जिंकून घेतलेली आहे आणि आतां इंद्रायुधहि तेथून पळून आलेला असल्यानें एवढ्या अवकाशांतच त्यानें कान्यकुब्जाचे सारें राज्य काबीज केलें असेल. "

" पण इंद्रायुधानें काय सांगितले ?"

" तो म्हणत होता कीं, आम्ही आमचें सैन्य घेऊन त्याच्या साह्यास कधीं निघणार ?"

" मग आपण काय उत्तर दिलेंत ?"

" कांहींच नाहीं.. "

" तर मग त्यालाच भिल्लमाळांत थोडे दियस कैदेंत राहूं द्या. "

" परंतु आपणांस युद्धाला निघावेंच लागणार ना ? "

" भलतेंच ! या स्त्रैण आणि भ्याड राजासाठीं वृथा परिश्रम घेण्याची जरूरी तरी काय ? "

" योग्य आहे आपले बोलणें; पण सत्याचा भंग होतो त्याची काय वाट ? "

" राजनीतींत सत्यासत्य पाहिजे कशाला ?"

" मग कसें करावें म्हणतां ? "

" निश्चिंतमनानें पाहुण्याचा सत्कार करावा. "

" वा: ! बाहुकधवल ! तुमच्यासारखा मिथ्यावादी, क्रूर स्वभावाचा निष्ठुर माणूस आजपर्यंत एकहि पाहिलेला नाहीं. "

" हें पाहा, महाराज ! या वृद्ध बाहुकधवलाचें केंस या राज्यांत काळयाचें पांढरे झाले नसतें, तर स्वर्गस्थ महाराज वत्सराज युद्धांत कधींहि विजयी होतें ना आणि त्यांच्या पुत्राचें राज्य आज दृष्टीलाहि पडलें नसतें हें लक्षांत असूं द्या ! "

" अमात्य ! आपले बोलणें रास्त आहे. चला, आतां आपण दरबारांत जाऊं या. "

" चलावें. "

" इंद्रायुधालाहि बरोबर न्यावें म्हणतां ? " नागभट्टानें पृच्छा केली.

" नको, तेथें त्याचें कांहीं एक काम नाहीं. " बाहुकधवलानें उत्तर दिले.

" हें पहा अमात्य ! गौडीय योध्यांना तुम्ही साधारण योद्धे समजू

नका. धर्मपाळदेवाने फक्त दोन सहस्र सैनिकांच्या बळावर दहा हजार फौजेचा मोड करून वाराणशी दुर्ग काबीज केलेला आहे."

"आपले हें म्हणणें खरें असले, तरी स्वर्गस्थ महाराज वत्सराज यांच्या वेळीं गौडवासी एखाद्या घोडेस्वाराला पाहूनहि बुजत असत." इतकें ते नामर्द होते.

"होय, ते खरे! पण ती वेळ आतां गेलीं; या वेळीं पूर्वीच्या अगदीं उलट प्रकार आहे. ठीक; पण मणिधरसेन कोठें आहे?"

"कारागृहांत. आज त्याचा निकाल करावयाचा आहे. महाराज! वृद्ध पुरोहिताच्या चिथावणीनें आपण कांहीं अधर्माचरण करूं नका."

"राजनीतिदृष्टया पाहिलें तर यांत कांहीं वावगें मला मात्र दिसत नाहीं."

"पण मी जें आपणांला आतां सांगत आहें तें राजनीतिदृष्टया नव्हे, तर साधारण नीतीला अनुसरून." बाहुकधवल ठासून म्हणाला.

●●

## २७

वाराणशी काबीज केल्यानंतर दोन दिवसांनीं चरणाद्रीहून समाचार आला कीं, जयवर्धनानें पांचशें सैनिकांच्या मदतीनें दुर्ग जिंकला आहें व दूर्गाच्या रक्षणासाठीं त्यानें महाराजांपाशीं आणखी सैन्याची मागणी केलेली असून, दुर्गाची नीट व्यवस्था लावल्यानंतर प्रतिष्ठानवर चालून जाण्याची आज्ञा मागितली आहे.

वाराणशीच्या युद्धाचा शेवट लागल्यानंतर चरणाद्रिदुर्ग हस्तगत झाल्याचे वृत्त ऐकून भीष्मदेव आणि प्रमथसिंह यांस विशेषसें नवल वाटलें नाहीं. त्यांनीं दूतामार्फत जयवर्धनला सांगून पाठविले कीं, पायदळ सैन्या-शिवाय दुर्गरक्षणाचे दुसरें सैन्य ठेवतां यावयाचें नाहीं, म्हणून तें सैन्य घेऊन पोहोंचेपर्यंत थोडे दिवस थांबावें. फार करून एक आठवड्याच्या

आंत तें सैन्य येऊन पोहोंचेल. "

पायदळसेना जेव्हां वाराणशीला येऊन पोहोंचली, तेव्हां कान्यकुब्जाचें युद्ध बहुतेक आटोपत आले होतें. चरणाद्रि शत्रूंनीं जिंकून घेतला. हा समाचार ऐकून कुलांगार इंद्रायुध प्रतिष्ठानचें रक्षण करावयाचें सोडून पळून गेला. तो गुर्जर राजधानीला कशा प्रकारे जाऊन पोहोंचला हें वृत्त वाचकांनीं अगोदर वाचलेलें आहेच. इंद्रायुध राजधानी सोडून पळून गेल्याचें कळतांच कान्यकुब्जाच्या सामंतांनीं युद्ध बंद करून चक्रायुधाला कान्यकुब्जाच्या गादीवर बसविले.

याप्रमाणें युद्धाशिवाय प्रतिष्ठान आणि कान्यकुब्ज गौडीय सेनेच्या हातीं आलें. धर्मपाळदेव आणि चक्रायुध यांनीं वाराणशी, चरणाद्रि आणि प्रतिष्ठान यांच्या रक्षणार्थ थोडेसें सैन्य ठेवून बाकी सेनेंसह कान्यकुब्जेकडे प्रयाण केलें.

इंद्रायुध गुर्जरराज नागभट्टाचा पाहुणा म्हणून भिल्लमाळ नगरांत राहूं लागला आणि प्रत्येक दिवशीं गुर्जरराजास गौडेश्वराविरूद्ध युद्ध पुकारण्यास विनवनी करूं लागला.

याप्रमाणें एक महिना निघून गेला. तरी गुर्जरराज्यांत युद्धाची कांहींच तयारी चालल्याचे दिसून आले नाहीं.

नागभट्ट आणि बाहुकधवल दोघेहि आज उद्यांवर चालढकल करीतच राहिले. कान्यकुब्जास ते दररोज आश्वासन देत. परंतु खरें पाहिलें तर गौडेश्वराविरुद्ध युद्ध पुकारण्यास ते मनापासुन तयार नव्हते.

कान्यकुब्ज राज्यांतील सामंत चक्रायुधाला राज्याभिषेक करावयास एका पायावर उत्सुक झाले होतें; परंतु संन्याशी विश्वेश्वरानंद आणि भीष्मदेव यांच्या सल्ल्याने धर्मपाळदेव आणि चक्रायुध यांनीं या गोष्टीस मान्यता दर्शविली नाहीं.

वज्रायुधाच्या मरणानंतर गुर्जरराजाच्या साह्यानें इंद्रायुध कान्यकुब्जाची गादी मिळविण्यास समर्थ झाला होता. नागभट्टाचा पिता वत्सराज जेव्हां दिग्विजयार्थ बाहेर पडला, तेव्हां त्यानें सारा उत्तरापथ जिंकून घेतला होता.

वज्रायुधानें त्यावेळीं त्याच्याशीं सामना दिला होता. या युद्धांत वत्सराजानें जरी त्याला पराभूत केलें, तरी त्यानें त्याची ताबेदारी स्वीकारलीं नाहीं. यानंतर बराच काळ लोटल्यावर जेव्हां दक्षिणपथचा राजा राष्ट्रकूटवंशीय घ्रूवधारावर्ष यानें वत्सराजाचा पराजय करून त्यास मरु–भूमींतून काढून लाविले, तेव्हां गमावलेले राज्य वज्रायुधाला परत मिळाले. वज्रायुधाबरोबरच्या युद्धांत त्याच्या धाकटया भावाकडून, म्हणजे इंद्रायुधाकडून गुर्जरराजास आंतून साह्य मिळाले होते.

या मदतीबद्दल वज्रायुधाच्या मरणोत्तर इंद्रायुध गुर्जरराजाच्या साह्यानें कान्यकुब्जाची गादी मिळविण्यास समर्थ झाला.

लोकवार्ता अशी होतीं कीं, गुर्जरराजाच्या मदतीनेंच इंद्रायुधानें वडील भावाची हत्या करविली. कान्यकुब्ज देशांतील मांडलिक राजांचें वज्रायुधावर अतोनात प्रेम होतें; आणि त्याच्याविषयीं त्यांच्या मनांत फार आदर होता. अत्याचारी, पापी, विषयासक्त इंद्रायुधाचा ते भारी तिटकारा करीत. गूर्जरराजाच्या भयानें लोक उघडपणें इंद्रायुधाविरुद्ध कांहीं बोलत नसत. परंतु वज्रायुधाच्या अकाली निधनाबद्दल त्याना अत्यंत हळहळ वाटे आणि इंद्रायुधाचा मनांतून तें द्वेष करीत.

कान्यकुब्ज देशांतील सामंत वर्गापासून तों साधारण शेतकरीवर्गापर्यंत सर्वजण चक्रायुध कधीं वयांत येतो, याचीच वाट पहात होतें. गौडीयसेना बरोबर घेऊन चक्रायुधानें जेव्हां पितृराज्यांत प्रवेश केला, तेव्हां देशांत इंद्रायुधाचा पक्ष घेणारा एकहि माणूस नव्हता.

इंद्रायुध पळून गेल्यानंतर दुर्गरक्षणार्थ असलेले सैन्य गौडीयसेनेच्या हातून मारलें गेलें.

चक्रायुधाविरुद्ध ज्यांनीं शस्त्र उपसले, त्या सर्वांना प्रजाजनांनीं ठार केले.

याप्रमाणें एका दिवसाच्या आंतच कान्यकुब्जांतील इंद्रायुधाचा अधिकार नष्ट झाला. वज्रायुधाच्या वेळचें राजसेवक आणि सेनापती पुन: आपापल्या पूर्वपदावर नेमण्यांत आलें.

इंद्रायुध गुर्जरराजाज्या साह्यानें परत चालून आला, तरी त्यास परत

राज्य मिळणें जड जाईल ही गोष्ट धर्मपाळदेव आणि चक्रायुध जाणत होते, तरी पण राज्यभिषेक करून घ्यावयास ते तयार होईनात. धर्मपाळदेव आणि भीष्मदेव यांस विश्वेश्वरानंदांनीं सांगितलें होतें कीं, जोंपर्यंत कान्यकुब्ज राज्याच्या चोंहीकडचे राजे एकजुटीनें चक्रायुधाला राजा असें मानण्यास तयार होणार नाहींत, तोंपर्यंत युद्ध समाप्त होणार नाहीं. धर्मपाळदेवानें त्यांचा आशय ओळखून राज्यारोहणसमारंभ लांबणीवर ढकलला. आतां आपणांस पुढील भयंकर युद्धासाठी तयार झालें पाहिजे ही गोष्ट वृद्ध भीष्मदेव ओळखून चुकला. त्यानें यमुनेच्या उत्तर किनाऱ्यावर आलेल्या दरेक घाटावर गौडीयसेना शिस्तीनें ठेविली; आणि वचनपाळ आणि प्रमथसिंहाच्या फौजेंत नवीन भरती केली. प्रतिष्ठानांत रणसिंह, कौशांबींत वीरदेव, मथुरेंत कमळसिंह आणि स्थानेश्वरांत जयवर्धन असें चक्रायुधाच्या राज्याच्या सीमेचें रक्षण करूं लागलें. प्रतिष्ठानहून स्थाने-श्वरापर्यंत शेंकडों गांवांच्या सीमेपलीकडे गुर्जरराज्याची हद्द लागलेली होती. गुर्जरसेनेची युद्धार्थ तयारीं होत आहे हें गौडीय सामंतांना कळून आले. म्हणून प्रत्येक घाटावर घोडेस्वार आणि पायदळ सैनिक यांचा सक्त पहारा ठेवण्यांत आला.

शत्रूच्या सेनेची ही हालचाल ऐकून विश्वेश्वरानंदाचें म्हणणें खरें आहे ही गोष्ट धर्मपाळदेव आणि चक्रायुध यांना पटलीं. युद्धाची इतिश्री अद्याप झालेली नाहीं हें त्यांनीं ताडलें. गुर्जरराज आत्मरक्षणार्थ युद्धाची तयारी करीत असावा असें धर्मपाळदेवास वाटले. आपण इंद्रायुधाला साह्य केलें म्हणून चक्रायुध पितृवधाचा सूड घेण्यासाठीं आपणांवर स्वारी करील अशी गुर्जरराजास बास्ती वाटत असावी असा धर्मपाळदेनांनें तर्क केला. गौडाधिपतीनें एक दिवस दरबार भरवून भिल्लमाळच्या दरबारांत दूत पाठविण्याचा आपला मनोदय जाहीर केला.

परंतु विश्वेश्वरानंद, भीष्मदेव, चक्रायुध आणि वचनपाळ या चौघां-नींहि एकमतानें या गोष्टीस हरकत घेतली. चक्रायुधानें दर्शविलें कीं, जेव्हां जेव्हां गुर्जरराजाच्या मनांत युद्ध उपस्थित करावयाचें असतें, तेव्हां तेव्हां अगोदर दीर्घकालापासून तो तयारी करीत असतो, आणि ती तयारी

पूर्ण होतांच युद्धाचें अगोदर आव्हान दिल्याशिवाय परराज्यावर तो एका-एकीं स्वारी करतो. तेव्हां धर्मपाळानें निराश होऊन आपला विचार सोडून दिला. मात्र भीष्मदेवाच्या आग्रहामुळें त्याच दिवशीं एक घोडेस्वार गौडांत महाकुमार वाक्पाळ याजकडे त्वरित कुमक घेऊन येण्यासाठीं पाठविण्यांत आला.

त्या वेळीं हल्लींचा पंजाब आणि राजपुतान्याचा प्रदेश गुर्जरजातीच्या सत्तेखालीं होता. भोज, मत्स्य, अवंति, गांधार, भद्र, कुरु, यदु आणि कीर वगैरे प्राचीन राज्यें गुर्जर सामंतांनीं जिकून घेतलेलीं होतीं बाह्यतः त्यांनीं भिल्लमाळचें वर्चस्व जरी कबूल केलें होते. तरी तें आपापल्यापरीनें स्वतंत्र-पणेंच वागत. गौडाधिपतीनें या सर्व राजांकडे दूत पाठविण्याचें ठरविलें. चक्रायुध आतां कान्यकुब्जाचा राजा झालेला आहे हें वर्तमान दूतांनीं या सर्व राज्यांत जाहीर केलें.

सर्वांआधी भिल्लमाळला गेलेला दूत परत आला. तो धर्मपाळदेवास प्रणाम करून म्हणाला, " भिल्लमाळच्या राजांनीं गौडाधिपतीला स्नेह-पूर्वक असें कळविण्यास सांगितलें आहे कीं, वज्रायुधाचा पुत्र चक्रायुध आपल्या पित्याच्या राज्यावर परत आरूढ झाला, हें वर्तमान ऐकून आम्हांस भारी संतोष होत आहे, थोड्याच दिवसांनीं गुर्जर राजांचा दूत नूतन कान्यकुब्जाधीशांच्या दरबारी हजर होईल. शरणागताचे रक्षण करणें हा क्षत्रियांचा धर्म असल्यामुळें इंद्रायुधाला आम्हीं आश्रय दिलेला आहे, तरी त्याचा पक्ष स्वीकारून आम्ही कान्यकुब्जावर चढाई करणार नाहीं. परंतु आपलें गेलेलें राज्य मिळविण्याचा इंद्रायुधानें आपण होऊन प्रयत्न केला, तर गुर्जरराज त्यास अडथळा करणार नाहीं. आतां गौडेश्वर लौकर परत आपल्या राज्यास निघून जातील, तर गुर्जरराजांशीं त्यांची असलेली मैत्री अभंग राहील."

दुसऱ्या राजांकडे पाठविलेलें दूत अद्यापि परतलें नव्हते. नागभट्टाचें उत्तर ऐकून धर्मपाळदेव गौडाकडे परत फिरण्याचा विचार करूं लागला, पण या गोष्टीस सारें गौडीय सामंत विरुद्ध होते.

## —— २८

धर्मपाळदेव ज्या वेळीं चक्रायुधाच्या राज्याचे रक्षण करावयाचा कसून प्रयत्न करीत होता. त्यावेळीं गौड देशांत सर्वत्र शांतता प्रस्थापित झालेली होती. वैशाख महिन्याचे दिवस असल्यामुळें वरेंद्र भूमींत ग्रीष्माचा असह्य ताप पडलेला होता. फलाच्या भारानें असंख्य आम्रवृक्ष लवलेलें होते. चोंहोकडे निस्तब्धता पसरलीं होती आणि राजमार्गावर चिटपांखरूंही नव्हतें. पक्ष्यांनीं सुद्धां अगदीं मौनव्रत स्वीकारलेलें होतें. अशा वेळीं गंगेच्या कांठीं असलेल्या पद्मपूर नांवाच्या एका गांवांत एक तरुण पुरुष हातांत एक बांबूची कांठी घेऊन घराबाहेर पडला. तो तरुण रंगानें गौरवर्ण व स्वरूपवान होता. त्याचें वय पंचवीस वर्षांहून कांहीं अधिक नव्हतें. त्याच्या गळ्यांत जानवें असल्यामुळें तो ब्राह्मण असावासें दिसें. त्याच्या घरावर गवताचें छप्पर होतें. आणि चारी बाजूंना शेणानें सारविलेल्या मातीच्या भिंती होत्या, गृहाच्या भोंवती सुंदर सुगंधी फुलांचा बाग होता, त्या बागेच्या चारी बाजूंना बांबूच्या कांठ्यांचें कुंपण होतें आणि त्या कुंपणाला लागूनच ताड व माडाचीं झाडें होतीं.

तरुण घराच्या बाहेर आंगणांत येऊन उभा राहिला, इतक्यांत घरांतून कोणीतरी म्हटलें, " एवढ्या दुपारचे तुम्ही चाललांत तरी कोठें ?"

तरुण रागारागानें परतला व घरांत प्रवेश करून शयनगृहाच्या दारावर उभा राहून म्हणाला, " कां, फारशी चौकशी ? "

इतक्यांत त्याच्या मागें कोणाचीशीं पावलें ऐकूं आली. युवक मागें वळून पहातों तों एक वीस वर्षांची तरुणी घरांतून बाहेर येऊन त्याच्या पुढ्यांत उभी राहिली. तिच्या ओष्ठद्वयांवर मधुरस्मित झळकत होतें. कटाक्षपात करीत असतांना दोन्ही डोळ्यांतून मनोहर तेज फांकत होतें आणि डाळिंबाच्या दाण्यांसारखी तिची दंतावली मुखकमलांत शोभत होती. तिला पहातांच तरूणाचा राग मावळला आणि त्याच्या मुखावर

प्रसन्नतेची छटा दिसूं लागली. रागाऐवजी मंद हास्य करीत तरुणानें विचारलें, " कां, कशासाठीं मला बोलावलेत ? "

तरुणीनें हंसत हंसत उत्तर दिलें, " अशा दुपारच्या वेळीं प्रखर उन्हाच्या तापांतून ही बांबूची कांठी घेऊन चाललांत तरी कोठें ? "

" मी तुझ्यासाठींच जात आहे."

" काय माझ्यासाठी ?"

" होय प्रिये, तुझ्यासाठींच ! "

" मी का झाडाचे फळ आहे, म्हणून तें पाडण्यास ही बांबूची काठी घेतली आहे बरोबर ? "

" होय कमलदेवी, तूंही झाडावरचे एक परिपक्व फळ आहेस."

" ठीक, पण ही काठीं घेऊन कुठें जात होता ? आंबे पाडण्यासाठीं ?"

" आधीं मी काय म्हणतों तें तरी नीट ऐकून घेशील कीं नाहीं ? खरोखर, पूर्ण यौवन भारानें तूं अगदीं लवलेली दिसतेस. "

" इश्श, भलतेंच कांहीं तरी ! तुम्हांला वेड नाहींना लागलें ? अशा भयंकर उन्हांतून कुणी आंबे पाडायला जातें ? "

" नदीच्या कांठच्या आम्रवृक्षावर दोन आंबे चांगले पिकले आहेत, ते जर मी आज आणणार नाहीं तर जमिनीवर पडून खराब होतील. "

" परंतु ते आणायला तुम्हांला या वेळीं जातां यावयाचें नाहीं. "

इतकें म्हणून युवतीनें युवकाचा हात धरून त्यांस बळेंच बसविलें. युवक कांठीं हातांतच घेऊन खालीं बसला. थोडचा वेळानंतर युवतीचें मुखकमल आरक्त दिसूं लागलें. अधोवदन करून ती म्हणाली, " अशा रीतीनें टक लावून काय असें पहाता माझ्याकडे ? "

" तुला पहातों आहे मी ! "

" भलतेंच ! असं कां पहात असतं कोणी ?"

" मी तर जात होतों, परंतु तूंच मला बळें धरून ठेविलेंस."

" नाहीं, मी यावेळीं जाऊं द्यायची नाही; माझ्याजवळ बसून रहावें लागेल. "

" तर काय मी डोळे मिटूनच राहूं म्हणतेस ? "

" इतका वेळ पाहात राहूनसुद्धां तुमची तृप्ती नाहीं कां झाली ? "

" तृप्ती कशाची ? "

" तर मग असं करा, मनाची पूर्ण तृप्तीं होईपर्यंत पहातच रहा झाले ! "

इतकें म्हणून युवतीनें तोंडावरचा बुरखा साफ काढून टाकला व तीं खालीं मान घालून मुकाट्यानें त्याच्या समोर बसली. तरुण तृषार्त चातकाप्रमाणें तिच्याकडें पाहातच राहिला.

अशा स्थितींत कांहीं काळ लोटल्यावर तरुणीला खुदकन् हंसूं लोटले. प्रथम मान, नंतर गाल व नंतर सर्व वदनमंडळ आरक्त छटेनें रंगून गेलें. तरुणीनें पुन्हां म्हटले, " जा आतां तुम्ही ! "

तेव्हां युवक तिच्या तोंडाजवळ आपलें तोंड नेऊन म्हणाला, " आतां मी जाऊं ना ?"

त्याचे दोन्ही हात धरून युवती म्हणाली, " नको. "

तेव्हां तरुणानें विचारलें, " विमल ! तुला काय सांगावयाचें आहे तें आतां स्पष्टच सांग ना ?"

" मी आज दादांच्या घरीं गेलें होतें !"

" फार उत्तम ! तिकडे सर्व क्षेम आहेना ?"

" होय. "

" ठीक, तर मग मी आतां जाऊं ना ? विमल ! मला या वेळीं अर्ध्या तासासाठीं बाहेर जाण्यास परवानगी दे. वाऱ्यानें तें पिकलेले आंबे गळून पडतील एखादें वेळेस !"

" तर मग तुम्ही तुमच्या आंब्याकडेच जा ! कारण तुमचा सारा जीव तिकडेच गुंतलेला आहे. आमची आहे कोणाला इथं पर्वा ?"

" तर मग मी जात नाहीं झाले !"

" नको, नको. खुशाल जा बरं ! नदीच्या किनाऱ्याकडे तर तुमचें सारं मन लागलेलं आहे. मग शरीराला बळंच इथं ठेऊन घेण्यांत काय फायदा ?"

" विमल ! तुझ्या मनांत काय आहे तें स्पष्ट सांगेनास एकदांचं ? "

" एक गोष्ट सांगावयाची आहे. ",

" तें तर मी केव्हांच ओळखून चुकलों आहे. कीं, तुझ्या मनांत कांहीं तरी सांगायचं आहे. सांग पाहूं काय तें ?"

" पण इकडे राग तर नाहीं ना येणार ?"

" तुझ्यावर रागावण्याची माझ्यांत शक्ति आहे कां ?"

" मग मला अभिवचन देतां कां ?"

" कसलें ?"

" जर ऐकाल तर सांगतें "

" माझ्यानें शक्य झाल्यास तें मी पुरे करीन. "

" तुम्ही नदीकांठीं जा आपले, मला कांहीं सांगायचं नाहीं. "

" ठीक. मी वचन देतो, मग वर झालें. "

" खरं ना पण हें ?"

" तुझ्या गळ्याची शपथ. "

" घ्या बरें तीनदां शपथ. "

" तुझ्याच गळ्याची शपथ--तुझ्याच गळ्याची शपथ--तुझ्याच गळ्याची शपथ. "

मग माझ्या गळ्याला लावतां हात ?"

" शपथ घेतली ना ? मग हात लावण्याची काय जरूर ?"

" नक्की वचन पाळाल ना ?"

" हो. नक्की पाळीन. "

" माझे बंधु गौडांतून आलेले आहेत. "

" बरें मग ?"

" त्यांनीं वहिनीसाठीं दोन सुवर्णकंकणें आणिलीं आहेत. "

" हं ! "

" आतां मी नाहीं कांहीं बोलत. "

दीर्घ निश्वास सोडून तरुण म्हणाला, " विमल ! मी दरिद्री आहे. आणि तुझा भाऊ देशविख्यात पंडित आहे. "

" आणि माझे पती मर्ख का आहेत ?"

" मूर्ख नव्हे, परंतु–"

" परंतु काय ? माझे बाबा म्हणत कीं, न्यायशास्त्रांत तुमच्यासारखे पंडित फार विरळा. "

" होय. तें खरें ! पण काय सांगू विमल ! तुझ्या सौंदर्यावर मुग्ध होऊन मी साऱ्या विद्येवर पाणी सोडलें आहे. गौतम आणि कणाद विसरून गेलों आहे. विमल ! मी जर मनांत आणीन तर पुष्कळ द्रव्य संपादन करूं शकेन. पण..."

" पण ?"

" विमल ! तूं माझ्या हातांपायांतील सुवर्णश्रृंखला आहेस. ती श्रृंखला माझ्यानें तोडवत नाहीं. या बंधनयुक्त स्थितींतून मी मुक्त होऊं इच्छित नाहीं. "

" तुम्हीं आतांच शपथ घेतली आहे ना ? मलाहि तसलींच सुवर्ण-कंकणें हवीत. "

" शपथ घेतली ही गोष्ट खरी. पण–"

" पण काय ?"

" विमल ! थोडा वेळ तूं थांब. मी हा आलोंच. "

इतकें म्हणून तरुण हातांत बांबूची काठीं घेऊन घराबाहेर पडला आणि ती तरुणी आनंदित होऊन गृहकृत्यास लागली.

विद्याधर भट्टाचार्य न्यायशास्त्रांत कुशल पंडित होते. काशींत पुष्कळ वर्षे विद्याभ्यास करून त्यांनीं न्यायशास्त्रांत पारंगतता प्राप्त करून घेतली होती.

पद्मपुरचे सुप्रसिद्ध पंडित भवानीशंकर आचार्य यांनीं उच्चकुलोत्पन्न तीक्ष्ण, बुद्धिशाली पंडित विद्याधर यांना आपली कन्या अर्पण करून त्याच गावीं ठेवून घेतलें होतें. पदुवम्बाचे राजे जयवर्धन यांनीं त्याला थोडी जमीन दान दिलीं होतीं. त्या जमिनीच्या उत्पन्नांतून विद्याधर आपला निर्वाह चालवीत असें.

द्रव्य संपादन करण्याचा आणखी कांहीं मार्ग त्यानें धरला नव्हता. विमलादेवीनें मागितलेलीं सुवर्णाचीं दोन कंकणें देण्याची त्याच्यांत आज

ऐपत नव्हती. ब्राह्मण हळूहळू नदीकांठीं जाऊन पोहोंचला आणि झाडा-वरचें दोन पिकलले आंबे पाडून तें घेऊन पुनः घरीं यावयास निघाला.

प्रिय पत्नीनें मागितलेलीं सुवर्णकंकणें कोठून व कशीं आणावीं, या गूढ विचारांत तो निमग्न झाला होता. विचाराच्या तंद्रींत असल्यामुळें तो घरचा रस्ता चुकून भलत्याच दिशेनें चालला.

त्या दिवशीं पद्मपूर गांवांच्या सीमेवर एक लहानशा सैन्यानें तळ ठोकला होता. गंगेच्या कांठीं आम्रवृक्षांच्या छायेंत तंबूजवळ कित्येक सैनिक बसलें होतें. त्यांचा मोठमोठ्यानें चाललेला संवाद व उच्च ध्वनि कानीं पडतांच विद्याधर कांहींसा भानावर आला.

तंद्री भंग पावतांच आपण भलत्याच मार्गानें चाललों आहोंत हें विद्याधराच्या लक्षांत आलें. तंबू आणि सैनिक पाहून त्याला मोठा अचंबा वाटला. एका सैनिकाला त्यानें विचारलें, " तुम्ही कोठें जात आहां ?"

सैनिकानें उत्तर दिलें, " कान्यकुब्जांत. "

हें ऐकून गौडेश्वर वचनपूर्तीसाठीं कान्यकुब्जांत युद्धासाठीं गेलेलें आहेत या गोष्टीचें विद्याधरास स्मरण झालें. त्यांच्याच सैन्यांतील हें लोक असतील असे समजून विद्याधर हळूहळू आपल्या घरीं परत आला.

संध्याकाळचा सुमार असल्यामुळें विमलादेवी गृहकृत्यांत अगदीं गढून गेलीं होतीं. विद्याधरानें घरांत प्रवेश करतांच हांक मारून म्हटलें,

" विमल ! कुठें आहेस तूं ?"

हास्ययुक्तवदनानें विमलदेवीने उत्तर दिलें, " स्वयंपाकगृहांत. "

" इकडे ये पाहूं !"

पत्नी पतीच्या पुढ्यांत येऊन उभी राहिली. विद्याधरानें म्हटलें,

" विमल ! आज तुला माझें एक वचन पाळलें पाहिजे. "

" कोणतें तें ?"

" विमल ! तूं सुवर्णकंकणाची गोष्ट विसरून जा. मी दरिद्री असल्यामुळे तुझी कंकणें आणावयासाठीं मला गांव सोडून कुठें तरी दूर गेलें पाहिजे. मला तुझा वियोग होणार, आणि विमल ! त्यामुळें माझ्या जिवाला भारी कष्ट होतील. तुला मी सोडून जाऊं शकणार नाहीं. शिप-

त्यांचीं कंकणेंच तुझ्या हातांत जशी शोभतात तशी हिरे, माणिक किंवा मोतीं यांचीं कंकणें तुला शोभावयाची नाहींत. म्हणून माझें तुला विनंतीपूर्वक सांगणें आहे कीं, तूं मला शपथेंतून मुक्त कर. हें पहा, मी तुझ्यासाठीं दोन पिकलेले आंबे घेऊन आलों आहें."

विद्याधराच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच विमलदेवीचें हास्ययुक्त वदन एकाएकीं म्लान झालें. तिनें तें दोन्हीं आंबे हातांत घेतले खरे, परंतु लगेच घराच्या कोंपऱ्यांत फेंकून दिले आणि कांहीं न बोलतां मुकाट्यानें ती स्वयंपाकगृहांत निघून गेली. विद्याधर कांहीं काळपर्यंत चित्रासारखा तटस्थ उभा राहिला. त्यानंतर त्यानें पुनः हांक मारली, " विमल ! "

तरी पण प्रश्नाला कांहीं उत्तर मिळालें नाहीं.

तेव्हां विद्याधर घरांतून बाहेर पडला आणि मंद पावलांनीं गंगेच्या कांठीं असलेल्या छावणीकडे निघाला.

## २९

गुर्जरराजाकडून दूत आल्यानंतर धर्मपाळदेवांनीं गौडाकडे प्रयाण केलें. भीष्मदेव आणि विश्वेश्वरानंद यांच्या मनांत नसतांहि त्यांनाहि बरोबर परतावें लागलें गौडेश्वर सैन्यासह प्रतिष्ठानच्या दिशेनें यावयास निघाले. अर्ध्या वाटेवर आल्यावर एकें दिवशीं संध्याकाळीं तळ देण्यांत आला. चोंहीकडे लहानमोठे तंबू, राहुट्या वगैरे उभारण्यांत आल्या. त्यांच्या मधोमध अनेक सुवर्ण कळसांनीं सुशोभित असा एक भव्य तंबू उभारला गेला. तो गौडाधिपती धर्मपाळदेवांचा तंबू होता. सायंकाळच्या सुमारास धर्मपाळदेव सर्व सामंतांसह तंबूबाहेर बसले होते आणि आसपास चोंहीकडे गौडीय सैनिक स्वयंपाक करण्यांत गुंतले होते. गंगेच्या काठीं एक गांवापर्यंत पसरलेली ती सेना रात्रीचें भोजन उरकून स्वस्थपणें निद्रासुख अनुभवूं लागली. अशा वेळी छावणीच्या पश्चिम बाजूस असलेल्या पहारेकऱ्यानें घोड्यांच्या टापांचा आवाज दुरून ऐकला. सावध होऊन

पहारेकरी त्या बाजूलां पहातो तो एक घोडेस्वार विद्युत्वेगानें त्याच्या-पाशीं येऊन पोहोंचला. तेथें येतांच स्वारानें चट्कन् घोडयावरून खालीं उडी घेतली न घेतली तोंच त्याच्या घोडयानें धाडकन् जमिनीवर अंग टाकले. धांपा टाकीत त्या घोडेस्वारानें विचारले, " महाराज कोठें आहेत ? "

विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर न देतां पहारेकरी म्हणाला, " आपण कोण ? कोठून आलांत ? "

स्वार अधीरतेनें म्हणाला, " मी कान्यकुब्जाचा राजदूत आहे. एक भयंकर संकट आलेलें आहे. मला जलदी सम्राटांपाशी घेऊन चला."

पहारेकऱ्यांपैकीं एक जण लगेच त्यास घेऊन सम्राटांच्या तंबूपाशीं आला. येतांना वाटेंत त्यानें दूतांना प्रश्न केला, " काय विशेष समाचार?"

" समाचार फार महत्त्वाचा आणि जरूरीचा आहे. गुर्जर सेनेने तीन दिशांकडून कान्यकुब्जावर चढाई केलेली आहे. आमचें सैन्य आस्ते आस्ते मागें हटत आहे. म्हणून चक्रायुध महाराजांनीं हें वृत्त गौडाधिपतीं-च्या कानांवर घालण्यासाठीं मला पाठविलेलें आहे."

सम्राटांच्या तंबूच्या समोर बसल्या बसल्या भीष्मदेव आणि प्रमथ-सिंह भावी गुर्जर युद्धाबाबत चर्चा करीत होते भीष्मदेव म्हणत होता, " आपण परत जावयास निघालों आहोंत खरे, पण सैन्याला गौडापासून यमुनेच्या तटापर्यंत शेंकडो मुशाफरी कराव्या लागणारसें दिसतें."

" पुनः खरोखरीच का युद्ध झुंपणार !"

" होयः पुनः युद्ध करावें लागणार हें निश्चित ! आपण गौडाला जाऊन पोहोंचतों न पोहोंचतों तो गुर्जरराज खास कान्यकुब्जावर स्वारी करणार."

" तर मग आपण महाराजांना स्वदेशी कां म्हणून परत जाऊं देतां?"

" इतक्यांतच परत फिरावयाची माझी इच्छा नव्हती. स्वामी विश्वे-श्वरानंद आणि मी मिळून त्यांना भारी आग्रह केला, पण त्यांनीं मनावर घेतलें नाहीं. आणखी जर विशेष आग्रह मीं केला असता, तर गौडीय सेनेंत असंतोष पसरला असता. शिवाय दुसरेंहि एक कारण असावें असें माझ्या मनास वाटतें. ते मी आपणांस मागाहू सांगेन. "

जयवर्धन हा वेळपर्यंत रणसिंह व धर्मपाळदेव यांच्याबरोबर बुद्धि-बळें खेळत बसला होता. तो एकाएकीं मध्येंच म्हणाला,–

" भीष्मदेव ! या घटकेला जरी गुर्जरसेना चालून आली, तरी गौड देशास मागे परतण्याचा महाराजांनीं निश्चय केलेला आहे. महाराजांचा विवाह झाल्याशिवाय ते आतां युद्ध करणार नाहींत, हें नाहीं का आपल्या लक्षांत येत ?"

धर्मपाळदेवांनीं लज्जेनें मान खालीं घातली. भीष्मदेव मंदहास्य करून म्हणाला, " पाहिलेंत प्रमथसिंह ! हे वरेंद्रराज किती दुष्ट स्वभा-वाचें आहेत ते ! "

बिलकूल वाईट वाटून न घेतां जयवर्धन म्हणाला, " प्रमथसिंह ! मी खोटें नाही सांगत हें ! सम्राटांनीं कान्यकुब्जांत प्रवेश करतानांच मला सांगितले होतें कीं, परत मागें फिरतांना आपणांला राढदेशांतील कित्येक स्थलांचें दर्शन घ्यावयाचें आहे. त्या वेळीं मी त्यांना म्हणालों कीं, महा-राज, फक्त गोकर्णाचेच दर्शन घेतल्यानें इतर सर्व तीर्थाचें दर्शन घेतल्याचे फळ मिळणार आहे. कां, मी म्हणतो तें खरें ना ? महाराजांनींसुद्धां त्या-वेळीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. तेव्हांच मी खुणगांठ बांधलीं कीं, गौडे-श्वरांच्या अन्तःपुरांत आतां लौकरच महादेवी कल्याणीचें आगमन व्हाव-याचें आहे. "

सम्राट् लज्जित होऊन तंबूच्या आंत निघून गेलें. इतक्यांत तंबूच्या पश्चिम बाजूनें राजदूताला घेऊन पहारेकरी त्या ठिकाणीं आला. दूताला पाहतांच आश्चर्यचकित होऊन भीष्मदेव म्हणाला, " तुम्ही कोण ?"

अभिवादन करून दूत म्हणाला, " प्रभु ! मी कान्यकुब्जाचे महा-राज चक्रायुध यांजकडून निरोप घेऊन गौडाधिपतींकडे आलों आहे, भयंकर विपत्ति आली आहे. भोज, मत्स्य, मद्र, कुरू, यदु, यवन, अवन्ति, गांधार आणि कीर देशच्या गुर्जर सामंतांनीं नागभट्टाच्या आज्ञेनें युद्धाची आगाऊ सूचना न देतां कान्यकुब्जावर चाल केलेलीं आहे. एकाच वेळीं शेंकडों जागीं गुर्जर सामंतांनीं यमुनेच्या तटावर आक्रमण करून आमच्या सैन्यास मागें हटविलेलें आहे.

महाराज पश्चिम आणि दक्षिण प्रांतांतील सैन्य गोळा करून कान्य-कुब्जाकडे येत आहेत. त्यांनींच मला गौडाधीपतींकडे जाऊन असें सांगण्यास फर्माविले आहे कीं, सम्राटांनीं गौडाकडे जाणें रहित करून कृपा करून माझ्या साह्यार्थ लगेच यावें. "

दूताच्या तोंडचें हें शब्द ऐकतांच भीष्मदेह एकदम ताडकन् उभा राहिला. तें पाहून सगळे सामंतही लगेच उभे राहिले. प्रमथसिंहानें तंबूच्या द्वारांत उभे राहून उच्च स्वरानें हांक मारली, " महाराज ! लौकर बाहेर या. "

धर्मपाळदेव लगेच तंबूच्या बाहेर आले. भीष्मदेव आणि प्रमथसिंह त्यांना उद्देशून म्हणाले,–

" महाराज ! चक्रायुद्धांकडून दूत आलेला आहे. युद्धास पुन: तोंड लागलेलें आहे. गुर्जर सामंतांनीं युद्धास आगाऊ सूचना शिल्याशिवाय कान्य-कुब्जावर आक्रमण केलें आहे. "

त्यांच्या तोंडचे हें शब्द ऐकतांच धर्मपाळदेवाचें तोंड खरकन् उतरलें. तें कांहीं वेळपर्यंत मौज धारण करून म्हणाले,–

" फार उत्तम, तात भीष्मदेव ! आपलंच म्हणणें शेवटीं खरें ठरलें. गौडीव सामंतांना गौडाकडे मार्गे फिरकण्यास अद्यापि बराच काळ दिसतो; तुम्ही सर्व आतां तयारीस लागा. उद्यां प्रभातीं आपणांस कान्यकुब्जाकड कूच केलें पाहिजे. "

भीष्मदेव म्हणालें, " महाराज ! कान्यकुब्जाला पुन: जावयास निघण्यापूर्वी बरीचशीं अगत्याचीं कामें अगोदर उरकलीं पाहिजेत. उद्धवघोष अद्यापि प्रतिष्ठात दुर्गीतच आहे. त्याला या युद्धाची खबर पाठवली पाहिजे. आणि गौडांत महाकुमार वाक्पाळ यांच्याकडे दूत पाठवून नवीन सैन्याची मदत मागविली पाहिजे. "

प्रमथसिंह म्हणाला, " कौशांबीपासून स्थानेश्वरापर्यंतच्या विशाल सीमेवर युद्धाला आतां सुरुवात होणार आहे. म्हणून गौडीयसेनेचें निर-निराळे विभाग केल्यास कसें ?"

भीष्मदेवानें उत्तर दिलें, " प्रमथसिंह, तुम्ही अजून बालक आहांत,

तुम्हांला गुर्जर सामंतांची रणनीति माहीत नाहीं. तुम्ही अजून म्हणतां त्याप्रमाणें गुर्जर युद्ध सीमेवर होणार नाही. एखाद्यास्थळीं आपली छावणी पडलेली दिसली, म्हणजे टोळधाडीप्रमाणें गुर्जरसेना आपल्याला घेरा घाल-ण्याचा प्रयत्न करील. त्या घेऱ्यांतून फळी फोडून आपणांस निसटतां आलें तरच आपण सुरक्षित परत स्वदेशी जाऊन पोहोंचूं. नाहीं तर हजारों गौडीय सैनिकांतून एकही जिवंत उरणार नाहीं. "

धर्मपाळ म्हणाले, " तात ! कान्यकुब्जाहून आलेल्या दूताला परत पाठवावें काय ? "

" महाराज ! त्याला परत पाठविण्याची कांहीं एक जरूरी नाहीं कारण तसें केल्यास गुर्जर सामंतांना गुप्तहेरांच्या तोंडून आपल्या पुनरा-गमनाची गोष्ट समजेल."

" आपण म्हणतां तें खरें आहे. दूता ! तूं आतां विश्रांति घे. उद्यां प्रभाती आपण सर्व कान्यकुब्जास प्रयाण करूं."

रात्रीच्या प्रथम प्रहरी सम्राटाच्या तंबूसन्मुख उभें राहून जयवर्धनानें कमलसिंहास म्हटलें, " कमलसिंह ! आपल्या भगिनीच्या लग्नाला अजूनहि विलंब लागणार हें आपण पहातच आहां; धर्मपाळदेवांनीं कितीहि घाई केली तरी विधात्याच्याच्या इच्छेपुढें कोण काय करणार ? "

म्लान वदनानें कमलसिंह म्हणाला, " जयवर्धन ! कल्याणी अगदीं अभागिनी आहे. महाराजांची तिच्यावर अत्यंत प्रीति आहे. उद्धवघोषांच्या तोंडून मीं ऐकले आहे कीं, कल्याणीनेंही महाराजांना तनुमनानें केव्हांच वरलेलें आहे."

" महाराजांचें मन गोकर्णांत कल्याणीनें कधींच हिरावून घेतलेलें आहे यांत तिळमात्र शंका नाहीं. आपण जेव्हां गोकर्ण क्षेत्राच्या दर्शना-विषयीं गोष्ट काढली, तेव्हां महाराजांचें मुख आरक्त झालेलें आपण पाहिलें होतें ना ?"

" होय, तो प्रकार माझ्या नीट लक्षांत आहे."

" प्रेमाचें एक दुसरें लक्षण आपण पाहिलेंत काय ? "

" कोणतें ? "

" आपण आधळें आहांत वाटतें ? कान्यकुब्जाचा दूत ज्यावेळीं महाराजांच्या तंबूत आला, तेव्हां भीष्मदेव आणि प्रमथसिंहाच्या तोंडून गुर्जर-युद्धाची बातमी समजतांच महाराजांचें तोंड कसें उतरलें तें पाहिलें नाहीं. वाटतें ? "

" नाहीं, त्या वेळीं तिकडे माझें लक्ष गेले नव्हतें."

" मीलनांत विघ्न आलेलें पाहून विरही महाराजांचे मन अस्वस्थ होणार नाहीं तर काय ? "

## ३०

सायंकाळ उलटून गेली तरी विद्याधर घरीं परत आला नाहीं. तेव्हां विमलादेवी अत्यंत चिंताक्रांत झाली. घरी येण्यास विद्याधर इतका विलंब केव्हांहि लावीत नसे. तो बाहेर कधीं कोठें गेला तरी वारंवार येऊन विमलादेवीचें दर्शन घेत असे. तोच विद्याधर रात्रीचा एक प्रहर उलटून गेला तरी घरी परत न आल्याकारणानें विमलादेवी हातांत दिवटी घेऊन त्याच्या शोधार्थ बाहेर पडली. विमलादेवी एकटीच पतीच्या समवयस्क मित्रांच्या घरोघरीं फिरून शेवटीं निराश होऊन भावाच्या घरीं येऊन पोहों-चली. अशा भयंकर अंधाऱ्या रात्रीं हातांत दिवा घेऊन विमलादेवी एकटीच दारावर आलेली पाहून तिच्या भावजयीस अत्यंत नवल वाटलें. विमलेचा भाऊ यावेळीं झोंपला होता. तो एकाएकीं उठून बाहेर आला. दुसरी सुद्धां कुटुंबांतील माणसें बिछान्यावरून उठून बाहेर आली. संध्याकाळनंतर विद्याधर कोणाच्याही दृष्टीस पडला नव्हता. ती सारी रात्र गांवांत विद्याधराचा शोध करण्यांत गेली, परंतु कसलाच पत्ता लागला नाहीं. विमला शेवटीं आपल्या घराला कुलप ठोकून रुदन करीत भावाकडे माहेरीं येऊन राहिली.

कित्येक दिवसानंतर विमलादेवीच्या भावास–त्रिलोकशंकरास राज–धानीस येण्याविषयीं बोलावणें आलें. त्याचा पिता भवानीशंकर आचार्य न्यायशास्त्रांत निपुण होता. त्याला गौडाधिपतींचा मुख्य प्रधान गर्गदेव यानें

पुष्कळ आग्रह केला असतांही तो राजधानींत येऊन राहिला नव्हता. भवानीशंकर आचार्यांच्या मृत्युनंतर प्रधान गर्गदेवानें त्रिलोकशंकराला मोठ्या आग्रहानें राजधानीला बोलावून आणलें. त्याच्या विद्वत्तेमुळें गर्गदेवांची थोड्याच दिवसांत त्याच्यावर भारी मर्जी बसली. महाराज गोपाळदेवांच्या कारकीर्दीत नवीन साम्राज्याची स्थापना झाल्यामुळें योठमोठ्या अधिकाराच्या जागांत पुष्कळ उलथापालथ होऊन त्यांपैकीं अद्याप कांहीं रिकाम्या पडल्या होत्या.

त्यांपैकीं एखादी जागा त्रिलोकशंकरास द्यावी, अशी गर्गदेव पुष्कळ दिवसांपासून खटपट करीत होता. त्याची प्रथम अशी इच्छा होती कीं, मूर्ख शिवशंकरशर्म्याऐवजीं त्रिलोकशंकराला राजपुरोहित म्हणून नेमावें; परंतु राणी देद्धदेवी जुन्या कुलपुरोहिताला काढण्यास कोणत्याहि प्रकारे कबुली देईना. तेव्हां गर्गदेवाला आपली इच्छा एकीकडे गुंडाळून ठेवावी लागली. परंतु लवकरच राज्यांत चांगल्या पगाराची दुसरी एक जागा रिकामी झाल्यामुळें गर्गदेवानें त्रिलोकशंकराला राजधानींत बोलावून घेतलें.

मुख्य प्रधानाच्या आग्रहानें त्रिलोकशंकरानें ती जागा स्वीकारली व तो सहपरिवार गौडराजधानींत येऊन राहिला.

अभागिनी विमलसुद्धां सासर व पितृगृह सोडून त्याजबरोबर राजधानींत येऊन राहिली. चतुर, सद्‌गुणी, व्यवहारकुशल आणि मेहनती आचार्यपुत्र त्रिलोकशंकर हळूहळू वाढत राज्यांतील एक प्रमुख कर्मचारी बनला.

कित्येक दिवसांनंतर गर्गदेवानें त्याला वर्धमानभुक्तीचा न्यायाधीश नेमून राढ देशांत पाठविलें. पंडित त्रिलोकशंकर राढ देशांत आल्यावर ढेकरीय नगरांत राहूं लागला. विमलादेवीसुद्धां भावाबरोबर राढ देशांत आली.

कान्यकुब्जाहून धर्मपाळदेवाच्या विजयाचा समाचार गौडास जाऊन पोहोंचला. गौडाहून दुसरें नवीन सैन्य कान्यकुब्जाकडे रवाना झाले होते. राढ देशाहून जे लोक कान्यकुब्जास जावयास निघाले होते, त्यांना विद्याधराचा शोध करण्याविषयीं त्रिलोकशंकराने सांगून ठेविलें होते; तरी पण

विद्याधराचा कोठेंहि पत्ता लागला नाहीं. कांहीं काळ लोटल्यावर अशी बातमी समजली कीं, सर्व गुर्जर सामंतांनीं एकत्र होऊन कान्यकुब्ज देशावर स्वारी केली आहे.

गुर्जर युद्धांत जास्त सैन्याची आवश्यकता असल्यामुळें गौडांत नवीन सैन्यभरती जोरानें सुरू होती आणि थोड्याच मुदतींत महाकुमार वाक्पाळ त्या सैन्यासह कान्यकुब्जास जावयास निघाले होतें. हें ऐकून त्रिलोकशंकरानें मध्यदेशांत विद्याधराचा शोध करण्यासाठीं महाकुमार वाक्पाळ यांस विनंति करावी असें अमात्य गर्गदेवाला पत्र लिहिलें. प्रधान गर्गदेवाच्या आग्रहामुळें वाक्पाळानें विद्याधराचा शोध करण्याची कबुली दिली. वर्षाऋतु संपतांच वाक्पालाने सैन्यासह कान्यकुब्जाकडे प्रयाण केलें.

एकें दिवशीं संध्याकाळीं ढेकरीय नगरांत एका अट्टालिकेच्या सन्मुख बसून मलीन वस्त्रें धारण केलेलीं एक युवती वासुदेव भगवानाच्या सायंपूजेची तयारी करीत होती. त्या घराच्या ओटयावर बसून दुसरी एक स्त्री मुलाला मांडीवर घेऊन पहिलीबरोबर बोलत बसली होती. ती म्हणाली--

" वन्सं, इतक्या दासदासी असतां तुम्हीं हीं सारीं कामें करून शरीराल व्यर्थ शीण कां देतां ?"

समईत तुपाचीं वात सारीत पहिली म्हणाली,--

" काय सांगूं वहिनी ! कामकाजांत मन न घालतां अशीच स्वस्थ बसून राहिलें, तर मला वाटतें लवकरच मला वेड लागेल. इतकें दिवस वियोगांत काढले ते स्वस्थ बसून विचार करण्यांत घालेविले असते तर कधींच मी वेडी झालें असते. "

" असं भलतंच डोक्यांत कधीं आणूं नये. जाणार कोठें तें ? त्यांचं सारं मन इकडंच गुंतलेलं आहे. येतील कांहीं दिपसांनीं परत. "

" खरंच कां ग परत येतील वहिनी ? पहातां पहातां एक वर्ष लोटलं. माझ्याशिवाय जे घडीभरसुद्धां राहूं शकत नव्हते, ते वर्षभर कसें राहिले असतील बरें ? क्षणभर मी दृष्टिआड झालें कीं, त्यांचें चित्त थाऱ्यावर नसे. अजून तें या जगांत हयात असतील का ? नाहीं, नाही हें शक्य नाहीं. जर तें असतें तर इतक्या दिवसांत जरूर परत येतें. वहिनी !

मला सोडून ते परदेशांत राहूं शकणार नाहींत. या हतभागिनीसाठीं ती क्षुद्र पर्णकुटीसुद्धां त्यांना प्रिय वाटे. इतकें दिवस तें कसा बरे माझा वियोग सहन करीत असतील ? मला वाटतें तें नक्की या दुनियेंत नसावेंत. उगाच तुम्ही मला खोटी आशा दाखविता झालं. जर तें जिवंत असतें, तर एखादें दिवशीं तरी पर्णकुटिकेच्या दारावर येऊन 'विमला' अशी हांक मारली असती. हे दीनदयाळा प्रभु ? कधीं बरें तें परत येतील ?"

बोलतां बोलतां त्या स्त्रीचा कंठ अगदीं भरून आला. दुसरीच्या डोळ्यांवाटेसुद्धां टपटपा आंसवें गळूं लागलीं. परंतु हळूंच ती आपल्या पदरानें पुसून ती म्हणाली—

"वन्सं, रडूं नका अशा. अशी अमंगळ कल्पना स्वप्नांतही आणूं नका. ते पुरूष आहेत आणि पुष्कळ दिवसांपासून घरीं रिकामे बसून होतें; म्हणून मला वाटतें, कीं द्रव्योपार्जन करण्यासाठीं तें परदेशांत गेलें असावेंत."

भावजयीच्या तोंडाचे हे शब्द ऐकतांच विमलदेवीला जुन्या गोष्टींची आठवण झाली. तिच्या नेत्रावाटे अश्रुधारा वाहूं लागल्या. ती स्फुंदत-स्फुंदत म्हणाली, "वहिनी, मी माझ्या हातानेंच कींहो स्वतःचा सत्यनाश करून घेतला ते कांहीं स्वेच्छापूर्वक परदेशीं गेलेले नाहींत. मींच चांडळ-णीनें त्यांना तसें करावयास भाग पाडले."

बोलतां बोलतां तिचा गळा अगदीं दाटून आला. विमलादेवीची भावजय नणंदेचें सांत्वन करण्याच्या उद्देशानें म्हणाली, "त्यांत तुमचा काय दोष वन्सं ?"

परंतु या शब्दाचा परिणाम विपरीत झाला. विमलादेवी अत्यंत व्याकुलचित्तानें म्हणाली, "बोलूं नका असें वहिनी, अगदीं बोलूं नका। माझ्या हातानेंच मी माझ्या पायांवर धोंडा मारून घेतलेला आहे. ते या हतभागिनीला सोडून जावयाला इच्छीत नव्हते. मीच त्यांना घरांतून काढून लावण्यास कारणीभूत झालें. त्या वेळीं पतिदेवाची मला खरी ओळख नव्हती, त्यांची योग्यता मी जाणत नव्हतें. म्हणूनच माझा असा सर्वस्वी नाश झाला. मीं चांडाळणीनें जाणूनबुजून त्यांना दूर लोटलें. त्या पापाचें

प्रायश्चित आतां मी भोगीत आहे. माझी पतिदेवता आतां परत येईल का? आणि पर्णकुटीच्या दारावर उभी राहून 'विमला' अशी मला हांक मारील का? त्यांचे चंचलनेत्र घराच्या कोनाकोंपऱ्यांतून पुनः माझा शोध करतील काय?"

नणंद आणि भावजय दोघीहि अट्टालिकेच्या सन्मुख बसून नीरवतेनें अश्रुपात करूं लागल्या. विमलेचा चिमुकला भाचा पूजासाहित्य इकडेतिकडे उडविण्यांत दंग झाला. दोघींपैकीं कोणाच्याहि लक्ष्यांत हा प्रकार आला नाहीं. संध्याकाळ उलटून गेली आणि घरोघरीं दिवे लागले. ढेकरीय नगरांत प्रत्येक घरीं शंखघंटांचा मंगलध्वनि होऊं लागला. तेव्हां कोठें विमलादेवी शुद्धीवर आली. ती पदरानें डोळे पशीत अस्ताव्यस्त पडलेलें पूजेचें सामान पुनः गोळा करून पूजा करूं लागली. तक्यांत कोणाचासा कंटस्वर तिच्या कानांवर आला. तो ऐकतांच विमलेची भावजय उठून उभी राहिली तें पाहून दुरून कोणीसें म्हटलें, "विमल! घाबरूं नको मी आहे."

दीर्घ निश्वास टाकून विमलादेवी म्हणाली, "कोण दादा?"

उत्तर मिळालें, "होय, विमल!"

"आवाज ओळखतां न आल्यामुळें आम्हांला अंमळ भीतीच वाटली. बरें, पण यावयाला इतका उशीरसा लागला?"

"विमल! गौडाहून चिंताजनक बातमी आलेली आहे, तेव्हां त्या कामाचा निकाल लावीपर्यंत उशीर लागला."

"कसली चिंताजनक बातमी! तर काय ते या जगांत राहिलेले नाहींत?"

"छे, छे, विमल! तसें कांहीं नाहीं. आपलें नवीन सैन्य जाऊन पोहोंचण्यापूर्वींच महाराजाधिराजांचा गुर्जर सामंतांच्या हस्ते पराजय झालेला आहे; आणि शत्रूंनीं कान्यकुब्ज परत ताब्यांत घेतले आहे."

दीर्घनिश्वास सोडून विमलादेवी उद्गारली, "अर्रर्र!"

तिघेहि नंतर घरांत आली.

• •

## ३१

धर्मपाळदेव ससैन्य कान्यकुब्जाकडे मागें परतलें. दोन तीन दिवस प्रवास केल्यानंतर त्यांना गुर्जररणनीतीचा अनुभव येऊं लागला. ते जसजसे कान्यकुब्ज देशाकडे जाऊं लागले. तसतसा मार्गांतील प्रदेश उजाड झालेला त्यांना दिसून आला. शेंकडो गांवें आणि नगरें जळून खाक झाली होतीं. शेतांतील हातातोंडास आलेलीं पिकें हत्ती घोडयामुळें नासाडून गेलीं होतीं. दोन तीन दिवसांची मजल मारल्यावर तर सैन्यांतील हत्ती घोडयांसाठीं दाणावैरण मिळण्याची पंचाइत पडूं लागली. भीष्मदेव हें पाहून अत्यंत चिंताक्रांत झाला. गौडीयसेना हळूहळू पुढे सरकूं लागली. जयवर्धन, वचनपाळ, कमळसिंह आणि इतर सेनापती घोडेस्वारांसह नित्य प्रभातीं दूरवर अन्नसामुग्रीच्या शोधार्थ भटकूं लागलें. तेव्हां गुर्जर घोडेस्वारांनीं निर्दयतेनें ठिकठिकाणीं नागरिकांची कत्ताल केलेली असून गांवेंचीं-गांवें लुटून जाळून फस्त केलेली आहेत असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. गौडीयसेनेला जोंपर्यंत अन्नपाणी मिळत असे, तोंपर्यंत गुर्जरसेना त्यांच्या वाटेस बिलकुल जात नसे. पण जर का त्यांच्या हांतीं अन्नसामग्री लागली, तर गिधाडाप्रमाणें अचानक ती गौडीयसेनेवर छापे घाली.

त्यामुळें पुष्कळदां महत्प्रयासानें मिळविलेली अन्नसामुग्री तेथल्या तेथें टांकून गौडीयसेनेला पळ काढावा लागे. याप्रमाणें दिवसेंदिवस गौडीय सैन्यांतील घोडेस्वारांची संख्या कमी कमी होत चालली. अशा प्रकारच्या युद्धांत घोडेस्वारांची जास्त आवश्यकता होती, पायदळ सेना निरुपयोगी होती. कोणत्या दिवशीं अर्धपोटीं तर कोणत्या दिवशीं उपाशीं अशा प्रकारचें हाल सोशीत गौडाधिपति गौडीयसेनेसह दहाव्या दिवशीं कान्यकुब्ज नगरांत येऊन पोहोंचले. गुर्जर सैन्यानें त्यांस बिनहरकत नगरास प्रवेश करूं दिला.

चतुर सेनापती भीष्मदेवानें गंगेच्याकांठीं तळ देण्याचा प्रयत्न केला. परंतु लाखों गुर्जरसेनेनें त्यावर हल्ला करून त्याचा पराजय केला. तेव्हां भीष्मदेवानांही निरूपायानें नगरांत प्रवेश करावा लागला. आतां गुर्जर सेनेनें टोळधाडीप्रमाणें गौडीय फौजेला कान्यकुब्ज नगरांत चोहींकडून घेरलें.

नगरांत प्रवेश केल्यावर भीष्मदेव मोठ्या विचारांत पडला. गौडाहून कुमकेस येणारे नवीन सैन्य अद्यापि फार दूर होते. शेंकडों गांवच्या टापूंत शत्रूचें सैन्य सारखें पसरलेलें होतें. नगराच्या आंत पिण्याचें पाणी मुबलक होतें; पण अन्नसामुग्री अगदीं संपुष्टांत आलेलीं होतीं. तेव्हां नक्की आपला पराजय होणार ही गोष्ट धोरणी भीष्मदेवांच्या लक्षांत येऊन चुकली. त्यानें हीं गोष्ट सर्वांना नीट समजावून सांगितली व तो म्हणाला—

" जाणूनबुजुन युद्धाला कोणीही विन्मुख होतां कामा नये, परंतु निष्कारण आपलें बळ खर्चीही घालतां उपयोगाचें नाहीं. नगराच्या आंत हजारों सैनिक व लाखों नागरिक आहेत. त्यांना शिल्लक असलेली सामुग्री किती दिवस चालेल ?"

चक्रायुधानें उत्तर दिलें, " फार तर एक महिना. "

" आणि पुढें मग ? "

" पराजय किंवा मृत्यु ! "

" मृत्यूला कंवटळाण्यासाठींच योद्धे हातीं शस्त्र धारण करीत असतात. तेव्हां मरणाला ते केव्हांहि भिणार नाहींत. पराजय म्हणजे शुद्ध अपमान ! अर्धपोटीं राहून कैद्यांच्या अवस्थेंत नागरिक जास्त दिवस राहूं शकणार नाहींत. त्यांच्यांत भयंकर असंतोष माजेल. त्यामुळें आत्मरक्षणार्थ बाहेरचे व घरचे अशा दोन शत्रूंशींही झगडण्याचा आपणांवर प्रसंग येईल."

तेव्हां धर्मपाळदेवांनीं प्रश्न केला, " मग यालॆ उपाय ? "

" माझें तर मत असें आहे कीं, आपण कान्यकुब्जाचा त्याग करून मागें हटावें हें उत्तम ! नवीन सैन्यभरती करून मध्यदेश जिंकून घेण्यास फारसा अवधि लागणार नाहीं. तरी पण जिंकलेल्या भूमीचा युद्ध केल्याशिवाय त्याग करणें ही सुद्धां फार दुःखाची गोष्ट आहे.."

" भीष्मदेव ! युद्ध केल्याशिवाय कान्यकुब्जाचा त्याग करावयास मी बिलकूल तयार नाहीं. आपण जर युद्धांत पतन पावलों, तर गौडदेशाचें फारसें नुकसान होणार नाहीं; परंतु आपण जर मागें हटूं, तर आमच्या आजपर्यंतच्या धवल कीर्तीला अक्षयींचा काळिमा लागेल."

" पण महाराज ! यूद्धाचा रागरंग पाहून पिछेहाटीचे धोरण स्वीकारणें म्हणजे कांहीं पराजय पावणें नव्हे."

" नाहीं, तसें नव्हे भीष्मदेव ! नगरांत हजारों गौडीय सैनिक आहेत. त्यांतून जे मरावयास तयार असतील त्यांनींच येथें मजबरोबर रहावें. बाकीच्या सैनिकांना घेऊन आपण परत प्रतिष्ठानला जावें. तेथून नवीन सेनेची व अन्नसामुग्रीची जुळवाजुळव करून मग आपण आमच्या मदतीला यावें."

" महाराज ! माझ्यासारख्या वृद्धानें परत जावें व एकटया आपणाला शत्रूंनीं वेढलेल्या दुर्गांत सोडावें असें जें आपण म्हणतां तें रास्त होईल काय ?"

" भीष्मदेव ! हें माझें प्रथमचेंच युद्ध आहे. तेव्हां युद्ध केल्याशिवाय मी कधींहि मागें हटावयाचा नाहीं."

" महाराज ! शत्रूंनीं वेष्टिलेल्या दुर्गांत आपणांला सोडून मी कोणत्या तोंडानें परत स्वदेशीं जाऊं ?"

त्या स्थळीं प्रमुख गौड सामंत आणि सर्व सेनापती हजर होतें. तें कुतुहलवश होऊन स्तिमित नजरेनें दोघांकडेहि पहात होतें. क्षणभरानें जयवर्धन म्हणाला–

" जर तसें असेल तर कोणीहि मागें परतण्याचें कारण नाहीं."

मागून रणसिंह म्हणाला, " तसें कसें म्हणतां जयवर्धन ! शत्रूंनीं वेढलेल्या दुर्गात प्रतिदिवशीं आपल्या फौजेची नासाडी होत आहे. नवीन सैन्य आणि अन्नसामुग्रीसाठीं आपण मागें हटणेंच योग्य होईल."

तेव्हां भीष्मदेवानें उत्तर दिले, " तर मग तसें करूं या. किल्ल्यांत यावेळीं घोडेस्वारांची संख्या किती आहे ?"

वचनपाळ म्हणाला, " पंचवीस हजारांहून जास्त नाहीं."

भीष्मदेव म्हणाला, " हें पंचवीस हजार घोडेस्वार घेऊन प्रतिष्ठानला जावयास कोण तयार आहे ?"

" सर्व तयार आहेत. "

" वचनपाळ तुम्ही थट्टा करतां वाटतें ?"

" प्रभु ! आपली थट्टा करण्याचें धाष्टर्य कोण करील ? परंतु वचनपाळाला जर पंचवीस हजार घोडेस्वार मिळतील तर तो भिल्लमाळालाहि जावयास तयार आहे; मग प्रतिष्ठानची बिशाद ती काय ?"

भीष्मदेव म्हणाला, " शत्रूंनीं वेष्टिलेल्या दुर्गात घोडेस्वारांची मुळींच आवश्यकता नाहीं. म्हणून या घोडेस्वाराना जर येथून न पाठविले तर बाकीच्या लोकांसाठीं सामुग्री लागेल त्याचे काय ?"

धर्मपाळदेव म्हणाले, " तात ! त्याबद्दल आपण चिंता करूं नका. बोला सामंतगण, दहा सहस्र सैनिक घेऊन आपणांपैकीं कोण शत्रूची फळी फोडून जावयास तयार आहे ? "

जयवर्धनानें उत्तर दिलें, " मी तयार आहे, महाराज !"

कमळसिंह म्हणाला, " आणि मीहि पण. "

वचनपाळ म्हणाला, " महाराज, मला फक्त पांच हजार सैनिक मिळाल्यास मीहि तयार आहें. "

भीष्मदेव म्हणाला, " एकाहून जास्त जणांनीं जाण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. "

धर्मपाळदेव म्हणाले, "वचनपाळ ! तुम्हांला आतां जावयाचें नाहीं."

तोंड वाईट करून वचनपाळानें विचारालें, " महाराज, मीं असा अपराध तरी कोणता केला आहे ? "

" अपराध कोणताहि नाहीं, वचनपाळ ! पण तुझ्यावर मीं दुसरें कार्य एक सोंपविणार आहें. "

भीष्मदेव म्हणाला, " जयवर्धन आणि कमळसिंह दोघेहि जावयास तयार आहेत आणि महाराज जर आज्ञा देतील तर ते जातील."

" तर मग जयवर्धनांना प्रतिष्ठानला पाठवा. "

कमळसिहानें विचारलें, "आणि माझा असा गुन्हा कोणता महाराज?"

" गुन्हा कोणताहि नाहीं. कमळसिंह, तुम्हांला मजबरोबर युद्ध करावयास निघाले पाहिजे."

" आपल्या बरोबर ? "

" होय, माझ्याबरोबर."

" कोणत्या स्थळीं युद्धार्थ जावयाचें आहे ? "

" तें मी मागाहून सांगेन. जयवर्धन ! तुम्ही उद्यां पहांटेस निघा. रस्त्यांत शत्रूंना तोंड न देतां प्रतिष्ठानास निघून जा. नवीन सैन्यभरती होईल तितकी करा आणि प्रतिष्ठानचा मार्ग खुला करा. प्रयागहून गौड देशांत कळवा कीं, आणखी एक लाख पायदळ व पन्नास हजार घोडेस्वार एवढ्या सैन्याची जरूरी आहे."

" फार उत्तम, महाराजांची आज्ञा शिरोधार्य आहे."

भीष्मदेव म्हणाला, " महाराज बाकीच्या घोडेस्वारांविषयीं काय करावयाचें ठरविलें आहे ? "

" तात! उद्यां प्रभातीं मी स्वतःच युद्धार्थ बाहेर पडणार आहे."

" काय ! आपण स्वतःच जांणार ?"

" होय, मी, कमळसिंह आणि वचनपाळ बाकीचें घोडेस्वार घेऊन पश्चिम दिशेस अन्नसामुग्रीच्या शोधास जाणार. "

" पश्चिम दिशेस म्हणतां ?"

" होय, जयवर्धन पूर्वेस व मी पश्चिमेला जाईन. "

इतक्यांत रणसिंह, प्रमथसिंह आणि वीरदेव वगैरे प्रौढ सेनानायक म्हणाले, " महाराज, आम्ही पण आपल्याबरोबर येतो. "

मंद स्मित करून धर्मपाळदेव म्हणाले, " तुम्ही सर्व भीष्मदेवांपाशीं राहून दुर्गाचें रक्षण करा. आम्ही कांहीं फार दूर जाणार नाहीं. दोन तीन दिवसांत मागें परतूं. "

दुसऱ्या दिवशीं अगदीं प्रभातकाळीं कान्यकुब्ज नगराच्या किल्ल्याचा पूर्व दरवाजा उघडून दहा हजार घोडेस्वारांनीं गुर्जरसेनेची फळी फोडली. बेसावध असलेलीं गुर्जरसेना युद्धासाठीं तयार होतें न होतें तोंच तें स्वार पार निघूनहि गेलें.

गुर्जर घोडेस्वारांनीं चार दोन गांवांपर्यंत त्यांचा पाठलाग केला व ते मागें वळलें. ज्यावेळीं जयवर्धन प्रतिष्ठानास जावयास निघाला; त्याच वेळीं धर्मपाळदेव पंधरा हजार स्वारांनिशीं पश्चिमेच्या दरवाजानें बाहेर पडलें. भयंकर झंझावातानें पावसाचें पाणी जसें सैरावैरा होऊन जातें, त्याचप्रमाणें गुर्जरसेनेची अगदीं तारांबळ उडाली. पहातां पहातां हें पंधरा हजार घोडेस्वारहि टापांनीं उडविलेल्या धूळीच्या वादळांत दिसेनासें झालें,

●●

## ३२

यावेळीं रात्रींचा दुसरा प्रहर उलटून गेला होता. वाराणशी नगराच्या राजमार्गावर अंधःकाराचें साम्राज्य पसरलें होते. आणि दुकानांतील दिवे एकामागून एक मालवलें जात होतें. अशा वेळीं एका मोठ्या घराच्या समोर मुंडन केलेला संन्यासी अंधारांत गुपचुप लपून उभा होता. तो कोणाच्या तरी येण्याची मार्गप्रतीक्षा करीत असावा असें दिसत होतें. कारण कीं, तो वारंवार त्या जनशून्य राजमार्गावर डोकावून पहात होता.

दुसरा प्रहर उलटून तिसऱ्या प्रहरास सुरुवात होतांच प्रत्येक दरवाजावर मंगल वाद्यें वाजूं लागलीं.

वाराणशीच्या असंख्य देवालयांतून मध्यरात्रींच्या आरतीचा घंटानाद होऊं लागला. हळूहळू पुनः सर्वत्र शांतता झाली. अंधकारानें व्याप्त झालेलें नगर पुनः निःशब्द झालें. अशा वेळीं फरसबंदी राजमार्गावर कोणा मनुष्याच्या पावलांची चाहूल ऐकूं आली. ती ऐकतांच संन्यासी दाराआड लपला.

कित्येक क्षणानंतर एक शस्त्रधारी पुरुष त्या घराच्या समोर येऊन उभा राहिला. त्याला पाहून संन्याशानें दाराआडून प्रश्न केला, " तुम्ही कोण ?"

" भिल्लमाळचा अतिथी. " उत्तर दिलें.

" यास प्रवाण ?"

" आर्यसंघाच्या आज्ञेनें माझ्याकडे धर्मचक्र पाठविण्यांत आलेलें आहे. "

" तें तुम्ही बरोबर आणलें आहे काय ?"

" होय. "

" दाखवा पाहूं !"

शस्त्रधारी पुरुषानें आपल्या वस्त्रांतून धातूचा एक वर्तुलाकार तुकडा बाहेर काढून संन्याशाच्या हातांत ठेविला. तो पाहून संन्यासी म्हणाला, " आंत चला. "

तो सशस्त्र पुरुष आंत जाऊन पाहतो तों खोलींत सर्वत्र अंधार ! त्याला कांहीं दिसेना. तेव्हां त्यानें विचारलें, " कोणच्या वाटेनें ?"

संन्यासी कांहीं उत्तर न देतां त्याचा हात धरून चालूं लागला. कांहीं अंधाऱ्या खोल्यांतून दोघेहीजण घराच्या मागील अंगणांत येऊन पोहोंचले. शस्त्रधारी पुरुषानें चौफेर दृष्टिपात करून पाहिलें, तों ती अट्टालिका अगदीं जीर्णावस्थेंत असलेंलीं त्याच्या दृष्टीस पडली. तिचा बराच भाग अगदीं मोडकळीस आलेला होता. अंगणांत असंख्य लहान लहान रोपटीं आणि वेली उगवल्या होत्या; आणि ते घर जनशून्य होतें. आंगण ओलांडून ते आणखी पुढें एका अंधाऱ्या खोलींत शिरले. तींतील पायऱ्या उतरून ते एका तळघरांत आले.

संन्यासी नित्याच्या परिपाठामुळें झपाझप पायऱ्या उतरला. अर्ध-अधिक भुयार चालून झाल्यावर पुन: तें वर दादर चढले. दादर चढून होतांच संन्याशानें समोर बंद असलेले द्वार ठोठावलें. तत्काळ आंतून कोणीसें हविचारलें, " कोण आहे ?"

" मी बुद्धमित्र !"

" एकटेच का आलां आहांत ?"

" नाहीं, बरोबर भिल्लमाळचा अतिथीहि आहे, "

" नीट खात्री करून घेतली ना ?"

" होय. त्याच्यापाशीं धातूचें प्रमाणपत्र आहे. "

लगेच द्वार उघडण्यांत आलें. त्यानंतर दोघेंहि एका अंधाऱ्या खोलींत

शिरलें. द्वार पुन: बंद झालें. शस्त्रधारी पुरूषानें सभय अन्त:करणानें तरवारीच्या मुठीवर हात ठेवला. तें पाहून द्वाररक्षकानें विचारलें, " तुम्ही कोण ?"

" मी भिल्लमाळचा अतिथी. "

" कोणाला भेटूं इच्छिता ?"

" उत्तरापथाच्या आर्यसंघाच्या चरणदर्शनासाठीं आलों आहे. "

" आपण ज्ञातीनें कोण ?"

" गुर्जर प्रतिहार, "

" कोणता धर्म पाळतां ?"

" मी सद्धर्म पाळतों आणि त्रिरत्नांची पूजा करतों. "

" कोणत्या उद्देशानें आर्यसंघाच्या दर्शनाची इच्छा करीत आहांत ?"

" परमेश्वर परमभट्टारक महाराजाधिराज गुर्जराधिरापति नागभट्टदेवांच्या आज्ञेनें मी दूत म्हणून आर्यसंघाच्या समीप आलेलों आहे. "

" कांहीं खूण आणलीत का ?"

" होय. "

" कोणती ?"

" परमेश्वर परमसौगत महामंडलेश्वर बाहुकधवलांच्या हस्ताक्षरांचें पत्र. "

" दाखवा पाहूं !"

एकाएकीं दिव्यांचा लख्ख उजेड पडला. सैनिकानें डोळे चोळीत चोळीत प्रश्न विचारणाऱ्याच्या हातांत एक पत्र दिलें. प्रश्न विचारणारा मुंडन केलेला एक संन्यासी होता. त्यानें भगवीं वस्त्रें परिधान केलीं होतीं. त्यानें दाढीमिशा व मस्तकाचें मुंडन केलेले असून त्याच्या हातांत एक जपमाळ होती. त्यानें पत्र वाचून म्हटलें, " ठीक, तुम्ही माझ्याबरोबर चला."

तिघेहिजण त्या खोलींतून एका दरवाजाकडे येऊन पोहोंचले. द्वार बंद असल्यामुळें दुसऱ्या संन्याशानें तें ठोठावलें. तेव्हां ' कोण आहे ? ' असें आंतून कोणीसें विचारलें.

दुसऱ्या संन्याशानें उत्तर दिले, " मी भिक्षु जिनदास, हें भिक्षु बुद्ध-

मित्र आणि हें गुर्जरेश्वराचे प्रतिनिधि रणदेव आहेत. "

" गुर्जरराजाचें प्रतिनिधि अशा भयाण रात्रीं कोणत्या उद्देशानें आलेले आहेत ?"

" उत्तरापथाच्या आर्यसंघाच्या दर्शनार्थ. "

" कांहीं खुण आणि एखादे प्रमाणपत्र आणले आहे कां ?"

" होय. "

तत्काळ दरवाजा उघडण्यांत आला. रणदेवानें घराच्या आंत प्रवेश करतांच द्वार पुन: बंद झालें. दरवाजाजवळ एक दुसरा मस्तक मुंडण केलेला भिक्षु उभा होता. तो रणदेवाला घेऊन घराच्या मध्यभागीं आला. इतक्यांत घराच्या चारी बाजूंस चार दिव्यांचा प्रकाश दिसूं लागला. त्या प्रकाशांत दगडानें बांधलेल्या सिंहासनासन्मुख आपण उभें आहोंत असें रणदेवानें पाहिले.

सिंहासनावर त्रिरत्नांचीं स्थापना केलेलीं होतीं, आणि त्यांच्यामागें अत्यंत वृद्ध असें तीन भिक्षु गवताच्या आसनावर बसले होतें. त्यांच्यामागें थोड्या दूर अंतरावर दर्भासनावर दुसरें अकरा भिक्षु बसलें होतें. सिंहासनाच्या सन्मुख येऊन पोहोंचतांच द्वाररक्षकानें रणदेवाला प्रश्न केला,

" नायक रणदेव, आपण सद्धर्मी आहांत काय ?"

" होय, मी सद्धर्मी आहे. "

" त्रिरत्नांवर तुमची आस्था–श्रद्धा–आहें काय ? "

" होय, माझा त्यावर विश्वास आहे. " इतके म्हणून रणदेवानें त्रिवार त्रिरत्नांस प्रणाम केला.

" त्रिरत्नांस प्रणाम करून शपथ घ्या पाहूं ! " भिक्षु पुन: म्हणाला.

" कशाची शपथ घेऊं ?"

" अशी शपथ घ्या कीं, आज रात्रीं या ठिकाणीं तुम्ही जें कांहीं पहाल किंवा ऐकाल तें दुसऱ्या कोणालाहि सांगणार नाहीं. "

" अशी जर मी शपथ घेईन, तर महाराजाधिराजांना मला कसें कांहीं सांगतां येणार ?"

तिघां वृद्ध भिक्षूंपैकीं एकजण म्हणाला, " गुर्जरेश्वर अथवा महा-मंडलेश्वर बाहुकधवलाशिवाय दुसऱ्या कोणासहि कांहीं सांगतां कामा नये."

रणदेवानें नंतर त्रिरत्नांस स्पर्श करून तीनदां शपथ घेतली. तेव्हां बुद्धभद्रानें प्रश्न विचारला.

" गुर्जरेश्वरानें तुम्हांस कोणत्या उद्देशानें आर्यसंघाकडे पाठविलें आहे ? बोला, मी आर्यसंघाचा प्रतिनिधि आहे. "

त्याच्या तोंडचें हें शब्द ऐकतांच रणदेवानें त्यास प्रणाम करून म्हटले, " परमेश्वर परमभट्टारक परमवैष्णव महाराजाधिराज नागभट्टदेव आर्यसंघाशीं सलोखा जोडूं इच्छितात. परमसौगत महामंडलेश्वर बाहुक-धवलाच्या सल्ल्यानें महाराजाधिराज बौद्धसंघावरील द्वेष पार विसरून गेलेले आहेत. त्याचें मत असें आहे कीं, आर्यसंघाबरोबर तह केल्यानें गौडयुद्धाचा निकाल लौकर लागेल व महाराजाधिराज मित्र कान्यकुब्जेश्वर यांस आपलें गमावलेले राज्य परत मिळवितां येईल. "

" आर्यसंघाचा गौडयुद्धाशीं काय संबंध ?"

" परमसौगत आर्यसंघनायक दासाच्या अपराधाची क्षमा असावी. मी केवळ दूत आहे. महाराजाधिराजांना असें वाटतें कीं, आर्यसंघाच्या कृपेशिवाय क्षुद्र गौडेश्वर केव्हांहि मध्यदेश जिंकू शकणार नाहीं. "

" गुर्जरेश्वर आर्यसंघाबरोबर कोणत्या प्रकारचा तह करूं इच्छि-तात ?"

" महाराजाधिराजांनीं आपणांला कळविण्याची मला आज्ञा केली आहे कीं, आपण सलोखा केल्यास गुर्जरराज्यांत संघानें गमावलेलीं संपत्ति परत देण्यांत येईल आणि सद्धर्मावलंबी प्रजेचा न्यायनिवाडा गुर्जरराज आर्यसंघाच्या आज्ञेनुसार करतील. "

" सलोखा केल्यावर गुर्जरराज आपल्या प्रतिज्ञेचें योग्य पालन कर-तीलच याबद्दल खात्री कशावरून ?"

" परमसौगत महामंडलेश्वर बाहुकधवलदेव संधिपत्रावर सही देतील आणि गुर्जरराजांना आपल्या दोघां मुलांस संघाकडे ओलीस ठेवतील. "

" ठीक, आर्यसंघ तह करावयास तयार आहे. संधिपत्रांत आणखी

कोणकोणत्या गोष्टी लिहिण्यांत येणार आहेत ?"

" एकच गोष्ट ! आणि ती ही कीं, तह झाल्यानंतर आर्यसंघानें गौडेश्वराला मुळींच द्रव्यसाह्य देतां कामा नये."

" ठीक आहे. आर्यसंघाला ही अटसुद्धां मान्य आहे. तहाचें पत्रक आणिलें आहे काय ? "

रणदेवानें वस्त्रांतून संधिपत्र काढून संघाच्या नायकाच्या हातीं दिलें. बुद्धभद्रानें तें वाचून आपल्या उजव्या बाजूस बसलेल्या दुसऱ्या एका वृद्धाच्या हातीं दिलें. त्यानें मग तें तिसऱ्याला दिलें, याप्रमाणें तिघांहि संघनायकांनीं संधिपत्र वाचल्यावर त्यांपैकीं एकानें आपल्या मागें बसलेल्या अकरा साधूंपैकीं एकाच्या हातांत तें दिलें. एकामागून एक याप्रमाणें अकराहि साधूंनीं तें वाचून संघनायकाला परत दिले. तेव्हां संघनायकानें त्यांना विचारले,

" तहाबाबत चक्रराजांना कांहीं विशेष सांगावयाचे आहे काय ?"

एक साधु म्हणाला, " मला एकच गोष्ट दृष्टोत्पत्तीस आणावयाची आहे. ती हीच कीं, आर्यचक्रराज विश्वेश्वरानंद यावेळीं येथें हजर नाहींत."

" एका चक्रराजाच्या गैरहजेरीखातर आर्यसंघाचें कामकाज बंद ठेवतां यावयाचें नाहीं, बोला, यावर तुमचे म्हणणें काय आहे ?"

सर्व साधूंनीं कांहीं वेळ विचार करून म्हटलें, " गुर्जरेश्वराशीं तह करावयास आमचीं कोणत्याही प्रकारची हरकत नाहीं. "

तेव्हां संघनायकानें सिंहासनाखालून दौत व लेखणी घेऊन गुर्जरराजाच्या सहीखालीं आपली सही करून तें संधिपत्र रणदेवाच्या हातीं देतांच तेथील दीपप्रकाश नाहींसा झाला. नंतर पूर्वींच्याच भिक्षूनें रणदेवाला दुसऱ्या वाटेनें राजमार्गावर आणून सोडले. रणदेव विस्मयचकित होऊन पाहातों तों, तो काशीविश्वनाथाच्या विशाल मंदिरांत उभा !

● ●

# ३३

दोन दिवसानंतर धर्मपाळदेव कान्यकुब्जाला मागें परतलें आणि कांहींही अडचण उपस्थित झाल्याशिवाय त्यांचा नगरांत प्रवेश झाला. सिंह स्वेच्छापूर्वक पिंजऱ्यांत प्रवेश करीत आहे हें पाहून गुर्जरसेनेनें त्यांस मुळींच अटकाव केला नाहीं.

पन्नास गांवांपर्यंत गौडाधिपति दूरवर जाऊन आले. परंतु विशेषशी अन्नसामुग्री त्यांच्या हातीं लागलीं नाहीं. जी कांहीं थोडीबहुत मिळालीं, ती वाटेंतच त्या पंधरा हजार सैनिकांत खलास होऊन गेली. धर्मपाळदेवांना म्लानवदनानें परत आलेले पाहून त्यांचे प्रयत्न विफल झालें असलें पाहिजेत· हें गौडीय सामंत समजून चुकले. भीष्मदेवानें ताबडतोब सर्व सरदारांची गुप्त बैठक भरविली. त्या सभेंत संधि मिळतांच पलायनाचा मार्ग स्वीकारावा असें एकमतानें ठरलें.

याप्रमाणें परत आल्यास दोन दिवसहि लोटतात न लोटतात, तोंच अगदीं नाईलाजास्तव कान्यकुब्जाचा त्याग करणें धर्मपाळदेवांना भाग पडलें त्यांनीं शक्य तितक्या तांतडीनें प्रतिष्ठानाकडे प्रयाण केलें. पण गुर्जरसेनेनें गौडीय सैन्याचा पिच्छा सोडला नाहीं. ती मधमाशांप्रमाणें पळून जात असलेल्या गौडीयसेनेला वेष्ठून पुढे पुढें सरकूं लागली. त्या वेळीं नागभट्टानें भयंकर अत्याचार करून मध्यदेश मरुभूमीप्रमाणें करून सोडला.

शहरें आणि खेडीं जाळूनपोळून फस्त केली. हत्तीघोडे बेछूट सोडून हातातोंडास आलेल्या पिकांची भयंकर नासधूस केलीं. लोक आपापलीं घरेंदारें सोड्न पर्वत आणि गुहा यांच्या आश्रयानें राहूं लागले. क्षुधित, दुःखित आणि भयग्रस्त गौडीयसेना निराश होऊन हळूहळू प्रतिष्ठानाच्या मार्गाला लागली.

या संधीचा फायदा घेऊन गुर्जरसेना तिजवर मधूनमधून लांडग्यांप्रमाणें तुटून पडून जी कांहीं अन्नसामुग्री गौडीय फौजेच्या हातीं होतीं, तिजवर गिधाडाप्रमाणें झांप टाकू लागली.

याप्रमाणें आठवडाभराच्या झटापटींत बरेंचसें मनुष्यबळ खर्ची घालून गौडेश्वर एकदाचें कसेबसें प्रतिष्ठानास येऊन पोहोंचले. तरी पण अन्न-सामुग्रीच्या अभावीं प्रतिष्ठान दुर्गांत फार दिवस राहणें अगदीं अशक्य झाले. शेवटीं अगदीं निराश होऊन धर्मपाळदेव सामंतांसह वाराणशीला मागें परतलें. वाराणशींत हजारों गौडीयसैनिक कान्यकुब्जास जाण्यासाठीं एकत्रित होऊन राहिलें होतें.

महाकुमार वाक्पाळ वाराणशी दुर्गात वाट पहात राहिला होता. त्यांनीं गुर्जरसेना मागें परतल्याचा समाचार ऐकून नगरांत ठिकठिकाणीं हजारों पायदळ सैन्य व्यवस्थित ठेवलें. आणि हिमालयाच्या पायथ्यापासून विंध्य पर्वतापर्यंत सर्व रस्त्यावर मातीचीं एक भव्य भिंत उभारलीं. त्या-मुळे या ठिकाणीं गुर्जर घोडेस्वारांचा मार्ग बंद झाला. प्रतिष्ठानकडून सगळीं गौडीयसेना वाराणशीला येऊन पोहोंचलीं. याचवेळीं राजधानींत महामंत्री गर्गदेवाचा दूत बुद्धसंघाच्या परिवर्तनाचा समाचार घेऊन गौडा-धिपतींजवळ येऊन पोहोंचला.

मणिदत्ताच्या भांडारांतून मिळालेलें अगणित द्रव्य कान्यकुब्जाच्या युद्धांत संपून गेलें. महास्थिवर बुद्धभद्रानें गौडाधिपतीला असें आश्वासन दिलें होतें कीं, बुद्धसंघानें एकत्र केलेलें द्रव्य गुर्जर राजाबरोबरील युद्धांत वापरावयास देण्यांत येईल.

धर्मपाळदेव जेव्हां वाराणशीला येऊन पोहोंचले, तेव्हां मंत्री गर्ग-देवानें त्यांना असें सांगून ठेवलें कीं, बुध्दभद्रानें पूर्वी दिलेलें द्रव्य संपून गेलें असून पुन: देण्याची वेळ आली तरी बुध्दभद्राचा कोठेच ठिकाणा लागत नाहीं.

हा समाचार ऐकतांच विश्वेश्वरानंद, भीष्मदेव आणि धर्मपाळदेव यांना अत्यंत विस्मय वाटला. विश्वेश्वरानंदांनीं स्वत:ही खूप तपास केला; परंतु संघनायकाचा कोठेंच पत्ता लागेना. तेव्हां निरुपाय होऊन गौडेश्वरांनीं गौडास मागें परतण्याचा आपल्या सैन्यास हुकूम केला. नाइलाजानें गौडीय घोडेस्वार मागें परतले.

गौडीय पायदळसेना ती अजस्त्र मातीची भिंत गुर्जरफौजेच्या हवाली

करून शोण आणि गंडकीच्या तीरानें मागें वळली. गौडराज्यांतील मुदग-गिरी, मंडला, गौड आणि कर्णसुवर्ण वगैरे प्राचीन व सुप्रसिद्ध दुर्ग लढाई-साठीं जय्यत तयारीनें ठेविलें होतें, युद्धाच्या सुरवातीला कान्यकुब्ज राज्यां-तील ज्या सामंतांनीं उघडउघड चक्रायुधाचा पक्ष स्वीकारला होता, ते आतां स्वदेश सोडून गौडराज्यांत आश्रयास येऊन राहिले.

महाकुमार वाक्पाळदेवाला तीरभुक्तीच्या रक्षणार्थ ठेवून धर्मपाळ-देवांनीं स्वत: शोण नदीच्या कांठीं तळ दिला. लुटालूट आणि अत्याचारास सोकावलेल्या गुर्जरसेनेनें पुष्कळ दिवसपर्यंत शोण आणि गंडकी उतरून जाण्याचा प्रयत्न केला नाहीं. मात्र मध्यदेशांत जेव्हा लुटण्यासारखें कांहीं राहिलेलें नाहीं असें दिसून आलें, तेव्हां गुर्जरसेनानायकांनीं गौडदेशावर चालून जाण्याचें ठरविलें. परंतु गौडीय सामंतांनीं दोन्ही नद्यांच्या कांठीं दुर्भेद्य अशी मोठी भिंत निर्माण केली असल्यानें मगध आणि तीरभुक्तीच्या प्रदेशांत प्रवेश करण्याचे गुर्जरसैन्यानें केलेले सारे प्रयत्न निष्फळ ठरलें. हें वर्तमान नागभट्टाच्या कानांवर आलें. त्या वेळीं तो स्वत: कान्यकुब्जांत होता, त्यानें गौडीय सेनेचा पराजय करून कान्यकुब्ज जिंकून घेतलें, तरी अद्यापि इंद्रयुधाची मुक्तता केली नव्हती.

एका साधारण कैद्याप्रमाणें इंद्रायुध अजून भिल्लमाळलाच होता. गौडराज्य जिंकून घेण्याचा प्रयत्न वायां गेल्याचें कानांवर येतांच नागभट्ट आणि बाहुकधवल शोण नदीकडे यावयास निघाले. गुर्जरेश्वरानें सैन्याचें आधिपत्य स्वत:कडे घेतलें; तरी पण गुर्जरसेनेचा मगधांत प्रवेश होऊं शकला नाहीं. एके दिवशीं घोर अंधाऱ्या रात्रीं वचनपाळ आणि चक्रायुध यांनीं थोड्या सैनिकांनिशीं गुर्जरेश्वराच्या तंबूंत शिरून आग लावून दिली. नागभट्ट केवळ दैवयोगानेंच या भयंकर प्रसंगांतून कसाबसा निसटला. अशा कठीण वेळीं स्वामी विश्वेश्वरानंदांनीं शत्रूच्या नाशाची एक निराळीच क्लृप्ति शोधून काढली.

गोपाळदेवांना सम्राट्पदाची प्राप्ति होण्यापूर्वी गौडदेशावर वारंवार परकीयांच्या स्वाऱ्या होत असत. कामरूपचा राजा हर्षदेव आणि नागभ-ट्टाचा पिता वत्सराज यांनीं एकें वेळीं तर संपूर्ण गौडदेश पादाक्रांत केला

होता; पण गौडवासीयांच्या सुदैवानें दक्षिणापथाचा राजा राष्ट्रकूटवंशीय ध्रुवधारावर्ष याचे गुर्जरराजाशीं घनघोर युद्ध जुंपले. ध्रुवधारावर्षाच्या बाहुबलानें गौडराज्य वत्सराजाच्या पंजांतून बचावले गेलें.

विश्वेश्वरानंदांनीं पुष्कळ विचार करून पाहिला; तथापि उत्तरापथांत गुर्जरयुद्धांत धर्मपाळदेवांचा पक्ष घेईल असा एकहि प्रबल राजा त्यांना दिसेना.

इतक्यांत त्यांना ध्रुवधारावर्षाचे स्मरण झाले. ध्रुवधारावर्ष यावेळीं मरण पावला होता आणि त्याच्या पश्चात् त्याचा मुलगा गोविंद राष्ट्रकूट राज्याचा अधीश्वर झाला होता. त्याच्या मदतीची याचना केल्याशिवाय गुर्जरयुद्धांत आपणांस विजय मिळणें अशक्य आहे असें विश्वेश्वरानंदांना वाटूं लागले. तेव्हां त्यांनीं या बाबतींत भीष्मदेव, वीरदेव, कमळसिंह आणि प्रमथसिंह वगैरे प्रमुख सेनानायकांची सल्ला विचारलीं. भीष्मदेवानें लगेच शोणनदीच्या कांठीं एका तंबूत सर्व सरदारांची एक गुप्त सभा भरविलीं.

पुष्कळ भवति न भवति झाल्यावर असें ठरविण्यांत आलें कीं, राष्ट्रकूटाधिपति गोविंद यांच्याकडे मदत मागण्यासाठीं दूत रवाना करण्यांत यावा. गौडेश्वराचा दूत म्हणून त्याच्याकडे स्वतःच जाण्याची स्वामी विश्वेश्वरांनी इच्छा दर्शविलीं. तेव्हां धर्मपाळदेवांनीं त्यांना व उध्दवघोषास राष्ट्रकूटाधिपतींकडे रवाना केलें.

विश्वेश्वरानंद दक्षिणापथास गेल्यावर सुमारें पंधरवड्यानंतर नागभट्टानें गौडेश्वराचा पूर्ण पराभव केला. मगधाच्या दक्षिणेकडील जंगली प्रदेशांत यावेळीं रानटी जातींचीं वस्ती होतीं. बाहुकधवलानें त्या लोकांस हातांशीं धरून असंख्य घोडेस्वारांसह मगधांत प्रवेश केला. अगणित गुर्जरस्वारांनीं मगध आणि अंगदेशांत धुमाकूळ माजविला. उदंडपुरांत भीष्मदेव, मुदगगिरींत जयवर्धन, गयेंत वीरदेव आणि मंडला दुर्गात रणसिंह अडकून पडले. धर्मपाळदेव, प्रमथसिंह, कमळसिंह आणि वचनपाळ यांच्यासह राढदेशाच्या रक्षणाचा आटोकाट प्रयत्न करूं लागले. तीरभुक्तींत प्रवेश करण्याच्या प्रयत्नांत अजूनहि गुर्जरसेना यशस्वी झाली नव्हतीं. तरी पण

मगधाचीं अशीं दशा पाहून गौडदेशाच्या रक्षणाची वाक्पाळला मोठी चिंता वाटूं लागली.

●●

## ३४

संध्यासमयीं गोकर्णदुर्गाच्या बाहेर नदीच्या कांठीं एक कृष्णवर्णाचा वृद्ध मनुष्य गवत कापीत बसला होता. या वेळीं गोकर्णदुर्गाचा दरवाजा उघडाचा होता. दरवाजावर कोणीहि द्वाररक्षक दिसत नव्हता. त्या वृद्ध मनुष्याशिवाव दुर्गासन्मुख दुसरें कोणीहि माणूस दिसत नव्हतें. एकाएकीं गवत कापण्याचें हत्यार फेंकून तो वृद्ध उठून उभा राहिला. साधारण अंधार झाला असल्यानें रातकिड्यांच्या किर्रर आवाजाशिवाय दुसरा एकहि शब्द ऐकूं येत नव्हता. कांहींशा रागानें तो वनांतून बाहेर आला, तों त्याला घोड्यांचा टापांचा आवाज ऐकूं आला, तेव्हां विस्मयचकित होऊन तो एका आंब्याच्या झाडावर चढून बसला.

या वेळीं चारी बाजूंस घोर अंधार पसरला होता. वृक्षावरून वृद्धानें पाहिलें, तों रणग्रामच्या घाटाच्या बाजूनें एक घोडेस्वार गोकर्ण दुर्गाकडेच येत आहे. तो एकटाच आहे असें पाहून त्याला धीर आला व तो खालीं उतरला. लौकरच तो स्वार गोकर्णदुर्गांत येऊन पोहोंचला. दरवाजासमोर उभ्या असलेल्या त्या वृद्धाला पाहून त्यानें प्रश्न विचारला, " तुम्ही कोण ? दुर्गांत या वेळीं कोण आहे ?"

वृद्धानें उत्तर दिलें, " मी गोकर्ण दुर्गातील एक सैनिक आहें. माझें नांव केशव. प्रधानजी उद्धघोष गौडाधिपतींबरोबर युद्धाला गेलेले आहेत. सध्यां ते महाराजांच्या आज्ञेनुसार दक्षिणापथास गेल्याचें ऐकलें आहे."

" दुर्गरक्षणाचा भार सध्यां कोणावर आहे ?"

" नवीन सामंतावर."

" दुर्गस्वामिनी कोठें आहे ?"

" दुर्गांत अंतःपुरांत."

" तुम्ही अन्तःपुरांत जाऊन त्यांना कळवा कीं, धर्मपाळदेव दुर्गद्वारावर आपली वाट पाहात आहे. नवीन सामंतांना गांवांतील साऱ्या बायकांमुलांस दुर्गांत आणविण्याची तजवीज करावयास सांगा. फार करून शत्रूचें सैन्य लवकरच दुर्गावर चालून येईल. "

गौडाधिपतीला अशा वेळीं दुर्गाच्या द्वारावर एकटाच आलेला पाहून केशवाला इतकें नवल वाटलें की, तो प्रणाम करावयासहि विसरला. तो पळत पळतच दुर्गांत गेला. कांहीं वेळानंतर गोकर्णदुर्गाच्या पायदळ फौजेचा मुख्याधिकारी तेथें आला आणि त्यानें सम्राटांना लवून अभिवादन केलें.

या नवीन अधिकाऱ्यानें गोकर्णच्या पूर्वीच्या युद्धांत धर्मपाळदेवांना पाहिलेले होतें. तेव्हां महाराजांना एकटेच परत आलेले पाहून तो म्हणाला,

" महाराजावर कांहीं संकट आले आहे का ? महाराज अशा वेळीं एकटेंच कसें ?"

धर्मपाळदेव म्हणाले, " सामंतसेना युद्ध करतां करतां चोंहीकडे विखुरलीं गेलेलीं आहे. म्हणून मी एकटाच समाचार कळविण्यास आलों आहे. तुम्ही ताबडतोब रणभेरी करा. "

इतक्यांत अन्तःपुरांतून केशव परत येऊन म्हणाला, " महाराज ! अंतःपुरांत चलावें. देवी आपली वाट पहात आहे. "

धर्मपाळदेव केशवाबरोबर अन्तःपुरात गेलें. दरवाजावर उभें राहून नवीन अधिकाऱ्यानें तूर्यध्वनि केला. तो ऐकतांच गांवांतील सारें आबालवृद्ध व बायकामुलें दुर्गात धांवलीं. हत्यारें धारण करूं शकतील अशा पुरुषांनीं किल्ल्यांत प्रवेश करतांच शस्त्रास्त्रें धारण केली.

इतक्यांत शेंकडों घोडेस्वार येऊन गोकर्णदुर्गासन्मुख येऊन उभे राहिले. त्यांतून एक घोडेस्वार दुर्गाजवळ येऊन म्हणाला–

" महाराजाधिराज गौडाधिपतींचा विजय असो ! आम्ही गौडीय सैनिक असून दुर्गरक्षणासाठीं आलों आहोंत. महाराज धर्मपाळदेव किल्ल्यांत आहेत का ?"

नवीन दुर्गाधिकारी दरवाजावरच उभा होता. त्यानें किल्ल्याच्या

तटावर चढून विचारले, " तुम्ही गौडीय सैनिक आहांत याबद्दल पुरावा काय ?"

" गोवर्धनमठाचें संन्यासी आनंदानंद आमच्याबरोबर आहेत. आपण आपला मनुष्य पाठवा. म्हणजे आजचा सांकेतिक शब्द कळवूं. "

नवीन दुर्गाधिकारी गोवर्धनमठाचे संन्यासी आनंदानंद यांस ओळखीत होता. पण सांकेतिक शब्दाविषयीं त्याला कांहीं माहित नव्हते. तेव्हां तो म्हणाला—

" आपण जरा वेळ थांबा, मी परवानगी घेऊन येतो. "

घोडेस्वार म्हणाला, " लवकरच परत या. कारण शत्रूसैन्य इतक्यांतच येऊन पोहोंचेल. "

नवीन दुर्गाधिकारी घाईघाईनें अंतःपुरात निघून गेला,

धर्मपाळदेव गोकर्णदुर्गाच्या अंतःपुरांत प्रवेश करून पहातात तों रघुवीर सिंहाची विधवा राणी श्वेतवस्त्रें परिधान करून आंगणांत उभी ! गौडेश्वरांनीं तिला प्रणाम करून म्हटलें, " मातोश्री ! भयंकर संकट आलेले आहे- गुर्जरसेना गंगेच्या कांठीं येऊन पोहोंचलीं असून, लवकरच ती दुर्गावर आक्रमण करीलसें दिसतें. "

" वत्स ! ज्या अर्थी आपण स्वतःच येथें आलां आहांत त्या अर्थीं भिण्याचें आम्हांला काय कारण ? "

" माताजी ! भावी संकटाचीं स्पष्ट चिन्हें मला दिसूं लागतांच मीच एकटा आगाऊ समाचार द्यावयासाठीं येथें निघून आलों. माझ्याबरोबर सैन्य किंवा सरदार कोणीहि नाहीं. "

" तरी पण चिंता कशाची ? स्वर्गीय महाराज गोपाळदेवांच्या कृपेनें गोकर्णची भाग्यश्री परत आलेली आहे. दहापंधरा दिवस तरी नागरिक गोकर्णदुर्गाचें रक्षण करूं शकतील. "

" पण गुर्जरसेना जर दुर्गावर चालून आली, तर दहापंधरा दिवसांत युद्ध संपुष्टांत येणार नाहीं. "

" जरी तसें झाले नाहीं, तरी इतक्या अवकाशांत आपले सैन्य आणि सामंत येऊन पोहोंचणार नाहींत काय ?"

" येतील. परंतु-"

" परंतु काय ?"

" परंतु या भयंकर गुर्जर युद्धांत-"

इतकेंच अर्धवट बोलून धर्मपाळदेव खालीं मान घालून स्तब्ध उभे राहिले. तें पाहून विधवा गुर्जरस्वामिनीचें हृदय आनंदानें पुलकित होऊन ती म्हणाली,

" काय सांगावयाचें असेल तें खुशाल सांगा. "

" मला असें वाटतें कीं, युद्धाच्या वेळीं अन्त:पुरांतील महिलांना येथून कोणत्या तरी सुरक्षित जागीं नेऊन ठेवल्यास बरें !"

" कोणत्या जागीं ?"

" ढेकरींत. "

" तेथें त्यांना कोण नेऊन पोहोंचवील ?"

" कांहीं तरी व्यवस्था केली पाहिजे. "

इतक्यांत नवीन दुर्गाधिकारी अन्त:पुराच्या दरवाजावर उभा राहून म्हणाला,-

" मातोश्री ! दुर्गांबाहेर असंख्य घोडेस्वार येऊन उभे आहेत, आणि ते म्हणतात कीं, आपण महाराजाधिराज धर्मपाळदेवांचें सैनिक असून गोवर्धनमठाचें संन्यासी आनंदानंद त्यांच्याबरोबर आहेत. "

दुर्गस्वामिनीनें म्हटलें, " तर मग दरवाजा उघडा आणि स्वामी आनंदानंदांना अंत:पुरांत घेऊन या. महाराजांच्या घोडेस्वारांनाहि दुर्गांत येऊं द्या. "

" परंतु माताजी-"

" काय आणखी नवीन ?"

" ते गौडीय सैनिकच आहेत हें कशावरून समजावयाचे ?"

धर्मपाळदेव म्हणाले, " त्यांना आजच्या संकेताविषयीं विचारा. "

नवीन दुर्गाधिकाऱ्यानें उत्तर दिलें, " प्रभु ! आजच्या संकेताविषयीं मला तर कांहीं माहित नाहीं. "

" आजचा संकेत-"

इतकेंच अर्धवट बोलून गौडेश्वर खालीं मान घालून कसलासा विचार करूं लागले. हें पाहून दुर्गाधिकाऱ्यानें पुन: विचारले, " प्रभु ?"

वर मान केल्याशिवाय गौडेश्वरांनीं म्हटलें, " महाराज संकेत ' कल्याणी ' असा आहे."

दुर्गाधिकारी प्रणाम करून तेथून निघून गेला. कांहीं वेळानंतर स्वामी आनंदानंदांनीं अंत:पुरांत प्रवेश केला. धर्मपाळदेवांनीं त्यांना प्रणाम करून विचारले, " प्रभु ! या स्थळीं आपलें अचानक येणे कसें झालें ? "

" मी मयुराक्षीच्या तीरावर तळ दिला होता. इतक्यांत महाराजांचा पत्ता कोठें लागेना; म्हणून भीष्मदेवांनीं मला गोकर्णास पाठवून दिलें." आनंदस्वामींनीं उत्तर दिलें.

" आपल्या बरोबर कितीसें सैन्य आहे ? "

आनंदानंदांनीं जवळच उभ्या असलेल्या सैनिकांकडे पाहिलें, तेव्हां सैनिक गौडेश्वरास प्रणाम करून म्हणाला, " कृपानिधान ! एक हजार घोडेस्वार आहेत. "

धर्मपाळदेव म्हणाले, " प्रभु ! एक हजार सैनिक दुर्गरक्षणास पुरे आहेत. मी अंत:पुरांतील महिलांस दुसऱ्या एखाद्या स्थळी पाठविण्याच्या विचारांत होतों."

" कोणत्या स्थळीं ? "

" ढेकरींत. "

" दुर्गस्वामिनीचें याबाबत काय मत आहे ?"

रघुसिंहाची विधवा तोंडावर पदर घेऊन अंमळ दूर उभी होती. ती आनंदनदांना प्रणाम करून म्हणाली, " प्रभु ! कल्याणीशिवाय दुसऱ्या कोणाही स्त्रीस कुठंही पाठविण्याची आवश्यकता नाहीं. तिला मी केव्हांच गौडेश्वरांना अर्पण करून चुकलें आहे. तेव्हां तिचीं योग्य ती व्यवस्था गौडेश्वर करतीलच ! याबाबत माझें मत तें आणखी निराळें कोणतें असणार ? "

आनंदानंदांनीं विचारलें. " आणि तुमची काय व्यवस्था ? "

" प्रभु ! गोकर्णाचा मी केव्हांही त्याग करणार नाहीं. लग्नाचे

दिवशीं मी येथें आलें आणि आता चितेवर चढण्याच्या वेळेलाच मी येथून बाहेर पडेन. आपण माझ्या विषयीं अगदीं काळजी करूं नका. उच्चकुलोत्पन्न अशा कल्याणीच्या तीन दासी आहेत. त्याहि तिच्याबरोबर जातील.''

आनंदानंद म्हणाले, '' ठीक, मग तसेंच करूं. महाराज ! कल्याणीदेवीबरोबर कोण कोण निघणार ? दुर्गरक्षणार्थ मी स्वतः येथेंच राहीन.''

कांहीं वेळ विचार केल्यानंतर जवळच उभ्या असलेल्या सैनिकाला उद्देशून धर्मपाळदेव म्हणाले, '' तुझें नांव काय ? ''

'' गुणवंत !—''

'' कल्याणीदेवीला तूं सुखरूपपणें ढेकरीला नेऊन पोहोंचविशील ?''

'' महाराज ! मी एक क्षुद्र सैनिक ! युद्ध करणें हा एकच व्यवसाय मला माहित ! पण अपरात्रीच्या वेळीं देवींना मी कसें नेऊं ? ''

'' तुझ्या बरोबर दुसरेही सैनिक येतील.''

'' कृपानिधान ! अपराधाची क्षमा असावी. मला भय वाटतें म्हणून मी असें म्हणतों असें आपण समजूं नका. परंतु —''

गुणवंत पुढें कांहीं बोलणार इतक्यांत दुर्गस्वामिनी मध्येंच म्हणाली, '' वत्सा, कल्याणी आतां वयांत आलेली आहे, तेव्हां रात्रीच्या वेळीं तुम्हींच तिच्या बरोबर असावें हें लौकिकदृष्टया बरें ! ''

'' ठीक आहे, तर मग मीच जातों.''

अर्ध्या तासांतच पालखींत बसून कल्याणीदेवी व तिच्या तीन सख्या गोकर्णदुर्गांतून बाहेर पडल्या. गौडधिपति धर्मपाळदेव पन्नास घोडेस्वारांसह तिच्या बरोबर ढेकरीस जावयास निघाले. दुर्गत्याग केल्यानंतर सुमारें दोनच घटकांनीं दुर्गांत भयंकर कोलाहल मांजला. तो ऐकतांच गुर्जरसेनेनें दुर्गावर हल्ला चढविला असावा असा गौडेश्वरांनीं तर्क केला.

• •

## ३५

रात्रीच्या काळोखांत त्या जंगलांतून एकामागून एक पांच पालख्या चालल्या होत्या. पंचवीस घोडेस्वार या पालख्यांच्या पुढें चालत होते व बाकीचे पंचवीस सभोंवार होते. मध्यभागीं कल्याणीदेवीची पालखी होती, तिच्या पालखीजवळूनच गौडेश्वर आपला घोडा चालवीत होते. या वेळीं रात्रीचा तिसरा प्रहर उलटून गेला होता. गोकर्णदुर्गही तीन चार गांवें मागें राहिला होता. पालखी उचलणारे भोई व पालखीबरोबरचें स्वार निश्चित मनानें चाललें होतें. अशा वेळीं आकस्मिक रीतीनें त्या निबिड वनांत चोंहीकडून गलबला उडाला; आणि शेंकडों घोडेस्वारांनीं गौडेश्वराच्या या चिमूकल्या सेनेस चोंहीकडून घेरलें. पालखीपुढें चालत असलेले स्वार भानावर येऊन शस्त्रे उपसतात न उपसतात तोंच तें शत्रूंच्या तरवारीस बळी पडले.

असंख्य शत्रूंपुढें त्यांचा टिकाव लागणार कसा ? पाण्याच्या लोंढ्यापुढें जसें गवत वाहून जातें, तद्वत् धर्मपाळदेवांच्या सैनिकांची स्थिति झाली. पाहतां पाहतां ते अपरिचित सैनिक त्या निबिड वनांतील अंधःकारांत त्या साऱ्या पालख्या घेऊन अदृश्य झाले. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तितक्या अवकाशांत हा सारा प्रकार घडून आला. धर्मपाळदेवांना म्यांतून तरवार बाहेर काढावयास अवसर मिळाला नाहीं. आपला अश्व कल्याणीदेवीच्या पालखीपासून बेफाम होऊन दूरदूर जात आहेसें पाहून धर्मपाळदेवांनीं खालीं उडी घेतली. जेव्हां अपरिचित सैनिक निघून गेलें, तेव्हां धर्मपाळदेवांच्या लक्षांत आले कीं, चार पालख्या व त्या उचलणारे भोई जाग्यावर नाहींत. आपल्या बरोबरील स्वारहि नाहीत आणि आपला घोडाहि कुठें नापत्ता झालेला आहे, मात्र त्या निबिड वनांत अगदीं एका बाजूला कल्याणीदेवीची पालखी मोडून पडलेली असून जखमी झालेली कल्याणी थरथर कांपत आंत उभी होती. शत्रूचें सैन्य कदाचित् परत येईल त्या भीतीने धर्मपाळदेवांनीं तेथून जाण्याचें ठरविलें. त्यांनीं कंपित स्वरांत कल्याणीला हांक मारली, " देवी ! "

आंतून मंजुळ स्वरांत उत्तर मिळालें, " काय ? "

दीर्घ काळानंतर कल्याणीदेवीच्या कंठस्वर कानीं पडतांच धर्मपाळ-देवांस अत्यंत आनंद झाला. उत्तर मिळतांच त्यांनीं परत विचारले, " आपल्याला जखम तर झाली नाहीं ना कोठें ? "

" नाहीं." पुनः लगेंच उत्तर मिळालें.

तें ऐकून धर्मपाळदेवांस भारी संतोष वाटला, ते म्हणाले, " तर मग आपण आतां पालखींतून बाहेर या. शत्रुसैन्य कदाचित परत येईल म्हणून येथून आपणांला झटकन् निघून गेले पाहिजे."

पालखी पडदा हातानें दूर सारून कल्याणी बाहेर आली; पण चोहीं-कडे गाढ अंधार पाहून भयभीत होऊन स्तब्ध उभी राहिली. हें लक्षांत न आल्यामुळें विलंब होत असलेला पाहून धर्मपाळदेव म्हणाले, " चला, लौकर या बाहेर. "

" पण येथें तर दाट काळोख आहे." हळूच कल्याणी म्हणाली.

" अंधार आहे म्हणून काय झालें ? मी तुमच्या बरोबर आहे ना ? कसलेंहि भय न बाळगतां मजकडे या पाहूं."

" पण मला तर कांहीं दिसत नाहीं, तेव्हां येणार कसें ?"

" हा माझा हात धरा पाहूं ! "

कल्याणीदेवी लाजेनें अगदीं चूर झाली. अगदीं अनिच्छेनें तिला शेवटीं धर्मपाळदेवांचा हात धरणें भाग पडलें. नंतर दोघेहि वनांतून बाहेर पडून एका वृक्षाखालीं येऊन विश्रांति घेऊं लागले.

ते कृष्णपक्षाचें दिवस होते; आणि आजची रात्रहि अमावास्येची होती ! अनंत आकाशांत असंख्य तारे लकाकत होते. अंधाऱ्या रात्रीं एकेच ठिकाणीं जास्त वेळ बसून राहणें इष्ट न वाटल्यामुळें धर्मपाळदेव हळूहळू कल्याणीसह पुढें चालू लागलें. तीं उभयतां थोडा वेळ चालत पुढें जातात न जातांच तोंच एकाएकीं देवी कल्याणीनें किंकाळी फोडली. ती घेरी येऊन पडणार तोंच धर्मपाळदेवानें तिला सांवरून धरून ' काय झाले ' म्हणून प्रश्न केला.

स्फुंदत स्फुंदत कल्याणी म्हणाली, " पायांत एक मोठा कांटा बोचला आहे. "

धर्मपाळदेवांनीं एका हातानें तिला सांवरून धरून दुसऱ्या हातानें तिचा पाय चांचपून पाहिला. तों तिच्या सुकोमल पायांत एक मोठा कांटा रुतलेला आहे असें त्यांना आढळून आलें. अगदीं काळजीपूर्वक त्यांनीं तो कांटा बाहेर उपटून काढला. आतां त्या ठिकाणाहून भळभळा रक्त वाहूं लागलें. कांहीं वेळानंतर दोघेंहि एका नदीच्या कांठीं येऊन पोहोंचलीं.

कल्याणीला एका निवाऱ्याच्या जागीं बसवून धर्मपाळदेवांनीं आपला किंमती शेला नदीच्या पाण्यांतून भिजवून आणला; आणि तो फाडून कल्याणीदेवीच्या पायांस पट्टी बांधली. वाटेच्या श्रमानें अगदीं थकून कल्याणी मस्तकावर हात टेकून बसल्या जागींच झोपीं गेली. ते पाहून धर्मपाळदेवांनीं तिला हलकेंच जमिनीवर निजविलें व ते स्वतः नग्न तरवार घेऊन जवळपास येरझाऱ्या घालूं लागले

सर्व रात्र जागून काढावी लागणार म्हणून एके ठिकाणीं न बसतां असें फिरणें त्यांना इष्ट वाटूं लागलें. परन्तु सर्व दिवसभराच्या श्रमानें त्यांनाहि थकवा आला होता. त्यांच्यानें अधिक वेळ फिरवेना. डोळ्यांवर झांपड येऊं लागली. तेव्हां तेहि कल्याणीदेवीच्या जवळ येऊन बसले. थोड्याच वेळांत निद्रादेवीनें त्यांच्यावरहि आपला अंमल गाजविला. नग्न तरवार उशीखालीं घेऊन तेहि निद्रावश झाले.

प्रभात झाली. पक्षांचें कुंजन सुरू झालें. पूर्व दिशेकडील अंधार थोडथोडा ओसरूं लागला. तरी पण अद्यापि धर्मपाळ आणि कल्याणी गाढ झोपेंतच होतीं. प्राची दिक्वधूचा चेहरा आरक्त दिसूं लागला. वृक्षपर्णावरून दहिंवरबिंदू मौक्तिकाप्रमाणें ठिपकूं लागले, तरी पण त्यांची झोपमोड झाली नाहीं.

सूर्याचे किरण हळुहळू तापद होऊं लागले, तेव्हां कोठें धर्मपाळांची निद्रा भंग पावली. ते उठून पाहतात, तों त्या जनशून्य अरण्यांत विशाल नदीच्या कांठीं हिरव्याचार गवतावर कल्याणी अजूनहि गाढ निद्रासुख घेत आहे. गौडेश्वर डोळे चोळीत चोळीत हातांत नग्न तरवार घेऊन उठून

बसले. परंतु कल्याणीच्या सुन्दर मुखमंडलावरून त्यांची नजर कांहीं केल्या दूर होईना. कल्याणीचे निर्दोषमुख त्यांना भारीच सुन्दर दिसूं लागले. तिच्यासारखें देवदुर्लभ सौंदर्य त्यांना अन्यत्र आढळेना.

इतक्यांत बालसूर्याचे किरण कल्याणीच्या मिटलेल्या डोळ्यांवर पडून ती दचकून एकदम जागीं झाली. ती उठून पहातें तों धर्मपाळ आपणांकडेच टक लावून पहात आहेत असें तिच्या नजरेस पडलें. तेव्हां तर ती फारच लाजली. तिचे मुख लज्जेनें आरक्त झालें. तिनें तोंडावर पदर घेतला, धर्मपाळांनीं हें पाहून दुसरीकडे तोंड वळविलें.

आतां गौडेश्वरांची नजर दुसरीकडे गेली. तेव्हां जवळच विटांनीं बांधलेला एक विशाल घाट आहे असें त्यांस दिसून आलें. परंतु मार्गावर गवत वाढलें असल्यामुळें या घाटाचा उपयोग कोणी करीत नव्हतें. घाटा-जवळच एक मोठा पिंपळाचा वृक्ष होता. त्याखालीं किती तरी गळून सुकून, गेलेली पानें पडलेलीं होतीं. तो पिंपळाचा वृक्ष नजरेस पडतांच तें स्थळ आपण पूर्वी कधीं तरी पाहिलेलें असावें असें धर्मपाळास वाटूं लागले.

एका क्षणांतच त्यांना पूर्व गोष्टींचे स्मरण झालें.

पूर्वीही एकदां कल्याणीला घेऊन आपण जात असतां याच पिंप-ळाच्या झाडाखालीं उतरलों होतों याची त्यांस आठवण झाली.

याप्रमाणें एका मागूत एक साऱ्या गोष्टी त्यांच्या मनश्चक्षुंपुढें उभ्या राहिल्या. याच नदीच्या कांठीं त्या वेळीं एक उजाड गांव होतें. याचीही स्मृति झाली. त्या गांवचें पळून गेलेलें रहिवाशी आतां परत आले असतील तेव्हां तेथें आपणांस आश्रयस्थान मिळेल असे त्यांना वाटूं लागलें. त्यांनीं कल्याणीला उद्देशून विचारलें,–

" देवी ! आतां पायांतील वेदना कमी झाली ना ?"

अस्फुट स्वरांत कल्याणी उत्तरली, " होय."

" तर मग चालूं शकाल कां ?"

" हो, फार करून येईल चालतां आतां. "

" तर मग चला गांवांत जाऊं या. "

कल्याणी हळूहळू उठून उभी राहिली. धर्मपाळांनीं तिला पुनः प्रश्न

केला, " देवी ! हें स्थळ पूर्वी कधीं आपल्या पहाण्यांत आलेहो तें कां ? "

मंद स्वरांत कल्याणीनें उत्तर दिलें, " होय. "

"एके दिवशीं–एके–दिवशीं आपण याच ठिकाणीं आलों होतों नव्हे ?"

शरमून कल्याणीनें तोंडावरून पदर घेतला व ती खालीं पाहूं लागली.

धर्मपाळदेव हळूहळू पुढें चालूं लागले. कल्याणीहि त्यांच्या मागून सावकाश पण मोठ्या कष्टानें पावलें टाकीत चालू लागली. धर्मपाळदेवांनीं मागें वळून पाहिले तों कल्याणीला अजूनहि भारी वेदना होत असव्यात असें त्यांच्या लक्ष्यांत आलें. तेव्हां त्यांनी तिच्या हाताला धरलें. भावी पतीच्या खांद्याच्या आश्रयानें कल्याणी आतां मंद मंद पावलें टाकीत चालूं लागली. थोड्याच वेळांत दोघांनीहि गांवांत प्रवेश केला.

गांव अद्यापिहि जनशून्य होतें. अराजकतेचें निर्मूलन झालें होतें, तरीहि पळून गेलेलें नागरिक परत आले नव्हते. त्यामुळें धर्मपाळदेवांना भारी चिंता वाटूं लागली. कल्याणी नाइलाजास्तव जेमतेम चालत होती. खरी, पण अशा स्थितींत तिच्यानें जास्त चालणें झेंपण्यासारखे नव्हते. कल्याणीदेवीला एखाद्या गृहस्थाच्या घरीं ठेवून स्वतः गौडीय सैनिकाच्या शोधास जावें असा त्यांचा विचार होता. परंतु गांवात कोणीहि मनुष्य न आढळल्यामुळें त्यांना तसें करणें अशक्य होते. कांहीं वेळ चालल्यानंतर कल्याणी स्थिर उभी राहिली, तेव्हां ती थकली आहे असें समजून धर्मपाळदेव स्वतः हिरव्याचार तृणाच्छादित जमिनीवर बसले आणि तिलाहि त्यांनीं आग्रह करून आपल्या शेजारी बसवून घेतलें. आतां दिवसाचा प्रथम प्रहर होत आला होता. वसंत ऋतूचे दिवस असल्यामुळें सूर्यातापहि असह्य होऊं लागला होता, अत्यंत क्षुधाक्रांत होऊन कांहीं वेळानें गौडेश्वर म्हणाले, " देवी ! त्यावेळीं गांवांतून कांहीं फळफळावळ आपणांस मिळालें होते आपण थोडा वेळ येथेंच बसावें. मी गांवांत जाऊन कांहीं खावयास मिळालें तर पहातों. "

कल्याणीनें उत्तर दिलें, नाहीं, मी एकटी राहणार नाहीं. मला फार भय वाटतें. "

" मी कांहीं फार लांब जात नाहीं, लौकरच परत येतों. तुम्ही कोणा-

त्याहि प्रकारचें भय मनांत बाळगू नका. "

निरुपाय होऊन कल्याणीदेवी तेथेंच बसली व धर्मपाळदेव फळांच्या शोधार्थ जवळील वनांत शिरले. पण बराच प्रयत्न करूनहि खाण्याजोगें कांहीं न मिळाल्यामुळें गौडेश्वर मागें परतले. परंतु येतांच, कल्याणी त्यांना कोठें आढळेना. भयभीत होऊन धर्मपाळदेवांनीं चोहीकडे पुष्कळ तपास केला. परंतु कल्याणीदेवीचा पत्ता त्यांस लागला नाहीं. म्हणून ते मोठमोठ्यानें कल्याणीदेवीला हांका मारूं लागले; तथापि त्यास प्रत्युत्तर मिळाले नाहीं. तेव्हां ते तिचा शोध करीत करीत वसंतपुर गांवाच्या सीमेपर्यंत आले. इतक्यांत त्यांच्या पाठीवर एकाएकीं भयंकर जखमा झाली. ते मागें वळून पाहतात तों पाठींत कोणी तरी तीर मारला आहे. क्षणावकाशांत त्यांच्यावर आणखीहि तीरांची वृष्टि झाली व गौडेश्वर तेथेंच जमिनीवर बेभान होऊन पडले.

● ●

## ३६

संध्याकाळच्या सुमारास चिलखत धारण केलेला एक घोडेस्वार द्रुतवेगानें उत्तर दिशेकडून ढेकरी नगराकडे चालला होता. तो नगराच्या जवळ येऊन पोहोंचतांच त्याच्या घोड्यानें धाड्दिशीं जमिनीवर अंग टाकलें. तेव्हां स्वाराने अश्वाला त्या स्थितींत तेथेंच सोडले व तो धांवतच पुढें जाऊं लागला. नगरद्वारापाशीं तो येऊन पोहोंचतांच पहारेकऱ्याने त्यास विचाराले, " आपण कोठून आलांत ? "

आगंतुकाने उत्तर दिले, " गोकर्णदुर्गांतून. महाराज या नगरांत आले आहेत काय ? "

" कोणते महाराज ?"

" महाराज ते आणखी कोणते असणार ? आमचे महाराज, महाराजाधिराज परमेश्वर परमभट्टारक श्रीधर्मपाळदेव !"

" नाहीं, महाराजाधिराज गौडाधिपति येथें आलेले नाहींत."

" नगरांत यावेळीं कोणी महानायक आहेत का? "

" होय, कमळसिंह आहेत. "

" ते कोठें आहेत तें मला लवकर सांगा. "

" यावेळीं तें कोठें भेटतील तें मला सांगतां यावयाचें नाहीं व पहारा सोडून मला आपल्याबरोबर येतांहि येणार नाही, आपणच असे समोर राजमार्गावरून जा आणि त्यांचा शोध करा. "

इतक्यांत दुसरा पहारेकरी म्हणाला, " वा रे वा ! काय पण सरळ रस्ता दाखविला. अहो, तुम्ही असें करा. तुम्ही प्रथम उत्तर दिशेला चला, त्यानंतर पूर्वेकडे वळा. तेथून मग दक्षिण दिशेला वळसा घालून पश्चिमेच्या मार्गानें परत याच दरवाजावर या. राढदेशांतील हा सर्वांत सोपा रस्ता आहे. "

पहारेकरी थट्टा करीत आहे असे वाटून आगंतुक म्हणाला,

" हें पहा, मी जरूरीच्या राजकार्यासाठीं यावेळीं येथे आलेलों आहे. तुम्ही थट्टा करण्याचें सोडून मला अगोदर कमलसिंहाच्या तंबूचा अगर वाड्याचा पत्ता सांगा. नाहीं तर भयंकर प्रसंग ओढवेल. "

त्याच्या तोंडचे हें शब्द ऐकतांच दरवाजाजवळील चौकींतून एक वृद्ध पहारेकरी त्या ठिकाणीं आला. त्याला आलेला बघतांच इतर पहारेकरी अदबीनें बाजूला सरकले. त्यानें येतांच आगंतुकाला प्रश्न केला, " तुम्ही कोण ? कशासाठीं आलांत ?"

" मी गोकर्णदुर्गांतून आलों आहे. प्रभु आनंदानंदांनीं मला पाठविले आहे. तुम्ही जर मला महानायक कमलसिंहापाशीं नेऊन पोहोंचवाल तर मी फार आपला आभारी होईन. "

" या धामधुमीच्या काळांत दरवाजा सोडून कोठेंहि जाण्याची आम्हांला सक्त मनाई आहे. नाहींपेक्षां आम्हांपैकीं कोणीतरी तुमच्या बरोबर येता ! महानायक कमलसिंह मुख्य न्यायाधिशाचे येथें उतरलें आहेत. तुम्ही या वाटेनें उत्तर दिशेकडे जा आणि वाटेंत कोणाजवळ तरी विचारपूस करून न्यायाधिशाचा वाडा शोधून काढा. "

वृद्ध पहारेकऱ्यानें सांगितलेल्या मार्गानें आगंतुक चालूं लागला. कांहीं वेळानंतर तो विचारपूस करींत न्यायाधिशाच्या वाड्यांत येऊन पोहोंचला व तो त्या वाड्याच्या द्वाराकडे येऊन उभा राहिला. अंगणांत एक स्त्री सायंकाळच्या पूजेची तयारी करीत होती. आगंतुकानें तिला विचारलें,–

" वाड्यांत कोणी आहे का ?"

आगंतुकाचा कंठस्वर ऐकतांच रमणी चपापली. कंपित स्वरांत तिनें प्रश्न केला, " आपण कोण ?"

उत्तर मिळालें, " मी विदेशी आहे. न्यायाधिशांचा वाडा हाचना !"

दुसऱ्या खेपेस आगंतुकाचा कंठस्वर कानीं पडतांच त्या स्त्रीच्या हातांतील फुलांची परडी हातांतून निसटून खालीं पडली. व्याकुळ चित्तानें ती म्हणाली, " कोण आपण ? उभे का ? आंत या ना ?"

आगंतुकाचा कंठस्वर किंचित् कंपित झाला. तो म्हणाला, " मी एक गौडीय सेनानायक आहे. माझें नांव गुणवंत. "

" तर मग तुम्ही–तुम्ही तें–"

त्या स्त्रीच्या तोंडचे हें शब्द पुरतें ऐकून न घेतां आगंतुकानें मध्येंच विचारलें,–

" महानायक कमळसिंह येथेंच असतात का ?"

रमणीला मूर्च्छा येऊन ती जमिनीवर धाडकन् पडली.

बराच वेळ उत्तर मिळेनासें पाहून आगंतुक वाड्याच्या दुसऱ्या बाजूला जाऊन कमळसिंहाचा शोध करूं लागला. कमळसिंह यावेळीं विश्रांति घेत एका आसनावर बसला होता. आगंतुक त्यास अभिवादन करून त्याच्या समोर उभा राहिला. त्याला पाहून कमळसिंहानें विचारलें, "कोण तुम्ही?"

" प्रभु ! कान्यकुब्जाच्या दुर्गांत आपण मला पाहिल्याचें आठवत नाहीं का ?" आगंतुकानें उलट प्रश्न केला.

" होय. तें मला आठवतें. तुमचें नांव गुणवंत ना ? काय आणला आहे समाचार ?" कमळसिंहानें विचारलें.

" गोकर्णदुर्गांतून प्रभु आनंदानंदांनीं महाराजांच्या समाचारार्थ मला येथें पाठविलें आहे. महाराज येथें ढेकरींत आले आहेत ना ? "

" नाहीं, महाराज येथें आलेले नाहींत."

" तर मग गेलें कुठें ? महादेवी कल्याणीला घेऊन परवा महाराज गोकर्णाहून येथें यावयास निघाले होते. काल संध्याकाळपर्यंत पोहोंचल्याचा समाचार दूतामार्फत पाठविण्याचें त्यांनीं सांगितलेले होते."

" गुणवंत, मग महाराज गेले कुठें ? "

अत्यंत अस्वस्थ चित्तानें कमळसिंह उठून उभा राहिला. जवळच एक प्रतिहारी उभा होता. त्याला उद्देशून कमळसिंह म्हणाला, " रामसिंह, जा लौकर माझा घोडा घेऊन ये. गुणवंत, तुमच्या घोडा कुठें आहे ? "

" वाटेंतच थकून मृत्युमुखीं पडला."

" तर मग तुम्ही माझा घोडा घेऊन चला. बरें, पण महाराजांबरोबर अंगरक्षक किती होतें ? "

" फक्त पन्नास घोडेस्वार."

" तुमचें सैन्य कोठें आहे ? "

" अजय नदीच्या कांठीं. "

" तर मग तुम्ही माझ्या सैन्यापैकीं पांचशे स्वार घेऊन आतांच्या आतां महाराजांच्या शोधार्थ निघा."

गुणवंत प्रणाम करून शिपायाबरोबर निघून गेला. नंतर भीष्मदेव आणि जयवर्धनाला महाराजांचा शोध करण्यासाठीं निरोप पाठवावा म्हणून कमळसिंहानें एका दूताला पाचारण केलें. दूत तेथें येतों तोंच मुख्य न्यायाधीश डोकीस कांहींहि घातल्याशिवाय अनवाणीच त्या ठिकाणीं धांवत आला. कमळसिंह त्याला प्रणाम करणार, तोंच त्यास थांबवून न्यायाधीश त्रिलोकशंकर म्हणाला, " महाराज, ते कोठें आहेत ? "

" कोणाविषयीं आपण विचारतां ?"

" माझ्या भगिनीच्या पतीबाबत. "

" काय ? आपल्या शालकांविषयीं ? "

" होय, न्यायालंकार अखिल शास्त्रपारंगत असे माझे भगिनीपती येथें आले होतें ना ? "

" नाहीं, विद्याधर येथें आले नाहींत."

" पण माझी बहीण विमला सांगते कीं, ते नुक्तेच येथें येऊन गेले."

" नाहीं, न्यायमूर्ती ! गेल्या चार घटकांत कोणीहि ब्राह्मण पंडितानें माझी भेट घेतलेली नाहीं. "

" तर मग एखादा नवीन माणूस आपल्या भेटीला आला होता का ? "

" होय, आला होता, पण त्यांचें नांव गुणवंत ! गौडीयसेनेंत तो एक सेनानायक आहे."

" महाराज, त्याची चेहेरेपट्टी कशी काय होती ? "

" देव, त्याला मीं चिलखत असलेल्या स्थितींत पाहिलेले आहे. त्यामुळें चेहेरेपट्टीचें नीट वर्णन माझ्याच्यानें करवणार नाहीं."

" ठीक, पण तो गेला कोठें ? "

" आतांच शिपायाबरोबर छावणींत."

हें ऐकून मुख्य न्यायाधीश त्रिलोकशंकर उघड्या पायांनींच पागोटें न घालतां धांवत धांवत वाड्याबाहेर पडले. प्रतिहाऱ्याबरोबर जात असतांना वाटेंत मुख्य न्यायाधीशाच्या अंत:पुराच्या द्वारापाशीं अंमळ थांबून गुणवंतानें त्याला विचारले, " हें कुणाचें घर ? "

" हे मुख्य न्यायाधिशाचें अंत:पुर आहे."

" त्यांचें नांव ? "

" त्रिलोकशंकरशर्मा. "

त्रिलोकशंकरचें नांव कानांवर येतांच गुणवंत झपाझप पावलें टाकीत छावणीकडे निघाला; आणि क्षणावकाशांतच कमळसिंह फौजेंतील पांचशें स्वार घेऊन गौडेश्वराच्या शोधास गेला.

● ●

## ३७

सावध झाल्यानंतर धर्मपाळदेवांनीं पाहिलें, तों आपण एका अट्टा-लिकेच्या अरुंद अंधकारमय खोलींत पडलों आहोंत. त्या घरांत कोणीहि मनुष्य दिसत नव्हता; तरी पण घराची जीर्णद्वारें मजबूत रीतीनें बंद केलेलीं होतीं. शरीरावर झालेल्या अनेक जखमांतून बराच रक्तस्त्राव झाल्यामुळें धर्मपाळदेवांचीं वस्त्रें रक्तानें अगदीं भरून गेलीं होतीं.

गौडेश्वर उठून पाहतात तों आपली तरवार चोरीस गेल्याचें त्यांना दिसून आले. तेव्हां तें त्या खोलींत येरझाऱ्या घालूं लागले. हें घर जरी पुष्कळ दिवसांत माणसांनीं उपयोगांत आणलेलें दिसत नव्हते. तरी तेथें रहाणारे लोक श्रीमंत असावेंत असें अनुमान होत होतें. घराच्या खिडक्याहि मजबूत गजांनीं बंद केल्या होत्या. परंतु त्यांची कांहीं तावदानें फुटलीं होतीं. खिडक्यांच्या फटींतून अट्टालिकेच्या जवळील बाग दिसत होता. तें घर इतकें जुनाट होतें कीं, बाहेरील भिंतींतून कित्येक वड आणि पिंपळाचीं झाडें उगवलीं होतीं आणि त्यांच्या भारानें ती भिंत केव्हां कोसळून पडेल याचा कांहीं नेम नव्हता.

प्रयत्न केल्यास खिडक्यांतून पळून जातां येणें शक्य आहे असे पुष्कळ विचारांतीं धर्मपाळांना समजून आले. तेव्हां ते त्या प्रयत्नास लागले व जीर्ण खिडक्यांचे गज एकामागून एक तपासूं लागले.

घराच्या एका बाजूला खोलीच्या भिंतीलगतच एक मोठा पिंपळाचा वृक्ष होता. त्याच्या भारानें ती भिंत अगदी मोडकळीस आली होतीं. त्या बाजूच्या जीर्ण खिडकीचें गज अगदीं गंजून गेलेले असल्यामुळें तें उपटून काढावयाचा गौडेश्वर प्रयत्न करूं लागले. दोन तीन गज खिळखिळे झाले खरे, पण कांहीं केल्या तें वाकेनात. तेव्हां धर्मपाळांनीं त्यावर जोरानें लत्ता-प्रहार केला. त्यासरशीं एकामागून एक तीन गज खालीं बाहेरच्या बाजूस कोसळून पडले; आणि त्याबरोबर चार दोन विटाहि निखळून जमिनीवर कोसळल्या. तो आवाज ऐकून घराच्या बाहेरून कोणीसें मोठ्यानें दरडावून विचारले, “ कोण आहे ?”

कांहीहि उत्तर न देतां धर्मपाळ मुकाट्यानें बसून राहिले. प्रश्न विचारणारानें त्यानंतर विशेष चौकशी केली नाहीं. अर्ध्या घटकेनंतर त्यांनीं पुन: दुसरे गज उपटण्यास सुरवात केली. विटा पडल्यामुळें ते अगदीं शिथील झालेलें होतें. त्यामुळें सहजगत्या ते बाहेर निघालें, तेव्हां खिडकीद्वारे धर्मपाळदेव हळूच बाहेर पडले आणि बाहेरच्या पिंपळाच्या वृक्षाच्या डहाळ्यांस धरून लोंबकळूं लागलें.

त्या जागीं अट्टालिकेच्या भिंतींत उगवलेल्या पिंपळाच्या वृक्षाच्या डहाळ्या बागेंतील इतर वृक्षाच्या डहाळ्यांत अगदीं मिसळून गेल्या होत्या. तेव्हां गौडेश्वर त्या पिंपळाच्या वृक्षाच्या डहाळ्यावरून हळूच एका आंब्याच्या झाडावर चढले. तेथून सावकाश जमिनीवर उतरले. उतरल्यानंतर कांहीं वेळपावेतों तें स्तब्ध उभे राहिले, शेवटीं कोणाहि मनुष्याची चाहूल त्यांना न लागल्यामुळें ते हळूहळू त्या जीर्ण अट्टालिकेच्या चारी बाजूंना फिरूं लागले.

गौडेश्वराला अट्टालिकेच्या भोंवतीं कोणीही माणूस नजरेस पडला नाहीं. वृक्षपर्णे आणि डहाळ्या मात्र सभोंवार गर्द पसरल्या होत्या. चोहोंकडे प्रदक्षिणा करून झाल्यावर धर्मपाळदेवांनीं त्या भग्न खिडकींतून पुनः अट्टालिकेंत प्रवेश केला.

ते ज्या खोलींत पुन: आलें, तींत कोणीहि माणूस नव्हता, परंतु जवळपासच कोणीतरी गाढ झोपेंत घोरत असल्याचा आवाज त्यांना ऐकूं आला. तेव्हां चोरट्या पावलांनीं तें हलकेंच बाहेर येऊन बघतात तों एक सशस्त्र पुरुष पुढील दरवाजासमोर खुशाल झोपेत घोरत आहे.

त्याचा धनुष्यबाण आणि त्याची म्यान केलेली तरवार त्याच्या जवळच जमिनीवर पडलेलीं होती; आणि त्याच्या तोंडावर माशा घोंगावत होत्या. सुरापानामुळें तो बेहोष झालेला आहे असे धर्मपाळदेवांना दिसून आलें. तेव्हां त्यांनीं हलक्या पावलांनीं पुढें सरून त्याची सर्व शस्त्रास्त्रें हस्तगत करून घेतली व त्याचा गळा दाबून ते त्याच्या छातीवर चढून बसले. तेव्हां तो शुद्धीवर आला खरा; पण कांहीं बोलूं शकला नाहीं.

गौडेश्वरांनीं त्याच्या मुसक्या गच्च बांधून त्यांना ठेवलेल्या खोलींत आणून एका कोपऱ्यांत त्याला फेंकून दिलें.

ज्या खोलीच्या द्वारावर तो शस्त्रधारी पुरुष झोंपला होता, त्या खोलीचें द्वार बंद होते. धर्मपाळदेव त्या द्वारापाशीं जाऊन हळूच हांक मारूं लागले. " कल्याणीं ! "

खोलींतून जबाब मिळाला. " हं ! काय आहे ?"

तो कंठस्वर कल्याणीचाच हें धर्मपाळदेवांनीं लगेच ओळखलें. तेव्हां ते तिला धीर देण्याच्या उद्देशानें म्हणाले, " भिऊं नको, कल्याणी ! मी धर्मपाळ आहे."

कल्याणी खोलीच्या दारापाशीं येऊन उभी राहिली. तिच्या पावलांचा आवाज ऐकून धर्मपाळदेव म्हणाले, " या ठिकाणीं कांहींही बोलूं नको. द्वाररक्षकाला मीं बांधून टाकलेले आहे. पण मला वाटतें आणखीही एक-दोघे पहारेकरी इकडे असावेत. मी बाहेरून दरवाजा उघडण्याचा प्रयत्न करतों. तुम्हीहि आंतून उघडतो कीं नाहीं ते पहा."

शेवटीं दोघांच्या प्रयत्नानें दरवाजा उघडला गेला. कल्याणी भिऊन म्हणाली, " ते दुष्ट येतील कदाचित् इतक्यांत; तेव्हां आपण येथून लौकर निसटून जावें हें बरें ! "

कल्याणीच्या सर्वांगावर ठिकठिकाणीं जखमा झालेल्या पाहून धर्मपाळ-देवांना भारी अचंबा वाटला. तिची वस्त्रेंही फाटून गेली होतीं; आणि मस्तकावरील केंस विखुरले होते. हळूहळू दोघें त्या घरांतून बाहेर पडून नजीकच्या झाडींत लपून बसलीं. अधीर होऊन कल्याणी आतां रडावयास लागली. धर्मपाळदेवांनीं मोठ्या प्रयासानें तिचें सांत्वन करून विचारलें, "ते दुष्ट इतक्यांत येतील असें जे आपण नुकतेंच म्हटलें तें कोणाविषयीं ?"

" दरोडेखोरांबद्दल ! "

" ते गुर्जर सैनिक आहेत काय ?"

" नाहीं, ते गौडीयच आहेत. पण त्यांच्याबरोबर एक गुर्जरही आहे."

" त्या गुर्जराला कांहीं बोलतांना तुम्हीं ऐकिलें आहे काय ?"

" होय. तो गुर्जर सेनापतीचा दूत आहे. गुर्जरांनीं दरोडेखोरांना

द्रव्य चारून वश केलेलें आहे आणि त्यांच्याकडून देशांत लुटालूट चालविलेली आहे. ''

'' तर मग आपण गुर्जर सेनेच्या हातीं सांपडलों नव्हतों तर ?''

'' नाहीं संध्याकाळपावेतों जर आपण त्याच ठिकाणीं बंदींत असतो, तर नक्की त्यांच्या हातीं लागतों. कारण कीं, गुर्जरसेना आज संध्याकाळीं या वनांत तळ देणार आहे.''

'' कल्याणी ! मी ज्या वेळीं वनांत फळें आणावयासाठीं गेलों, तेव्हां तुम्ही कोठें गेलां होतां ? ''

'' मला भय वाटलें म्हणून मी वनांत दडून बसावयास जात होतें. इतक्यांत एका दरोडेखोरानें झाडींतून पुढें येऊन मला धरलें. मी त्याच्या हातून स्वतःच्या सुटकेसाठीं झटापट करीत असतांना माझी ही अशी दशा झाली. ''

इतकें म्हणून कल्याणीदेवीनें स्वतःस झालेल्या जखमा धर्मपाळदेवांना दाखविल्या. नंतर ती म्हणाली, '' त्यावेळीं मला आपली आठवण येऊन रडें कोसळलें. ''

'' माझी तुम्हांला कां म्हणून आठवण झाली, कल्याणी ? ''

धर्मपाळदेवांच्या छातीवर मान टेंकून अस्फुट स्वरांत कल्याणी उत्तरली, '' तें मला माहित नाहीं. ''

पुनः धर्मपाळदेवांनीं विचारलें, '' त्या नंतर काय झालें ? ''

कल्याणीदेवीनें पदराआड मान खालीं घालून म्हटलें, '' मला रडतांना पाहून दरोडेखोरानें माझें तोंड गच्च आंवळून धरलें.''

'' नंतर ? ''

'' नंतर आपणांला दुरून येतांना पाहून दरोडेखोरांनीं आपणांवर तीरांचा वर्षाव केला. त्यामुळें आपण बेशुद्ध होऊन जमिनीवर पडलांत. कांहीं वेळानंतर दोघां दरोडेखोरांनीं आपणांला उचलून त्या जीर्ण घरांत आणून टाकलें. मी सुद्धां बेभान होऊन पडलें होतें. जेव्हां शुद्धीवर आलें तेव्हां पहातें तों रात्र पडलेली आहे.''

'' तर मग सबंध एक दिवस लोटला म्हणावयाचा ? ''

" होय, तुम्ही बेशुद्ध होतां त्यामुळें हें तुमच्या लक्षांत आलें नाहीं."

" कल्याणी ! कांहीं खाल्लें आहेस का ? "

कांहींही उत्तर न मिळाल्यामुळें ही सबंध दोन दिवसांची उपाशी आहे हें धर्मपाळदेव समजून चुकले. नंतर दोघे त्या निबिड वनांतून हळू-हळू पुढें जाऊं लागलीं कांहीं वेळानंतर वनाच्या अंतर्भागांतून वाहत जाणाऱ्या एका ओढ्यापाशीं तीं येऊन पोहोंचलीं. तेथें यथेच्छ पाणी पिऊन दोघांनींही आपली तृष्णा शमविली. आता त्यांच्या जीवाला अंमळ हुषारी वाटून दोघेही विश्रांति घेत त्याच जागीं बसली.

संध्याकाळ होत आहे असें पाहून सुकीं लांकडें, गवत आणि वाळलेली पानें जमवून धर्मपाळदेव कल्याणीसाठीं एक छोटीशी पर्णकुटिका उभार-ण्याच्या उद्योगास लागले. त्या उद्योगांत दोघेही मग्न असतां मागाहून कोणाची तरी चाहूल त्यांना लागली. तेव्हां मागें वळून धर्मपाळदेव उभे राहिले आणि पाहतात तों चिलखत धारण केलेला एक सशस्त्र सैनिक उभा ! सैनिकानें सम्राटांना अभिवादन करीत म्हटलें, " गौडाधिपतींचा विजय असो ! "

आपली तरवार म्यानांतून बाहेर काढीत धर्मपाळदेवांनीं विचारलें, " तुम्ही कोण ? "

" महाराज, सेवकाचें नांव गुणवंत आहे. मी गौडीय सेनेचा एक सेनानायक आहें. "

क्षुधित, श्रांत आणि निराश झालेल्या गौडेश्वरांनीं सैनिकाला कड-कडून आलिंगन देत म्हटलें, " कोण गुणवंत ? "

बोलतां बोलतां त्यांचा कंठ भरून आला. इतक्यांत त्या निर्जन वनांत एकच जयध्वनि ऐकूं आला. विस्मयचकित होऊन सम्राटांनीं विचारलें, " काय हकीकत आहे, गुणवंत ? "

" महाराज," गुणवंत नम्रपणे म्हणाला, " पांचशें सैनिक घेऊन मी महाराजांच्या शोधार्थ निघालों होतों. वनांत हें सारें सैन्य आपलाच शोध करीत आहे; असें करतांना शत्रूच्या एखाद्या सैन्याची गांठ पडून झटापट झालीसें दिसतें. हा जयध्वनि त्यांचाच ! "

" तळ कोठें दिलेला आहे ? "

" नदीच्या उत्तर कांठीं. "

" माझ्याबरोबर महादेवी कल्याणी आहेत. त्यांना तेथून कसें नेणार ?"

" त्यांच्यासाठीं पालखी आणली आहे, महाराज !"

त्रिवर्ग चालत चालत पालखी असलेल्या जागीं आली.

● ●

## ३८

एकाएकीं युद्धाची समाप्ति झाली. गुर्जरसेना जेव्हां जवळजवळ गंगेच्या कांठीं जाऊन पोहोंचली, तेव्हां कां कोण जाणे,–एकाएकीं तीं पश्चिम दिशेस मागें परतलीं असें वृत्त गौडीय सेनापतींच्या कानी येतांच त्यांस भारी नवल वाटलें, राढ आणि वरेंद्रची सगळी फौज शत्रूंवर आक्रमण करण्याचें सोडून अशाप्रकारें मागें कां परतली हें एक गूढ होतें. परंतु नगर आणि दुर्ग सोडून त्यांचा पाठलाग करण्याचें साहस गौडीय सेनापतींच्या हातून झालें नाहीं. वचनपाळ मात्र एकटाच काय तो शत्रूंच्या मागे लागला.

गुणवंत ज्या दिवशीं गौडाधिपति आणि भावी पट्टमहादेवी कल्याणी देवीला घेऊन ढेकरी नगरांत परत आला, त्या दिवशीं गुर्जरसेना गौड, अंग आणि मगधदेश सोडून करुप देशास निघून गेली होती. दोन दिवसानंतर वचनपाळाकडून निरोप आला कीं, शोणनदी उतरून जातांना गुर्जर सेनेशीं आपली झटापट झाली. युद्धाच्या ऐन वेळेस जयवर्धन आणि भीष्मदेव येऊन पोहोंचल्यानें गुर्जरसेना पराभूत झाली आणि त्या सैन्यापैकीं पुष्कळांस बंदिवान करण्यांत आलें.

धर्मपाळ आणि कल्याणीला घेऊन गुणवंत जेव्हां ढेकरीला परत आला, तेव्हां महाराजाधिराज गौडाधिपति नूतन पत्नीसह नगरांत आलेले आहेत ही गोष्ट जगजाहीर झाली. तेव्हां राजाराणीच्या दर्शनार्थ हजारों स्त्री–पुरुष उंची वस्त्रांभूषणांनीं नटूनथटून राजमार्गावर जाऊन उभे

राहिले. त्यांनीं उभयतांवर पुष्पवृष्टि केली आणि घरोघरीं गुढ्यातोरणें उभारण्यांत आली. कर्दलीस्तंभांच्या मंडपांनीं प्रत्येक घराचे अंगण शोभूं लागलें. महाराजाधीराज गौडाधिपतींचा विवाह झाला आहे असें सर्वांना वाटलें. खुद्द कमळसिंहाचीसुद्धां अशीच समजूत झाली.

सम्राटांना उतरण्यास योग्य असा वाडा ढेकरी नगरांत नसल्यामुळें नगराबाहेर एक विस्तीर्ण तंबू ठोकण्यांत आला. कल्याणीला मात्र मुख्य न्यायमंस्थाच्या वाड्यांत ठेवण्यांत आले. ज्या दिवशीं गौडेश्वर ढेकरी नगरांत येऊन पोहोंचले; त्या दिवशीं संध्याकाळीं कमळसिंह तंबूंत त्यांच्याशीं बोलत बसला होता. तो म्हणाला,

" महाराज ! ज्या अर्थी आपण आतां कल्याणीचे पाणीग्रहण केलें आहे, त्या अर्थी नात्यानें आपण माझे शालक बनला आहांत. लग्नाचा सुखसोहळा पाहून झाल्यावरच पूज्य काकीचा स्वर्गवास झाला हें एकपरी ठीकच झालें म्हणावयाचे ! "

विस्मयानें धर्मपाळदेवांनीं प्रश्न केला, " काय बोलतां हें आपण ? गोकर्णच्या दुर्गस्वामिनी मरण पावल्या कीं काय ?"

" होय, आपणांला हा समाचार नाहीं का कळला ?"

" नाहीं. "

" तर मग कल्याणीदेवीलासुद्धां मातृनिधनाची गोष्ट माहीत नाहीं काय ?"

" नाहीं. "

" गुणवंतानें हें वृत्त आपणांला नाहीं का सांगितलें ?"

" नाही. तो या बाबतींत माझ्यापाशीं कांहींच बोलला नाहीं. दुर्गस्वामिनी कशा रीतीनें मरण पावली ?"

" महाराज ! शत्रूंच्या सैन्यापासून दुर्गाचा बचाव करीत असतांना आपल्या सासूनें धारातीर्थी देह ठेविला. "

" तर मग गोकर्णदुर्ग शत्रूंच्या ताब्यात गेला कीं काय ?"

" नाहीं, माझ्या स्वर्गस्थ काकी संन्याशी आनंदानंद आणि सेनापती गुणवंत यांच्यासह दुर्गाच्या तटावर चढून सैनिकाना प्रोत्साहन देत उभ्या

होत्या. त्या वेळीं त्यांच्या हातांतील नग्न तरवार विजेसारखी तळपत होतीं. इतक्यांत एकाएकीं शत्रूसैन्यांतून एक बाण येऊन त्यांच्या वर्मी बसला व त्या हा इहलोक सोडून गेल्या.

हा समाचार आपल्या कानांवर घालण्यासाठीं गुणवंत ढेकरीला आला होता. मला पण त्याच्याच तोंडून ही हकिकत समजली.

" पण माझ्यापाशीं तर तो कांहींच बोलला नाहीं. बरें, पण आतां तो कोठें आहे ?"

" आपण नगरांत प्रवेश केला, तेव्हां तो आपणाबरोबरच होता ना ? "

" होय, पण त्यानंतर मी कांहीं त्याला पाहिले नाहीं. "

" मग मी त्याच्या तपासाला जाऊं कां ? "

" नको, तुम्ही येथेंच बसा. आपण दुसऱ्या कोणाला तरी पाठवूं."

गौडाधिपतींच्या आज्ञेनें एक दंडधर तंबूंत आला. धर्मपाळदेवांनीं त्याला गुणवंताच्या शोधार्थ पाठविलें. तो गेल्यावर गौडेश्वर म्हणाले,–

" महानायक ! तुम्हीच आतां महादेवीचे निकटचे संबंधीं आहांत; तेव्हां मातृनिधनाचें हें वृत्त तुम्हीच तिच्या कानांवर घाला. "

कमळसिंह म्हणाला, " महाराज ! कल्याणी मुख्य न्यायमंत्री त्रिलोकशंकरच्या वाड्यांत आहे. तेव्हां ही गोष्ट त्यांची पत्नी अगर भगिनी या दोहोंपैकीं कोणीतरी तिच्या कानांवर घातल्यास बरें होईल. "

गौडाधिपतींच्या आज्ञेनें लगेच दुसरा एक दंडधर मुख्य न्यायमंत्री त्रिलोकशंकर यांस बोलावून आणावयास गेला. धर्मपाळांनीं नंतर कमळसिंहास प्रश्न केला, " आतां गोकर्णची व्यवस्था काय करावयाची ? "

" तें मी काय सांगूं महाराज ! गौडेश्वरांची पट्ट महादेवी कल्याणी आतां गोकर्णदुर्गाची स्वामिनी आहे. तिचा प्रतिनिधी या नात्यानें कोणाची तरी तेथें नेमणूक करावी लागणार. "

धर्मपाळ कांहींहि उत्तर न देतां विचारमग्न झाले. कांहीं वेळानंतर वर्धमानभुक्तीचे मुख्य न्यायाधीश त्रिलोकशंकरशर्मा सम्राटांची भेट घेऊं इच्छित आहेत असें एका दंडधऱ्यानें येऊन सांगितलें. सम्राटांनीं त्यांस आंत

घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां हातांत श्रीफळ घेऊन त्रिलोकशंकर-शर्मा त्यांच्या सन्मुख येऊन उभे राहिले. धर्मपाळांनीं त्यांस आपल्या बाजूस बसवून घेतलें व तें म्हणाले,–

" न्यायमूर्ती ! आज एका अगत्याच्या कामासाठीं मीं आपणांस बोलावून आणलें आहे आपल्या कुटुंबांत तर सर्व क्षेम आहे ना ?"

" महाराज ! गेल्या दोन वर्षापासून मी मोठ्या मानसिक चिंतेंत दिवस कंठीत आहे."

" कां बरें ? "

" महाराज ! गुर्जरयुद्धाच्या सुरवातीला माझे भगिनीपती विद्याधर न्यायालंकार गृहत्याग करून कोठें बेपत्ता झालेले आहेत."

" त्यांचा अद्यापि शोध लागलेला नाहीं; मात्र विद्याधर गौडाधि-पतींच्या सैन्यात राहिलेले आहेत एवढेंच समजलें आहे, हा समाचार कळ-तांच महामंत्री गर्गदेव आणि महाकुमार वाक्पाळ यांना मी त्यांचा शोध करावयास आग्रपूर्वक विनंति केली होती. पण अद्यापि कोठेंच शोध लागत नाहीं. महाराजांच्या गुणवंतनामक सेनानायक नुकताच गोकर्णहून ढेकरीला महाराजांच्या शोधार्थ येऊन केला. तो कमळसिंहाची चौकशी करीत माझ्या वाड्यांत आला होता. तेव्हां बहिणीनें त्याचा स्वर ओळखला. तो विद्याधरच असला पाहिजे."

" महानायक, गुणवंत ब्राह्मण आहे का ?" धर्मपाळदेवांनीं विचारलें.

कमळसिंहानें उत्तर दिलें. " उद्धवघोषाच्या तोंडून मी तसें ऐकलें आहे खरें !"

" विद्याधर न्यायालंकारानीं न्यायशास्त्र सोडून हात.त तरवार धारण करण्याचें काय प्रयोजन ? "

" महाराज ! विद्याधरांचे माझ्या बहिणीवर अतोनात प्रेम होतें. तिला सोडून द्रव्योपार्जन करावयास घराबाहेर जाणें त्यांच्या जिवावर येई. परंतु दुर्दैवानें एके दिवशीं माझ्या पत्नीच्या अंगावर नवीन अलंकार पाहून माझ्या बहिणीनें त्यांच्यापाशीं दागिन्यांचा हट्ट घेतला. पण तो पुरा कर-ण्याचे सामर्थ्य त्यावेळीं त्यांच्या अंगीं नव्हतें. त्यामुळें दुःखानें आणि शोधा-मुळें त्यांनीं गृहत्याग केला."

" पण गुणवंत तर घोड्यावर बसण्यांत आणि शस्त्र वापरण्यांत भारी पटाईत आहे. त्यामुळें तो ब्राह्मण असेलसें वाटत नाहीं. " धर्मपाळदेवांनीं शंका प्रदर्शित केली.

" महाराजाधिराज ! स्वर्गस्थ गौडाधिपतिमहाराज गोपाळदेवांच्या आरंभींच्या कारकीर्दीत जेव्हां देशांत अराजकता माजली होती, तेव्हां गौडबंगालचे नागरिक आत्मरक्षणार्थ अस्त्रविद्या शिकूं लागले होते. विद्याधर घोड्यावर बसण्यांत कुशल आहे. एवढेंच नव्हे, तर धनुर्विद्येंत त्याचा हात धरणारा कोणीहि नसेल. त्यानें आपल्या तरवारीचें पाणी पुष्कळदां शत्रूला पाजलेलें आहे. "

" त्याचा चेहरा कसा काय आहे ? "

कमळसिंह म्हणाला, " महाराज ! गुणवंत नेहमीं चिलखत धारण करून असतो हीं गोष्ट महाराजांच्या ध्यानांत नाहीं वाटतें ?"

" होय; आणि तो फारसा बोलतहि नाहीं. "

इतक्यांत स्वामी विवेश्वरानंद आणि उद्धवघोष दक्षिणापथांतून परत आलेले आहेत व राष्ट्रकूटराज गोविंदानें गौडेश्वरांशीं मैत्रीचा तह करून गुर्जरराज्यावर चाल केलेली आहे असें एका दूतानें येऊन कळविलें.

कमळसिंह मंद हास्य करून म्हणाला, " महाराज ! राष्ट्रकूटराज गोविंदांनीं ज्याअर्थी इतक्या दिवसांनंतर हातांत शस्त्र धारण केलें आहे, त्याअर्थीं अवश्य आपला जय होणार ! "

निस्तेज मुखानें धर्मपाळदेव म्हणाले, " महानायक, शेवटीं साह्य मिळालें खरें, परंतु बौद्धसंघानें मला जो ऐन वेळीं दगा दिला, तो मी कधींहि विसरणार नाहीं. "

इतक्यांत सेनानायक गुणवंत छात्रणींत नसून त्यांचा कोठेंच पत्ता लागत नाहीं असें दुसऱ्या एका दंडधाऱ्यानें येऊन सांगितलें तेव्हां गौडेश्वर हलकेंच म्हणाले, " न्यायमूर्ती ! विद्याधर गुणवंत या नांवानें जर खरो-खरीच सैन्यांत राहिला असेल, तर नक्की मी त्याचा शोध लावीन; मात्र एक दोन दिवसांचा विलंब लागेल. आतां मी आपणांला कां बोलावून आणलें तें ऐका, ढेकरीला आल्यानंतर मला कल्याणीच्या मातेचा स्वर्गवास

झाल्याचें कळलें. कल्याणी दुर्गस्वामिनीची एकुलती एक कन्या. तेव्हां मातृ-वियोगाचें तिला असह्य दुःख वाटणारच; म्हणून आपण आपल्या पत्नीच्या अगर भगिनीच्या द्वारें हा समाचार तिच्या कानांवर घालवावा."

कांहीं वेळ खालीं मान घालून विचार केल्यानंतर त्रिलोकशंकर म्हणाले, "हें कार्य बरेंचसें कठीण आहे. तरी पण सम्राटांच्या आज्ञेप्रमाणें सर्वव्यवस्था होईल."

इतकें म्हणून मुख्य न्यायमंत्री तेथून निघून गेले. धर्मपाळांनीं नंतर कमळसिंहाल प्रश्न केला, "महानायक गुणवंत कोण ?"

"समस्या."

"पूर्ति कोण करील ?"

"प्रेम."

● ●

## ३९

संध्याकाळीं राजमार्गाजवळ आलेल्या एका आमराईत असलेल्या तंबूंत भगवीं वस्त्रें धारण केलेला एक संन्याशी हातांत भाला घेतलेल्या एका योद्धयाशीं बोलत बसला होता. तें दिवस ग्रीष्मऋतूचें असल्याकारणानें तंबूंत भारीच उकाडा होत होता. तंबूच्या आसपास थोड्या दूर अंतरावर झाडाखालीं शेंकडों सैनिक आणि परिचारक स्वयंपाक करण्यांत गुंतलें होते. तंबूच्या चौफेर चार शस्त्रधारी पहारेकरी पहारा करीत फिरत होतें. हातांत लांब भाला धारण केलेला योद्धा म्हणाला.

"प्रभु ! आयुष्यांतील माझ्या सर्व कामना आतां पुऱ्या झाल्या आहेत. मात्र एकच इच्छा काय ती अपुरी राहिलीं आहे."

"कोणतीं ?" संन्याशानें विचारलें.

"कल्याणीच्या विवाहाची. तिला गौडेश्वराला अर्पण केल्यावर खुशाल मला मरण येवो. !"

" तुमचें म्हणणें योग्य आहे. आतां युद्ध लवकरच संपेल. कल्याणीच्या विवाहास यांपुढें विलंब लागणार नाहीं. "

" प्रभु ! ज्योतिषशास्त्रांत आपली विलक्षण गति आहे, असे मी पुष्कळ दिवसांपासून ऐकत आलों आहे, तेव्हां कृपा करून कल्याणीचे लग्न नक्की कधीं होईल तें सांगा. आणखी माझाहि अंतकाल केव्हां होणार तेंहि कळूं द्या. "

मंदहास्य करून संन्याशानें उत्तर दिले, " कल्याणीला पाहिल्याशिवाय तिच्या भाग्यांत काय आहे, तें मला कसें सांगतां येणार ! आपण प्रथम स्वदेशी जाऊं व नंतर तिला पाहून काय तें सांगेन. "

" तर मग माझें मरण कधीं तें तरी सांगा. "

" ठीक. तुम्ही असें माझ्याजवळ या. "

वृद्ध योद्धा संन्याशाच्या अगदीं जवळ येऊन बसला. बराच वेळपर्यंत त्याचा हात पाहिल्यानंतर संन्याशी म्हणाला, " उद्धव ! कल्याणीचा जन्म कधीं झाला तें तुमच्या स्मरणांत आहे का ?"

" होय; ज्या अर्थी आषाढ महिन्यांत भयंकर झंझावात सुटून धरणीकंप झाला, त्याच वर्षीं धरणीकंप झाल्यानंतर सुमारें अर्ध्या तासानें कल्याणी जन्मली. "

संन्याशानें उद्धवाचा हात सोडून दिला आणि झाडाची एक सुकलेलीं डहाळी घेऊन जमिनीवर कांहीं रेघोटया मारावयास सुरुवात केली. कांहीं वेळानंतर तो म्हणाला.

" उद्धव ! कल्याणीचे लग्न होऊन चुकलें आहे. "

" प्रभु ! ही गोष्ट असंभवनीय दिसतें. माझ्या गैरहजेरींत तिचे लग्न कसें होणार ?"

" तें कसेंहीं असो ! पण कल्याणीचें लग्न झालें आहे. "

इतक्यांत त्या आंम्रकुंजांत कोमल कंठांतून निघालेलें एक करुणाजनक संगीत ऐकूं आले. तो संगीतध्वनि हळूहळू जवळजवळ येत चालला. उद्धवघोषानें पाहिले तों कृष्णवर्ण, मलीनवस्त्रें धारण केलेला व शरीरानें अत्यंत कृश असा मुलगा उत्तर दिशेनें जात आहे.

उद्धवघोष आणि संन्याशी विश्वेश्वरानंद ज्या मार्गानें गौडास चालले होते त्याच मार्गानें मुलगाही जात होता; मार्गांत पुष्कळ दरिद्री भिकाऱ्यांचीं गाणीं त्यांच्या कानांवर आलीं होतीं. परंतु इतकें कर्णमधुर गायन त्यांनीं पूर्वी कधींच ऐकलेलें नव्हतें, विश्वेश्वरानंद आणि उद्धवघोष तो कंठस्वर ऐकून अगदीं मुग्ध झाले.

छावणीच्या नजीक येतांच मुलगा राजमार्ग सोडून तंबूकडे यावयास लागला. जवळ येऊन तो तंबूसमोर उभा राहिला आणि दुसऱ्या गायनास त्यानें सुरुवात केली. तें गायन समाप्त होतांच झोळींतून भिक्षापात्र काढून तो म्हणाला.

" महाराज, भिक्षा घाला. "

संन्याशी म्हणाला, " मुला, अगोदर इकडे ये पाहूं. "

हें ऐकून मुलगा त्यांच्यापाशीं येऊन उभा राहिला. विश्वेश्वरानंदानें विचारलें, " मुला, तूं कोण आहेस ?"

" भिकारी. "

" तुझें नांव काय ?"

" काणा. "

" दुसरें एखादें नांव आहे का तुला ?"

" नाहीं, सर्वजण मला याच नांवानें हांक मारीत असतात. "

" बरें, तूं रहाणार कोठचा ?"

" भिकाऱ्याला कसलें आलें आहे घर नि दार ?"

" पण पूर्वीं तूं कोठें रहात होतास ?"

" माझी आई म्हणत असे कीं, आम्ही कोणच्याशा गांवांत राहात होतो. "

" त्या गावाचें नांव ?"

" माहीत नाहीं. "

" सध्यां तूं कोठें चालला आहेस ?"

" गौडास. "

" आवाजावरून तूं गौडीय असावेसें दिसतें. गौडनगरांत तूं रहात होतास का ?"

" तें मला ठाऊक नाहीं. पण गौडाचें नांव ऐकतांच आई मात्र रडत असे. "

" तुझ्या आईनें भिक्षा मागण्याचा धंदा का स्वीकारला ?"

" माझे वडील निवर्तल्यामुळें पोटासाठीं भिक्षा मागत फिरणें तिला भाग पडलें."

" तुझें दुसरें कोणी नातेवाईक नव्हतें काय ?"

" तें मला माहीत नाहीं; पण तुम्ही मला भिक्षा देतां ना ?"

" होय; पण असें तूं कां विचारलेंस ?"

" पुष्कळजण अशी माहिती विचारतात आणि नंतर मग-भिक्षा न देता हांकून लावतात. "

" तुझें वडील कोणता धंदा करीत तें तुला माहीत आहे काय ?"

" होय; तें राजाच्या सैन्यांत नोकरीस होते. युद्धांत ते मारलें गेले."

" पुढें ?"

" पोटासाठीं आई मला घेऊन दारोदार भिक्षा मागूं लागली. गांवांतील लोक वारंवार भिक्षा देण्यास कुरकुर करूं लागले. तेव्हां गांव सोडून देशोदेशीं भटकणें आम्हांला भाग पडलें. "

हें शब्द ऐकून वृद्ध उद्धवघोपाचें डोळे पाण्यानें भरून आले. विश्वेश्वरानंदहि सद्‌गदित झाले. त्यांनीं विचारले, " राजानें तुमच्या पोटापाण्याची कांहींच कां तजवीज केली नाहीं ?"

" ज्या राजाखातर माझे बाबा युद्धांत मारले गेले, त्यांचा युद्धांत पराजय झाला. "

" मग आतां तुम्ही गुजराण कशावर करतां ?"

" भिक्षेवर. एखाद्या दिवशीं भिक्षा मिळतें तर एखादे दिवशीं मिळत नाहीं. ज्या दिवशीं भिक्षा मिळत नाहीं, त्या दिवशीं कोण जाणें ! कोठुनसें मला खावयास मिळतें. जेव्हां मला तहान लागतें, तेव्हांहि कुणी तरी मला नदीकांठीं आणून सोडतें. कुणी तरी मला मार्ग दाखवीत आहे आणि लांब अन्तरावरून कुणी तरी मजबरोबर चालत आहें असाच जणूं मला भास होतो. मी त्याला धरण्यासाठीं सारा दिवस धडपड करतों; पण

व्यर्थ ! छायाच काय ती मला दिसतें; पण प्रत्यक्ष त्याची व माझी कांहीं गांठ पडत नाहीं. "

वृद्ध विश्वेश्वरानंदाच्या नेत्रांतून टपटपा अश्रूबिंदु गळू लागले. त्यांनीं त्या अंध मुलाला आपल्या हृदयाशीं गच्च धरले. मुलानें विस्मयानें आपलें दृष्टिहीन नेत्र त्यांच्याकडे वळविलें. विश्वेश्वरानंद म्हणाले,—

" वत्सा ! मी गौडीय आहे—संन्याशी आहे. कोंवळ्या वयांत तूं किती तरी कष्ट सहन केलेले पाहून मला तुझी भारी कींव येतें. तूं मजबरोबर गौडास चल. मी तुझ्या पोटापाण्याची सोय करीन. "

आश्चर्यचकित होऊन संन्याशाच्या मुखाकडे पहात तो अंध मुलगा म्हणाला, " तुम्हीं असें कां बरें सांगतां ? पुष्कळजण मला माझी हकिकत विचारतात व त्यांना मी ती सांगतोंहि ! कोणी मला भिक्षा देतात व कोणी हांकूनहि देतात. पण आपणांसारखी माझी दया कोणालाहि आलेली नाहीं. "

जोरानें मुलाला आपल्या हृदयाशीं धरून स्वामी विश्वेश्वरानंद म्हणाले, " मुला मजबरोबर गौडास चल. "

अंध मुलानें वेडेंवांकडे तोंड करून म्हटले, " मी गौडाला जाणारच आहें. पण एव्हांच नाहीं. "

उद्धवघोष खालीं मान घालून मधून मधून डोळे चोळींत होता. त्यानें विस्मयानें वर पाहून म्हटलें, " आताच कां नाहीं ? "

मुलानें उत्तर दिलें, " मी एका म्हाताऱ्याला मार्ग दाखवीत गौडाला घेऊन जात आहे. मी जर त्याच्याबरोबर नसेन तर अन्नाच्या अभावीं तो पटकन् मरेल. "

विश्वेश्वरानंद मंद हास्य करून म्हणाले, " मुला तूंच स्वत: आंधळा असतांना दुसऱ्याला वाट कशी दाखविणार ? "

" तो एक म्हातारा माणूस आहे. त्याला धड चालवतसुद्धां नाहीं. आपण प्रायश्चित्त घेण्यासाठीं गौडाला चाललों आहोंत असें तो सांगतो. मला जो मार्ग दिसत आहे, तो त्याला दिसत नाहीं; कां म्हणून त्याला दिसत नाहीं तें मला सांगतां येत नाहीं. "

" कां बरें असें ? याचे कारण काय ?"

" तो म्हणतो कीं, मी महापापी आहें. त्याच्यामुळें लाखों माणसांची नासाडी झालेली आहे."

" त्याला येथें घेऊन ये म्हणजे त्यालासुद्धां गौडाला बरोबरच नेऊं."

विश्वेश्वरानंदांच्या बाहुपाशांतून मुक्त होऊन मुलगा आपल्या वाटेनें चालूं लागला. उद्धवघोष व्याकुलचित्तानें त्याला म्हणाला, " चल, मी तुला वाट दाखवितों."

मुलानें उत्तर दिलें, " नको, वाट दाखविण्याची कांहीं जरूरी नाही. तो छायेप्रमाणें माझ्या पुढें पुढें चालत आहे; त्या रोखाने मी आपोआप जाईन."

" मुलगा गात गात तेथून चालता झाला. उद्धवघोष मनाशींच पुटपुटला, " अहाहा ! किती हें मधुर गायन !"

विश्वेश्वरानंद कांहींहि उत्तर न देता मुलगा गेला त्या दिशेकडे पहातच राहिले कांहीं वेळानंतर एक क्षीण देहधारी वृद्धाला हातानें धरून तो अंध मुलगा परत त्या ठिकाणीं आला. विश्वेश्वरानंद अनिमिष नेत्रांनीं त्या वृद्धाकडे पहात होते. ते वृद्धाला पाहतांच उठून उभे राहिले. वृद्ध कांपत बसला आणि विश्वेश्वरानंदांच्या पायांवर लोळण घेत म्हणाला, " विश्वेश्वरानंद, मला वांचवा, मला वांचवा."

विस्मयचकित होऊन स्वामीं म्हणाले, " कोण तुम्ही ?"

कातर स्वरांत वृद्धानें उत्तर दिलें, " मी बुद्धभद्र."

अत्यंत आश्चर्यचकित होऊन विश्वेश्वरानंदांनीं वृद्ध संघस्थविराचा हात धरून त्याला उठविलें आणि व्याकुळ भावानें विचारलें, " संघस्थविर, आपण येथें कसे ?"

" तुमच्याजवळ मी आश्रयाची भिक्षा मागावयास आलों आहे."

" असें कसें म्हणतां ? आपण उत्तरापथचे एक मुख्य संघस्थविर, आणि मी केवळ चक्रराज. माझ्याजवळ आपण आश्रयाची याचना करणें विलक्षण नव्हे काय ?"

" थट्टा करूं नका विश्वेश्वरानंद. माझा गर्व समूळ नाहींसा झालेला

आहे. माझ्याखातर लाखों सद्धर्मी जिवाला मुकले आहेत. मला आश्रय द्या. माझें रक्षण करा; आणि मला पापाचें क्षालन करूं द्या. ''

इतकें म्हणून वृद्ध संघस्थविर पुन: संन्याशाच्या चरणांवर पडला. पुन: त्याला हातांनीं धरून विवेश्वरानंदांनीं वर उठविलें तेव्हां बुद्धभद्र सांगूं लागला, " विश्वेश्वरानंद, मी वणिक्‌पुत्र, वृद्धावस्थेंत संघांत प्रवेश करूनसुद्धां द्रव्याची लालसा माझ्यानें सोडवली नाहीं. द्रव्याचा व्यय पुष्कळ होतोसा पाहून गुर्जरराजाशीं तह केल्यास द्रव्याचा व्यय झाल्याशिवाय सद्धर्माचें कार्य सिद्धीस जाईल असें मला वाटलें, विश्वेश्वरानंद, विश्वासघाताचें भयंकर फळ मला मिळून चुकलें आहे. गुर्जरराजानें आपलें अस्सल स्वरूप प्रकट केलें. लाखों निरापराधी बुद्धधर्मीयांच्या रक्तानें सारा उत्तरापथ माखून गेला आहे. मला योग्यच शिक्षा झाली असें म्हटलें पाहिजे. आतां तुम्हीच माझें रक्षण करा. गौडेश्वराशिवाय सद्धर्माला गति नाहीं. धर्मपाळाशिवाय उत्तरापथाला दुसरा आधार नाहीं. विश्वेश्वरानंद, मला पुन: गौडेश्वराकडे घेऊन चला. ''

एकाएकीं विश्वेश्वरानंदाच्या मुखावर नवीन तेज झळकूं लागलें. मंद हास्य करून ते म्हणाले, " चला, मी तुम्हांला त्याच्याकडे नेतों, प्रभु, आपण या अंध मुलाचा आश्रय कां म्हणून घेतलात ?"

" भाग्यचक्रामुळें ! विश्वेश्वरानंद ! माझ्या व तुमच्या भाग्याबरोबरच या अंध मुलाचें भाग्य निगडित झालेलें आहे हें गणितावरून मला कळलें. जोंपर्यंत या मुलाची माझी गांठ पडली नव्हती, तोंपर्यंत तुमचा पत्ता कांहीं मला लागेना, पण ज्या दिवशीं याची माझी भेट झाली. त्या दिवशींच गणितावरून मला कळून आलें कीं, याच्याबरोबर गौडाच्या मार्गानें प्रयाण केल्यास मार्गांत आपली अवश्य भेट होईल. ''

विश्वेश्वरांनीं हें ऐकून मंद हास्य केलें.

●●

## ४०

ढेकरीनगराच्या सीमेवर एक जीर्ण देवालय होतें. कालक्रमानें निंब, वड आणि पिंपळाचीं झाडें त्याच्या आवारांत ठिकठिकाणीं उगवलेलीं होतीं. पिंपळाच्या झाडाच्या भारानें मंदिराचा घुमट पडून गेला होता. मंदिराच्या आंतील शिवलिंग मंदिरापेक्षां फार जुनाट होतें.

मंदिराची स्थापना करणारानें मंदिराचें काय नांव ठेविलें होतें तें माहीत नव्हतें. पण लोक 'वृद्ध शिवाचें मंदिर' या नांवानें त्या देवळास ओळखीत असत.

या वेळीं वैशाख महिना चालला होता. सर्व दिवसाच्या सूर्याच्या प्रखर तापानें पृथ्वी दग्ध होऊन गेलीं होतीं. पण सायंकाळच्या वायुमुळें मृतप्राय कोमल लतांसहि पुनश्च जीवनशक्ति प्राप्त झाली होती.

अशा वेळीं एक प्रवासी नदीच्या किनाऱ्यानें पश्चिमेकडून पूर्वेकडे जात होता. त्यानें मळकट वस्त्रें परिधान केलीं होतीं. मंदिरापाशीं येऊन थकल्याकारणानें तो एका झाडाखालीं बसला.

त्याच वेळीं कित्येक तरुणस्त्रिया कडेवर कळशा घेऊन नदीवर पाणी भरण्यासाठीं आल्या, त्यांना पाहून प्रवाशी रागारागानें तेथून उठून एका मोठ्या वडाच्या वृक्षाखालीं जाऊन बसला. त्या पाण्यांत उतरून कांहीं स्त्रिया जलक्रीडा करूं लागल्या. एक स्त्री जलक्रीडा करीत म्हणाली, "ऐकलंस का ? न्यायाधिशाचे शालक म्हणें परत घरी आले आहेत."

दुसरी स्त्री म्हणाली, "मी त्यांच्या वाड्यांत सकाळींच गेलें होतें; पण तेथें तर माझ्या पाहण्यांत कोणीं आले नाहीं."

रंगप्रिया नांवाची तिसरी एक स्त्री थट्टेनें म्हणाली, "जांवईबुवा फार दिवसांनीं घरीं परत आलेले, तेव्हां लाजेनें दिवसा ते कसे घरीं येतील ! संध्याकाळीं आले असतील आणि परत सकाळीं उठून पळून गेलें असतील."

" तुला यांतले कांहींच माहीत नाहीं. त्या दिवशीं न्यायाधिशाची बहीण मूर्च्छा येऊन पडली म्हणून मी तिला पहावयासाठीं सकाळीं उठून त्यांच्या वाड्यांत गेलें होतें. "

" पण ही किती दिवसांपूर्वीची गोष्ट तूं आतां सांगत आहेस ?"

" एक आठवड्यापूर्वीची. तिकडे जातांच मला कळलें कीं, मूर्च्छा वगैरे कांहीं नाहीं. तिनें हें सारें ढोंग केलें होते. ती पूजेच्या तयारींत गुंतली होतीं. इतक्यांत पतीचा कंठस्वर तिच्या कानांवर येतांच ती बेशुद्ध झाली. एवढें काय तें मी तेथें जातांच ऐकलें. "

वृक्षाच्या आड दडून बसलेल्या प्रवाशानें स्त्रियांचें हें चाललेलें संभाषण ऐकलें. तेव्हां त्याला भारी संताप आला. कांहीं वेळानें अंगावरील वस्त्रें काढून तो नदींत स्नान करूं लागला. स्त्रियांनीं त्याला लांबून पाहिलें. त्या प्रवाशाच्या पाठीवर एक मोठें कृष्णरंगाचें चिन्ह होतें. तें पाहून पहिल्या स्त्रीनें दुसरीस म्हटलें, " बाई, पहा तर खरें, या माणसाच्या पाठीवर केवढें मोठें चिन्ह आहे तें ? "

दुसरी म्हणाली, " होय, फार करून तो डाग जन्माचाच असावा."

प्रवाशानें तिकडे दुर्लक्ष्य करून स्नान आटोपलें व तो पिंपळाच्या झाडाखालीं पुनः येऊन बसला.

त्या वेळीं स्त्रिया रस्त्यावरील केर झाडीत नदीपर्यंत येऊन पोहोंचल्या. त्यांच्या मागें चार परिचारिका रस्त्यावरील धूळ उडूं नये म्हणून रस्त्यावर पाणी शिंपडीत होत्या. तें पाहून पूर्वीं नदीवर आलेल्या स्त्रिया आपसांत कुजबुजूं लागल्या, " एवढी ही धांवपळ कसली बाई चालली आहे ?"

पहिली स्त्री म्हणाली, " काय तें त्या दासीला विचार ना ?"

दुसरीनें परिचारिकेला विचारलें, " कायग, हा एवढा खटाटोप कशासाठीं चालला आहे ? कुणी राजाबिजा येणार आहे कीं काय ? "

दासी अभिमानपूर्वक म्हणाली, " पट्टमहादेवी गौडेश्वरी देवदर्शनासाठीं इकडे यावयाची आहे."

तें पाहून पहिली स्त्री झणकाऱ्यानें पुटपुटली, " बटीक ती बटीक ! पण दिमाख केवढा. राजवाड्यांतील दासी म्हणून का इतका तोरा ?"

दुसऱ्या स्त्रीनें तिकडे लक्ष न देतां दासीला विचारलें, " महाराणी-बरोबर आणखी कोण कोण येणार आहे ?"

दासीनें उत्तर दिलें, " मुख्य न्यायमंत्र्याच्या भगिनी विमलादेवी, पत्नी सुमतिदेवी आणि राजपरिवारांतील दुसऱ्या दोन स्त्रिया. "

इतक्यांत दुसरी स्त्री उत्साहभरानें पहिलीला म्हणाली, " आपण थोडा वेळ येथेंच उभ्या रहा. महाराणीला मला भेटून घ्यावयाचें आहे, संधि मिळाल्यास त्यांच्याशीं मी बोलेनहि !"

पहिली स्त्री किंचित् तुच्छतेने म्हणाली, " बरीं बाई तुझी हिम्मत ! नदीच्या घाटावर महाराणीशीं तुझें बोलणेंचालणें होणार कसे ? ते शिपाई येऊन तुला बाजूला लोटतील ना ?"

एका परिचारिकेनें त्याचें हें संभाषण ऐकून मध्येंच म्हटलें, " तुम्ही खुशाल येथें उभ्या रहा बाई ! आपल्या महाराणी कांहीं सामान्य कोटी-तील नाहींत. त्या आनंदानें तुमची मुलाखत घेतील."

इतक्यांत हत्यारबंद सैनिकांनीं वेष्टिलेल्या सात आठ पालख्या त्या जागीं येऊन पोहोंचल्या. मंदिराजवळ आल्यावर सैनिक आणि भोई तेथून दूर जाऊन उभे राहिले. कल्याणीदेवी, विमला, सुमति, मल्लिका वगैरे सख्यां-सह नदींत स्नानार्थ उतरली. नंतर मल्लिकेनें राणीचा तेथील जमलेल्या स्त्रियांशीं परिचय करून दिला. नूतन पट्टमहादेवीचे अतुल सौंदर्य, सभ्य आचरण व विनयशील स्वभाव पाहून ढेकरीं नगरांतील महिला फार आनं-दित झाल्या. स्नान आटोपल्यावर विमलादेवी पूजा करूं लागली. ती कोणा-शींहि बोललीचालली नाहीं. स्नान आटोपल्यावर ओल्या वस्त्रांनींच महा-राणीसह सर्व स्त्रिया देवमंदिरांत आल्या. नंतर पुरमहिला आपापल्या घरीं निघून गेल्या. वाटेनें चालतां चालतां त्यापैकीं एक दुसरीला म्हणाली, " पाहिलेंस बाई ! हिचें आपलें नशीब थोर ! आमच्यासारख्यांशीं महाराणी कुठून बोलावयाच्या ?"

दुसरी, " महाराणीसाहेबांसारखी नम्र स्वभावाची स्त्री आपण तर अद्याप कुठें बाई पाहिली नाहीं."

तें ऐकून पाहिली ओठ चावून म्हणाली, " हं ! "

देवदर्शन करून कल्याणीदेवी आपल्या परिवारासह मंदिराबाहेर आली. परंतु विमला अद्यापि आंतच होती. कल्याणीदेवी मंदिरांच्या द्वारापाशीं उभी राहून तिला उद्देशून म्हणाली, " ताई ! तुम्ही दररोज शंकराजवळ असलें वरदान तरी कसलें मागता ? "

मंदिराच्या आंतून विमलादेवीनें उत्तर दिलें, " देवी ! मी कसलें वरदान मागत्यें हें तुम्हांला कसें समजणार ? आणि ते आपणांस कधींच कळूं नये असें मी मनापासून इच्छितें."

कल्याणीदेवीनें पुनः विचारलें, " पण ऐकूं द्या तर खरें काय तें ?"

मंद हास्य करून विमलादेवी म्हणाली, " देवी ! तुम्ही अद्यापि वयानें लहान आहांत; मी नित्य या देवालयांत येऊन शंकराला आळवितें कीं हे देवाधिदेवा, मला पुरतें प्रायश्चित्त मिळून चुकलेलें आहे. आतां मोह आणि वासनेचें माझ्या अंगीं नांवहि उरलेलें नाहीं. प्रथम ज्या स्थितींत होत्यें, तीच स्थिति मला पुनः लाभो ! मला आतां ऐश्वर्य नको, संपत्ति नको आणि ते अलंकारही नकोत !--"

बोलतां बोलतां विमलादेवींचा कंठ भरून आला. भावनाशील कल्याणीदेवीहि सद्गदित झाली. कांहीं वेळानंतर पूजा आटोपून विमलाहि बाहेर आली, नंतर सर्वजणी पालखींत बसून सैनिकांसह परत वाड्यांत यावयास निघाल्या.

थोड्या वेळानंतर आपला पूर्वपरिचित प्रवासी मंदिराच्या घुमटानजीक आलेल्या पिंपळाच्या वृक्षावरून खालीं उतरला. तो सैनिकांच्या भयानें वृक्षावर चढून बसला होता. कल्याणी व विमला यांचें सर्व संभाषण त्यानें ऐकलें होतें. देवमंदिरांत येऊन वृद्ध शिवाच्या सन्मुख लोटांगण घालून तो म्हणाला,

" हें देवाधिदेव ! मला अलंकार द्या. विमलेचें दुःख आतां माझ्यानें पहावत नाहीं. मला आतां जर अलंकार देणार नाहीं, तर माझ्या प्रतिज्ञेचा भंग होईल. गौडेश्वरांच्या कार्यास मी सर्वस्वी वाहून घेतलेलें आहे. पुष्कळ तरवार गाजविली. परंतु अजून माझ्या अवस्थेंत परिवर्तन घडून आलेलें नाहीं. पुढें केव्हां घडून येईल तेंहि मला सांगतां यावयाचें नाहीं.

देवा ! आपण सर्वज्ञ आहांत, तेव्हां मला अलंकार द्या. ज्या अलंकारा–करतां सुखी संसाराचा मी त्याग केला, ते अलंकार जवळ असल्याशिवाय विमलला मी तोंड दाखवूं शकणार नाहीं. प्रभु ! मला अगोदर अलंकार द्या ! ”

त्याची ही प्रार्थना पुरी होते न होते इतक्यांत त्याच्या पाठीवर मागून कोणीसा हात ठेवून म्हटलें, “ गुणवंत, घरीं परत चला. मी तुम्हाला अलंकार देईन. ”

गुणवंत दचकून एकदम उभा राहिला. मंदिराच्या द्वारांत मशालींचा लख्ख प्रकाश पडला. त्या उज्वल प्रकाशांत गुणवंत पाहतों तों गौडेश्वर धर्मपाळदेव जवळ उभे !

● ●

## ४१

राष्ट्रकूटराज गोविंद यांनीं जेव्हां धर्मपाळ आणि चक्रायुध यांचा पक्ष स्वीकारून गुर्जरराज्यावर आक्रमण केलें, तेव्हां गुर्जरसेनेनें गौड-राज्याचा त्याग केला. तथापि कान्यकुब्जावरील ताबा मात्र तिनें सोडला नाहीं. भीष्मपाळ, जयवर्धन, वचनपाळ आणि रणसिंह यांनीं पुन: वारा-णशीवर चाल केली. प्रमथसिंहानें गौडराज्याचें संरक्षण करण्यासाठीं शोण नदीच्या तीरावर एक मोठी भिंत उभारून तेथेंच सैन्याचा तळ दिला.

महाकुमार, वाक्पाळ दुसरें सैन्य घेऊन मंडलादुर्गांत वाट पहात राहिला. गुणवंत उर्फ विद्याधर, उद्धवघोष, कमलदेव आणि गौडाधिपति दीर्घकालनंतर गौडाकडे देवीकल्याणीसह मागें परतले.

नवीन पट्टमहादेवीला घेऊन सम्राट परत राजधानीस येत आहेत, हें वृत्त समजतांच राढ आणि नरेंद्रमंडळ येथील लोकांनीं त्यांच्या स्वागताची जंगी तयारी चालविली. प्रत्येक गांवांतील व नगरांतील लोकांनीं गौडेश्वर आणि गौडेश्वरीच्या आगमनाच्या दिवशीं नगर शृंगारून मोठा महोत्सव सुरू केला.

सम्राटांच्या विवाहाची व राजधानींत आगमन झाल्याची वार्ता गौड शहरांत सर्वत्र पसरली. गौडेश्वर आणि महादेवीच्या सन्मानार्थ गौडवासी-यांनी एक मोठा समारंभ घडवून आणला. सर्व नगर ध्वजापताकांनीं सुशो-भित करण्यांत आले. मुख्य मुख्य राजमार्गावर दारूकाम सोडण्यांत आले. सम्राटांच्या आगमनप्रसंगीं राजमाता देद्देवीनें गौडनगराच्या सर्व प्रजेस भोजनाचें आमंत्रण दिले.

महामंत्री गर्गदेव त्या तयारींत गुंतले. अशा वेळीं प्रभातकाळीं एक स्थूल देहधारी ब्राह्मण विषण्ण वदनानें नदीस स्नानास निघाला. तो थोडा दूर जातो न जातो इतक्यांत राजमहालांतून एक दासी पूजासाहित्य घेऊन मंदिराकडे जात आहे असे त्याच्या नजरेस पडले. ब्राह्मण तिला पाहून व्याकुळ चित्तानें हांक मारूं लागला. " मालती ! अग मालती ! "

परंतु त्याची हांक न ऐकल्यासारखें करून मालती उतावळीनें पुढें जाऊं लागली. तिला गांठण्यासाठीं ब्राह्मणही झपाझप पावलें टाकूं लागला. तसतसी दासी पुढें धांवूं लागली. ब्राह्मण शरीराने स्थूल व ठेंगणा असल्या-मुळें त्यास दासीला गांठतां येईना. तेव्हां दासी मंद हास्य करून मागें वळून उभी राहिली.

धांपा टाकीत ब्राह्मण तिच्या जवळ येऊन पोहोंचला. तेव्हा त्याची छाती धडधड उडत होती. बोलण्याचें त्यांच्यांत सामर्थ्य उरलें नव्हतें, आणि तो अगदीं घामाघूम झाला होता. दासी त्याला पाहून रोषाने म्हणाली, " कोण तूं ? माझ्या मागून कां धांवत येत आहेस ? मी राजवाड्यांतील दासी आहे ही गोष्ट तुला माहित नाहीं कां ? ही गोष्ट जर मी राजवा-ड्यांत कुणाला सांगेन, तर तुला खरपूस मार खावा लागेल, समजलास! "

दम कमी झाल्यावर ब्राह्मण थोडा शांत होऊन म्हणाला, " मालती! मी सध्यां मोठ्या बिकट प्रसंगांत आहे. वेळेनुसार सर्व गोष्टी घडून येत असतात. तूं सुद्धां आतां माझी ओळख विसरलीस. म्हणून मी आज माझें नशीब अजमावून पाहण्यासाठीं चाललों आहें."

" पण एवढें नशीब अजमावून पाहण्यासाठीं जाण्यासारखें काय झालें आहे ? "

" मला प्रथम वाटलें होतें कीं, महाराज चक्रायुध जेव्हां कान्यकुब्जाचें राजे होतील, तेव्हां अगदींच नाहीं तरी दहावीस हजार मोहरा मला बक्षिस देतील. परंतु माझ्या दुर्दैवानें ते राजे झाले, तरी परत इकडेच आले आहेत. "

" बरं मग ? "

" आणि सगळे म्हणतात कीं, युद्धसमाप्तीनंतर महाराजाधिराजांचें लग्न होईल; परंतु आतां ऐकतों कीं, महाराजांचें लग्न केव्हांच होऊन चुकले आहे. त्यामुळें चमचमीत लाडवांचे जेवण, दक्षिणा, दान, उपहार, भेट वगैरेवर सारें पाणी पडलें. "

" लाडवांचें जेवण तरी एखादे दिवशीं जरूर मिळेल."

" एक दिवसानें काय होणार? कोठें दिवस आणि कोठें आठवडा ? मालती ! माझी हल्लीं प्रतिकूल वेळ आली आहे. म्हणून मी धागेदोरे देणाऱ्या एका महंताकडे जात आहे. त्याला माझे भाग्यांत काय आहे तें विचारून अगोदर ग्रहशांति केली पाहिजे. पण तूं यावेळीं कोठें चालली आहेस ? "

" सकाळच्या वेळीं मी आणखी जाणार कुठें ? मंदिरांत !"

" चल तर मग, मलाही तिकडेच जावयाचें आहे."

दोघेंही जण राजमार्गानें दक्षिण दिशेनें चालूं लागलीं. कांहीं दूर गेल्यावर समोरून एक जटाजूटधारी संन्यासी येत आहे असें मालतीच्या दृष्टीस पडलें. मालती त्या संन्याशाला म्हणाली, " योगीराज, हे माझ्या-बरोबरचे गृहस्थ पुरोहित असून मोठ्या संकटांत पडलेले आहेत. आपण कृपा करून यांच्या भाग्यांत काय आहे तें पहा बरें ! "

शिवशंकरच्या मुखाकडे पाहून मंद हास्य करीत संन्याशीं म्हणाला, " तुम्ही कां म्हणून चिंता करतां ? गौडेश्वरांचें लौकिक लग्न झालेलें नाहीं. फक्त गांधर्व विवाह झालेला आहे. दक्षिणापथच्या राजकुमारीबरोबर धर्म-पाळदेवांचें लग्न होणार आहे. त्या वेळीं तुमची इच्छा पूर्ण होईल. मनां-तून चिंतेला फांटा द्या, हृदय शांत करा आणि आपलें पुरोहिताचें कामकाज आनंदानें करीत रहा. "

शिवशंकर आणि मालती दोघेही मुखावाटे ब्रही न काढतां तेथेंच

थबकली. संन्याशी वाटेनें निघून गेला. कांहीं वेळानें शिवशंकर भानावर आला. नंतर दोघांनींही संन्याशाचा पुष्कळ शोध केला, पण त्याचा पत्ता लागला नाहीं.

## ४२

गुर्जरसेना जशी विद्युत्‌वेगानें चढाई करून आली होती, तशीच ती तांतडीनें मागें फिरली. नागभट्ट आत्मरक्षणासाठीं गुर्जरसेनेला परत मरुभूमीस घेऊन गेला. वचनपाळ आणि जयवर्धन यांनीं पुन: वाराणशी आणि प्रतिष्ठान जिंकून घेतले. हळूहळू चक्रायुधाचा राज्याचा बहुतेक भाग गौडीय सामंतांनीं परत शत्रूंपासून जिंकून घेतला. गौडाधिपति सामंत आणि सैनिकांसह गौडनगरास परत आले. गौडेश्वरांच्या लग्नसमारंभासाठीं गौडवासीयांनीं नगर उत्तम रीतीनें सजविलें. सर्व साम्राज्य–राढ, अंग मगध आणि गौडदेश सम्राटांच्या लग्नसमारंभाची वाट पाहूं लागला. सम्राटांबरोबर वृद्ध उध्दवघोष कल्याणीला घेऊन गौडास आला.

प्रमथसिंह, रणसिंह, कमळसिंह वगैरे मुख्य मुख्य सामंत कल्याणीच्या लग्नासाठीं गौड राजधानीस येऊन पोहोंचले. लग्न आटोपल्यावर महाकुमार वाक्पाळांसह गुर्जरराजधानीवर स्वारी करण्याचा त्यांचा विचार होता, प्रत्यहीं राजसभेंत कलिंग, ओद्र, कामरूप आणि चेदी वगैरे राज्यांतून नजराणे घेऊन दूत येऊं लागले. आजच्या राजसभेचा थाट कांहीं औरच होता. कारण कीं, आज राष्ट्रकूटराजे गोविंद यांचा दूत दक्षिणापथांतून युद्धाचा समाचार घेऊन गौडास आला होता. त्याची सम्राट आज सभेंत भेट घेणार होते. म्हणून अमीरउमराव, सरदार दरकदार, प्रतिष्ठित नागरिक, सैनिक आणि कर्मचारी सकाळपासून सभेंत जमूं लागले होते. सामान्य नागरिकांचे थवेच्याथवे उत्सुकतेनें राजमार्गावर येऊन उभे राहिले होते.

दिवसाचा प्रथम प्रहर उलटून दुसऱ्या प्रहरास सुरवात झालीं, तेव्हां सर्व नगरद्वारांवर मंगलवाद्यें वाजूं लागलीं. त्या वेळीं नगराबाहेर असलेल्या छावणींतून सत्तर स्वारांची एक तुकडी नगरांत शिरली.

सर्वांपुढें गौडचा महाप्रतिहार पायीं चालत होता. त्याच्या मागून बारा दंडधर हातांत सुवर्णदंड घेऊन चालत होते. त्यांच्या मागून श्वेत रंगाच्या आश्वावर बसून शुभ्र चिलखत धारण केलेला राष्ट्रकूटाधिपतींचा राजदूत येत होता; आणि त्याच्या मागें असंख्य गौडीय घोडेस्वार होते. महाप्रतिहाऱ्यानें नगरांत प्रवेश केला, तेव्हां शेंकडों मंगलवाद्यें वाजूं लागली व तूर्य आणि भेरि निनादानें नगरवासीयांच्या कानठळ्या बसल्या. श्रावण-मासांतील बरसातीप्रमाणें खिडक्या आणि गवक्षांतून श्वेतपुष्पांची एकच वृष्टि झाली.

राजमहालाच्या दरवाजापाशीं येऊन पोहोंचतांच सर्वजण घोड्या-वरून खालीं उतरले. तेथें महानायक प्रमथसिंह व महामंत्री गर्गदेव यांनीं त्यांचा यथोचित सन्मान केला. श्वेतपुष्पांनीं आच्छादिलेल्या विशाल जाजमा-वरून महाप्रतिहार आणि राजदूत दुतर्फा उभ्या असलेल्या सैनिकांच्या रांगांमधून सभामंडपाच्या द्वारीं येऊन पोहोंचले.

सभागृहाच्या द्वाराजवळ कान्यकुब्जराज चक्रायुधदेव व महाकुमार परमभट्टारक महाराजश्री वाक्पाळदेव त्यांची मार्गप्रतीक्षा करीत उभे होते. त्या दोघांनींहि राष्ट्रकूटाधिपतींच्या राजदूताचा हात आपल्या हातीं धरून त्यास सन्मानानें सभामंडपांत नेलें. तें पाहून परमेश्वर परमभट्टारक महा-राजाधिराज धर्मपाळदेव सिंहासनावरून उठून उभे राहिले.

तेव्हां सभागृहांतील सर्व सभासदहि आपापल्या जाग्यावरून उठले. सेनापति आणि सैनिकांनीं आपापल्या तरवारी बाहेर काढून राष्ट्रकूटाधि-पतींच्या प्रतिनिधीला लष्करी थाटानें सलामी दिली. हजारों शंख, तूर्य, भेरी आणि घंटानाद होऊं लागले. राष्ट्रकूटच्या प्रतिनिधीनें आपली तरवार म्यानातून बाहेर काढून ती सम्राट् धर्मपाळदेवांच्या पायांवर ठेवली, त्या-सरशीं वाक्पाळ आणि चक्रायुध यांनीं आपापल्या तरवारी म्यानांतून बाहेर काढून त्यांचा ललाटास स्पर्श केला. सम्राटांनीं राज्यप्रतिनिधीच्या तरवारीस स्पर्श करून ती परत त्याच्या हाती दिली; आणि आपली तरवार म्यानांतून बाहेर काढून तिघांस अभिवादन केलें. गौडेश्वरांना पित्याजवळून मिळालेली तरवार गुर्जरयुद्धांत मोडली होती, तथापि धर्मपाळदेवांनीं अद्याप तिचा त्याग

नव्हता. तरवारीचें तुटके टोंक पाहतांच गौडीय सैनिकांनीं घोरतम जयध्वनि केला. रणनीतिप्रामाणें अभिवादन करण्यासाठीं हजारों तरवारी म्यानांतून बाहेर पडून सूर्यकिरणांत तळपूं लागल्या. तें पाहून राष्ट्रकूटच्या सत्तर योद्धांच्या तरवारी अभिवादन करण्यासाठीं निष्कोषित झाल्या. सैनिकांनीं आणि नागरिकांनीं पुन: गगनभेदी जयघोष केला. नंतर सम्राटांच्या आज्ञेवरून सर्व स्थानापन्न झाले. राष्ट्रकूटचा प्रतिनिधी सिंहासनान्मुख उभा राहून म्हणाला, " गौडाधिपति ! ध्रुवपुत्र गोविंदराजांनीं आपणांस एक अस्पर्शी भेट पाठविलेली आहे, तिचा स्वीकार व्हावा. "

राष्ट्रकूटराजप्रतिनिधीनें इशारत करतांच महाप्रतिहाऱ्यानें सभामंडपाच्या बाहेर जाऊन नजराण्याचीं तार्टे घेऊन आलेल्या चौघां सेवकांस आंत बोलावून आणलें. त्यांनीं चार मोठालीं तबकें आणून सम्राटांपुढें ठेविली. राष्ट्रकूटप्रतिनिधीनें त्या तार्टावरील किंमती वस्त्रें आपल्या हातानें बाजूलसारलीं. तों त्या सर्वांत तुटलेल्या शेंकडों तरवारी व मस्तकावरील लोहा जडित टोप असलेले सर्वांच्या नजरेस पडलें. तेव्हां वृद्ध भीष्मदेव आपल्या आसनावरून उठून सिंहासनाच्या सन्मुख येऊन उभे राहिले व प्रतिनिधीला अभिवादन करून म्हणाले—

" राष्ट्रकूटराजप्रतिनिधि ! आज गौडाधिपति फार सन्मानित झालेलें आहेत. आपण जी भेट घेऊन आला आहांत, तीच वीर पुरुषास साजेशी आहे. महाराजाधिराज राष्ट्रकूटेश्वरांनीं गुर्जरयुद्धांत आम्हांस पुष्कळ रत्नें आणि द्रव्य देऊन साहाय्य केलेले आहे. तेव्हां त्यांची आतां आम्हांला अपेक्षा नाहीं. "

गौडेश्वरांनीं सिंहासनावरून उठून अभिवादन केलें. सर्व सभासदांनींहि राष्ट्रकूटराजाच्या या अपूर्व भेटीस मान डोलविली. गौडाधिपति पुन: सिंहासनारूढ झाल्यावर राजदूत म्हणाला.

" महाराजाधिराज ! ध्रुवपुत्र गोविंदांनीं या दासाच्यामार्फत आपणांस असें सांगून पाठविलें आहे कीं, नागभट्टाचें राज्य बहुतेक जिंकण्यांत आलें असून, मरुभुमींत असलेलीं भिल्लमाळ राजधानी हस्तगत होतांच दूतामार्फत आपणांस कळविण्यांत येईल. "

धर्मपाळदेव म्हणाले, " फार उत्तम. राष्ट्रकूटेश्वरांशीं माझा ऋणानुबंध आतां कायमचा जडला आहे. "

" महाराजाधिराज, गौडीय सेनानायक वचनपाळ आणि जयवर्धन यांनीं यमुना आणि चर्मण्वतीमधील प्रदेशांत गुर्जरसेनेला वारंवार पराजित केलें आणि त्यांच्या बाहुबळामुळें गुर्जर सामंतांना नागभट्टाचा पक्ष सोडून जाणें भाग पडले. आतां राष्ट्रकूटराजाच्या सेनेनें नागभट्टाच्या सर्व राज्यावर आक्रमण केलेलें आहे.

ध्रुवपुत्र गोविंद यांनीं पंचनदांत नवीन सैन्य पाठविण्यासाठीं गौडेश्वरांना विनंति केलेली आहे. गांधारपासून कीर देशापर्यंतचा सर्व मुलूख काबीज करण्यांत आल्यामुळें गुर्जरराज्य संपुष्टांत यावयास आतां फारसा विलंब लागणार नाहीं. "

" दूतप्रवर ! आपल्या सांगण्याप्रमाणें महाकुमार वाक्पाळ एक लाखाहून अधिक सैन्य घेऊन पंचनदावर आक्रमण करील. "

" महाराजाधिराज विजयी होवोत ! ध्रुवपुत्र गोविंदांनीं गौडेश्वरांना एक अगत्यपूर्वक विनंति केलेलीं आहे. गौडाधिपतींपाशीं त्यानीं एक भिक्षा मागितलीं आहे. "

" दूतप्रवर ! राष्ट्रकूटराज आमची थट्टा करीत आहेत असें दिसतें. त्यांच्याच कृपेनें आज मी उत्तरापथाचा अधीश्वर आहे; त्यांच्याच कृपेनें भंडीपुत्र चक्रायुध कान्यकुब्जाचें राजे झालेले आहेत; आणि त्यांच्याच कृपेनें सुंदर गौडीय साम्राज्याचें स्मशानभूमींत रूपांतर होण्याचे टळलें आहे. अशा स्थितींत राष्ट्रकूटराज आमच्याजवळ अशी कोणती मागणी करीत आहेत, कीं, जी आम्ही अमान्य करूं असे त्यांस वाटतें ?"

" महाराजाधिराज ! मी फक्त राजदूत आहे. राजेश्वर परस्परांची थट्टा करतात कीं काय तें कळणें मला शक्य नाहीं. गौडेश्वर ! ध्रुवपुत्र गोविंद यांनीं खरोखरीच गौडाधिपतींना विनंति केली आहे. "

धर्मपाळदेव एकाएकीं सिंहासनावरून उठून उभें राहिलें आणि म्यानांतून तरवार बाहेर काढून ती आणि मस्तकावरील राजमुकुटा राष्ट्रकूटराजदूताच्या हातीं देऊन म्हणालें,

" राजदूत, मस्तकावरील राजमुकुटापेक्षां अधिक मूल्यवान अशी वस्तू आम्हां राजे लोकांपाशीं नसते आणि खड्गापेक्षां अधिक प्रिय क्षत्रियांना दुसरी ठाऊक नाहीं. जर गोविंदराज म्हणत असतील तर पित्याकडून परंपरेनें मिळालेला हा राजमुकुट आणि गुर्जरयुद्धांत भंग पावलेली ही तरवार राष्ट्रकूटराजाच्या सिंहासनापुढें ठेवावयास मी तयार आहे. "

सर्व सभासद विस्मयचकित होऊन धर्मपाळदेवाचें हें भाषण लक्षपूर्वक ऐकत होते. तें पूर्ण होतांच सर्वांनीं एकच जयघोष करून सभामंडप हलवून सोडला. राष्ट्रकूटदूतानें मुकुट आणि खड्ग गौडेश्वरांच्या हातीं परत देऊन अभिवादन करून विनयानें म्हटले.

" महाराजाधिराज ! ध्रुवपुत्र गोविंदांची मागणी अगदीं साधारण, क्षुल्लक आहे. "

अशा वेळीं सभामंडपाच्या द्वारीं भयंकर कोलाहल माजला. दूताच्या तोंडचें शब्द पुरें होण्यापूर्वीच गौडेश्वर म्हणाले, " दूतप्रवर ! गोविंदाची मागणी कसलीहि असो, ती पूर्ण केली जाईल. "

इतक्यांत एक क्षीणदेहधारी वृद्ध घाईघाईनें सभामंडपांत शिरला आणि उच्च स्वरानें म्हणाला, " महाराज ! सर्वनाश करून घेऊं नका "

आश्चर्यचकित होऊन धर्मपाळदेवांनीं प्रश्न विचारला, " कोण तुम्ही आणि तुम्हीं हें काय सांगतां ? "

वृद्ध सिंहासनासन्मुख उभा राहून मस्तक नम्र करून म्हणाला, " महाराजाधिराज ! मी विश्वासघातकी नरपशू बुद्धभद्र. "

मंदस्मित करून धर्मपाळदेव म्हणाले, " कोण ? संघस्थविर ! गौडराज्यांत आपण कोणत्या हेतूनें आलांत ? गुर्जरराज्याचे दूत म्हणून तर नव्हे ? "

मान वर करून वृद्ध म्हणाला, " गौडेश्वर, तुम्ही अजून अप्रबुद्ध बालक आहांत; वृद्धाची अशी उपरोधिक थट्टा करूं नका. मी संघस्थिर नाहीं, पण नरघातकी पिशाच्च आहें. भगवान् बुद्धानें मला योग्य दंड केला. आहे. चक्राचें परिवर्तन माझ्या जाणण्यांत आलें नाहीं. मी द्रव्यलालसेनें अंध बनून गुर्जरराजाचा पक्ष स्वीकारला. हजारों नरनारींच्या रक्ताच्या

सङचानें आर्यावर्ताला कलंकित करून मी माझ्या महापातकाचें फळ भोगीत आहें. वृद्धाचा उपहास करूं नका. तुम्ही गौडाधिपति असला म्हणून काय झालें ? साधारण जिवाप्रमाणें तुम्हीहि कर्मचक्रांत गुरफटलेले आहांत. आपल्या हातानेंच तुम्हीं स्वतःचा सत्यनाश करून घेऊं नका. गोविंदांची विनंति मान्य करूं नका. जर तसें कराल तर इहलोकच्या शांतीला कायमचे मुकाल हें विधिलिखित लक्ष्यांत असूं द्या."

हें ऐकून संन्यासी विश्वेश्वरानंद सिंहासनापाशीं येऊन वृद्धाला म्हणाले, " संघस्थविर, तुम्हीं हें काय सांगतां ? "

वृद्धानें त्यांच्याकडे मुळींच दृष्टिक्षेप न करतां म्हटलें, " सत्य तेंच मी सांगत आहें. गणित कदापिही चुकणार नाहीं. गोपाळपुत्र धर्मपाळ ! तुम्ही जर आज ध्रुवपुत्र गोविंदांचीं मागणी मान्य कराल, तर स्वतःचा सत्यानाश करून घ्याल."

गौडेश्वर अत्यंत हलक्या आवाजांत म्हणाले, " संघस्थविर ! आपण गौड राज्याचें मित्र आहांत कीं शत्रू तें मला समजत नाहीं. राष्ट्रकूटचे राजे गोविंद माझे रक्षणकर्ते आहेत. तें आर्यावर्ताचें, सद्धर्माचें शुभेच्छक आहेत. त्यांना न देण्यासारखें माझ्यापाशीं कांहीं नाहीं. महाराजाधिराज गोविंदांची मागणी मी पुरी करीन असें आतांच सांगून चुकलों आहें."

वृद्ध खालीं मान घालून म्हणाला, " धर्मपाळ ! विधात्याचा लेख अखंडनीय असतो. मी बोलूनचालून पामर जीव ! चक्रगति थांबविण्याचें सामर्थ्य माझ्यांत कोठून असणार ? "

इतकें बोलून वृद्ध हळूहळू सभामंडपांतून बाहेर चालता झाला.

कांहीं वेळानंतर गौडेश्वरांनीं राष्ट्रकूटराजाच्या दूताला पुनः विचारलें, " दूतप्रवर ! राष्ट्रकूटराजांचीं कोणती विनंति आहे ? "

" गौडेश्वर ! ध्रुवपुत्र गोविंदांची अशीं प्रार्थना आहे कीं गौडेश्वरांनीं राष्ट्रकूटराजाच्या एका राजकुमारीचें पाणीग्रहण करून तिला गौडसाम्राज्याची पट्टमहादेवी करावी."

दूताचें हे शब्द ऐकतांच परमेश्वर परमभट्टारक परमसौगत महाराधिराज धर्मपाळदेव जसें एखादें कर्दलीचें पान झंझावातानें उडून जातें, तसे धाडकन् सिंहासनावर कोलमांडून पडले.

• •

## —— ४३

सभामंडपांत गौडेश्वर ज्या वेळीं राष्ट्रकूटाच्या राजदूताशीं बोलत होते, त्या वेळीं महादेवी देद्देवी विमलादेवी अंतःपुरांत लोकनाथाच्या मंदिरासन्मुख रचलेल्या मंडपांत बसून पुरमहिलांबरोबर गोष्टी बोलत होत्या. अशा वेळीं एका दासीनें येऊन महादेवीला प्रणाम करून म्हटलें, " देवी, एक भिक्षु दर्शनासाठीं अंतःपुराच्या दारावर येऊन उभा आहे. तुम्ही लोकनाथाच्या मंदिरांत असल्यामुळें पहारेकरी त्यांस आंत येऊं देत नाहींत. आपली देवदर्शन करण्याची इच्छा आहे असें महादेवी व पट्टमहादेवीस कळविण्यासाठीं भिक्षूनें सांगितलें आहे."

हें ऐकून देद्देवी म्हणाली, " भिक्षु देवदर्शनासाठीं येत असल्यास त्यास मज्जाव कां ? पहारेकऱ्यांस त्याला आंत सोडण्यास सांग."

दासी पुनः प्रणाम करून निघून गेली. देद्देवी पुरमहिलांबरोबर पुनः गोष्टी करण्यांत निमग्न झाली.

अशा वेळीं युद्धाच्याच गोष्टी चाललेल्या होत्या. गौडीय युद्धांत अनेक गौडीय वीरपुरुषांनीं प्राणार्पण केलें होतें. शेंकडों स्त्रियांचे पति, पुत्र व निकटसंबंधीं या युद्धांत मारले गेलें होतें.

ज्या ज्या युद्धांत ते मारले गेले होतें, त्या त्या युद्धाचीं हकिगत त्या मोठ्या अश्रुपूर्ण नेत्रांनीं सांगत. वाक्पाळ गुर्जरराज्यावर चढाई करणार त्या प्रसंगाचें रसभरित वर्णन महादेवी करीत होती. या वेळीं गौडीयसेना कान्यकुब्जाहूनहि दूर जाईल. इतिहासपुराणविश्रुत शतद्रु, विपाशा आणि इरावती पार होऊन सिंधूच्या किनाऱ्यापर्यंत तिला जावें लागेल. चक्रायुधाचें राज्य परत मिळविण्यासाठीं धर्मपाळदेवांबरोबर जे गेले, त्यांपैकीं निम्मेसुद्धां परत आले नाहींत आणि जे आले त्यांपैकीं बहुतेकांनीं मगध, गौड आणि राढदेशांच्या संरक्षणार्थ प्राणार्पण केलें.

राष्ट्रकूटराजाच्या साह्यानें जय मिळाला खरा; पण सर्वत्र हाहाःकारच काय तो ऐकूं येत आहे. आतां वाक्पाळाबरोबर जे पंचनदांत जातील

ते पिता, माता, भाऊ, बहिणी, स्त्री, पुत्र, कन्या आदि परिवारांचा शेवटचा निरोप घेऊन जाणार हें निश्चित होतें.

एका विधवा बाईच्या चौघां मुलांनीं समरक्षेत्रांवर शयन केलें आणि लहानगा पांचवा पुत्रही महाकुमार वाक्पाळबरोबर युद्धास जाण्यासाठीं मातेची परवानगी मागत होता.

अभागिनीमाता संसारांतील सकल बंधनांतून मुक्त होऊन महादेवीच्या आश्रयास येऊन राहिली होतीं. अशा वेळीं एका भिक्षूनें लोकनाथाच्या मंदिरांत प्रवेश केला. कांहीं वेळानंतर मंदिरांतून गंभीर पण मधुर कंठानें गाइलेलीं लोकनाथाची खालील स्तुति ऐकूं आली–

॥ लोकनाथ शशिप्रभं ॥
ऱ्हीः काराक्षरसंभूतं जटामुकुटमंडितं ॥
वज्रधर्म जटान्तस्थमशेषरोगनाशनं ।
वरदं दक्षिणे हस्ते वामे पद्मधरं तथा ॥
ललिताक्षेपसंस्थंतु महासौम्यं प्रभास्वरं ।
वरदोत्पलका सौम्या तारा दक्षिणतः स्थिता ॥
वन्दता दंडहस्तन्तु हयग्रीषोथ वामतः ।
रक्तवर्णो महारौद्रो व्याघ्रचर्माम्वरप्रियः ।
ॐ ऱ्हीः स्वाहा ॥

ही स्तुति ऐकूं येतांच स्त्रीवर्गांत चाललेल्या गोष्टी बंद पडल्या. एक दोन पुरमहिला मंदिराच्या जवळ येऊन आड उभ्या राहून भिक्षूची पूजा अवलोकन करूं लागल्या. पूजा समाप्त झाल्यावर भिक्षु मंदिराच्या बाहेर पडून खालीं मान घालून जात होता. इतक्यांत ज्या विधवा बाईचें चौघे पुत्र रणक्षेत्रांत कामास आले होते, ती त्याच्यासमोर गेली आणि त्यास प्रणाम करून उभी राहिली. मार्ग रोखला गेल्यामुळें भिक्षूनें उभें राहून तिला विचारले, " माताजी ! तुम्हांला काय पाहिजे ?"

ती दुर्दैवी माता उद्गारली, " प्रभू ! अभागिनीचें चौघे पुत्र युद्धांत मारले गेलें आहेत आणि आतां पांचवा पुत्र महाकुमार वाक्पाळांबरोबर युद्धार्थ जावयास सज्ज झालेला आहे; तो सुरक्षित परत येईल कां ?"

" माताजी ! तें मला कसें सांगतां येणार ?"

" प्रभु ! आपण सर्वज्ञ आहांत; खरें खरें काय तें मला कळूं द्या. मीं अनाथिनी आहे. या युद्धामुळें माझा सर्वनाश झालेला आहे. माझ्या सुखी संसारांत विष कालवले गेलें आहे. प्रभु ! माझ्या घरांत किती विधवा सुना आहेत; खरोखर माझ्या दुःखाला सीमा नाहीं. त्यांत आणखी या उतार वयांत आंधळयाच्या काठीप्रमाणें असलेला सत्रा वर्षाचा उरलेला पोरही महाकुमार वाक्पाळांबरोबर जावयास तयार झाला आहे. त्याला मी माझ्या हृन्मंदिरांत उराशीं बाळगून होतें, पण बंधन सोडून तो आतां मोकळा झाला आहे. प्रभु, तो परत येईल का ? सांगाना ? आपल्या सांगण्याची सत्यता नेहमीं अनुभवास येत असतें, "

इतकें बोलून ती स्त्री त्या भिक्षूचें दोन्ही पाय धरून फरशीवर आपलें मस्तक आपटून घेऊं लागली. तेव्हां व्याकुलचित्तानें भिक्षु म्हणाला—

" माताजी ! अधीर होऊं नका. उठून उभ्या रहा. "

ती स्त्री उभी राहिली खरी; पण तिचे कपाळ फुटल्यानें मस्तकांतून रक्ताच्या धारा वाहूं लागल्या, तिनें परिधान केलेलीं शुभ्रवस्त्रे रक्तानें माखून गेली. भिक्षूनें म्हटले, " माताजी ! तुम्ही आपला हात दाखवा पाहूं. "

त्या स्त्रीनें आपला डावा हात त्याच्या पुढें केला. तो पाहून भिक्षू अंगणांत बसला आणि खडूनें आडव्या तिडव्या रेघा ओढून त्यानें कुंडली मांडली.

हळूहळू पुरमहिलांनीं येऊन भिक्षुस व त्या स्त्रीला अगदीं चौफेर वेढून टाकलें, सर्व स्त्रिया भाग्यपरीक्षा करण्यासाठीं एका पायावर तयार झाल्या. कांहीं क्षणानंतर भिक्षूचें गणित पुरें होतांच त्यानें म्हटलें, "माताजी ! कोणत्याही प्रकारचें भय बाळगण्याचें कारण नाहीं. तुमचा लहानगा मुलगा सुखरूपपणें परत येईल."

अत्यंत हर्षभरित होऊन कृतज्ञभावानें त्या स्त्रीनें भिक्षूच्या पायावर डोकें ठेविलें. पहातां पहातां एक दोन तास निघून गेले. भिक्षू स्त्रियांचे हात पाहून त्यांना त्यांचें भविष्य काय आहे तें सांगूं लागला. शेवटीं विमला-

देवीनें कल्याणीदेवीचा हात त्याच्यापुढें केला. त्यांना पुढें आलेले पाहतांच इतर बायका बाजूला सरल्या. विमलादेवी म्हणाली, " प्रभु या बालिकेच्या भाग्यांत काय आहे तें सांगा पाहूं ! "

कल्याणीदेवीचा डावाहात आपल्या हातांत घेऊन भिक्षु म्हणाला, " महादेवीचा जय होवो; आपण गौडेश्वरी आहांत ! "

विमलादेवीनें मंद हास्य करून म्हटलें, " प्रभु, यांचा विवाह अद्याप झालेला नाहीं. "

" तरी पण या गौडेश्वरी आहेत, देवी आहेत. आतां लौकरच या गौडाच्या सिंहासनावर पट्टमहादेवी म्हणून विराजमान होतील. "

" प्रभु ! यांच्या भाग्यांत आणखी काय आहे ? "

" देवीच्या भविष्यांत अंधःकार दिसतो. अनिश्चित कर्मफलावर त्यांचा सर्वस्वी आधार आहे. परंतु वर्तमानकाळीं त्याचें नशीब फार उज्वल आहे. महादेवीनें शेंकडों जन्मांच्या सत्कृत्यामुळें हा देह धारण केलेला आहे असें याचे नशीब आहे मी हजारों मनुष्यांच्या हस्तरेषा पाहिल्या आहेत. पण अशा प्रकारच्या रेषा आजपर्यंत मी कोणाच्याही हातावर पाहिल्या नाहींत. देवी ! महान् ध्येयसिद्धीसाठीं आपला जन्म झालेला आहे. आपल्या-मुळें अखिल भारतवर्षाचें कल्याण होईल. देवी, सुमारें पांचशें वर्षांपूर्वी आर्य शाक्यसिंह बोधिसत्वाच्या भाग्याचें गणित करतांना अशीं सर्व लक्षणें दिसून आलीं होती. शेंकडों दुःखी आणि दरिद्री जीवांचा उद्धार करून भगवान् गौतम निर्वाण पावले. त्यांनीं सर्व जीवांना मोक्षमार्ग दाखवून दिलेला आहे. देवी, आपणही निर्वाण मार्गावर आहांत, जरी आपण वयानें लहान आहांत तरी जन्म, मृत्यु, जरा आणि व्याधि यांतून सत्वर पार पडाल. अनंत भवचक्रांत आपलें परिभ्रमण पुरें होत आलें आहे. देवी या वृद्ध भिक्षूला आशीर्वाद द्या. "

इतकें म्हणून वृद्ध कल्याणीदेवीच्या पायांवर पडला. हें पाहून विमलादेवी व्याकुल चित्तानें म्हणाली, " महाराज, हें काय करतां आपण ? बालिकेचें अकल्याण करूं नका."

भिक्षु म्हणाला, "भगिनी, हीं बालिका कांहीं साधारण नाहीं. एखाद्या दिवशीं शेंकडों भिक्षु, साधु, महास्थविर आणि अर्हत् हिच्या चरणांवर मस्तक नमवितील, ऐका, देवी, समय अगदीं जवळ आलेला आहे. आपलें कोमल हृदय दृढ बनवा. तुम्ही या वेळीं अनंत शून्याच्या द्वारांत उभ्या आहांत; लाखो योजने दूर राहूनही हें मला स्पष्ट दिसत आहे. देवी, महाशून्यद्वार निरंतर बंद असतें; आत्मोत्सर्गाविना तें उघडत नसतें; परीक्षा अगदीं जवळ आलेली; तरी तयार व्हा, हृदय कठीण बनवा. देवी, सर्वार्थ सिद्धीनंतर या वृद्धाची आठवण ठेवा, आणि जन्मोजन्मीं आपल्या चरण दर्शनाचा लाभ घडूं द्या!"

वृद्ध भिक्षु कल्याणीदेवीला प्रणाम करून घाईघाईनें तेथून चालता झाला. कल्याणी आणि विमला विस्मयचकित होऊन त्याच्याकडे पहात राहिल्या.

इतक्यांत महादेवी देद्ददेवीनें जवळ येऊन म्हटलें, "विमलादेवी, काय आहे ग?"

"देवी," विमलादेवीनें उत्तर दिलें, "वृद्ध भिक्षूनें कल्याणीदेवीला दोनदां प्रणाम केला. त्यानें बरेचसें सांगितलें पण त्याचा अर्थ मला कळत नाहीं."

"काय सांगितलें?"

"मोक्ष–निर्वाणाच्या गोष्टी."

"त्यानें एखादी अमंगल गोष्ट तर नाहींना सांगितली?"

"मंगल कीं अमंगल तें मी कांहीं समजूं शकलें नाहीं."

●●

## ४४

गंगेच्या किनाऱ्यावर आलेल्या गौडनगराच्या राजमहालाच्या एका दिवाणखान्यांत संध्याकाळीं गौडाधिपति धर्मपाळदेव, मंत्री गर्गदेव, सेनानायक आणि दुसरे कित्येक सामंत बसले होते. थोड्या दूर अंतरावर

निराळ्या प्रकारच्या आसनावर महस्थविर बुद्धभद्र व चक्रराज विश्वेश्वरानंद विराजमान झाले होते. सर्वांची मुखें निस्तेज, गंभीर आणि चिंताग्रस्त दिसत होतीं. सम्राट एका सामान्य काष्टासनावर गालावर हात टेकून बसले होते. त्यांच्याजवळ महाकुमार वाक्पाळ भिंतीला टेकून उभा होता. सम्राटाच्या सन्मुख वृद्ध मंत्री गर्गदेव मान खालीं घालून बसले होते. सर्व सामंताच्या समोर राढदेशचे राजे रणसिंह, प्रमथसिंह आणि कमळसिंह बसले होते, आणि सर्वांमध्यें वृद्ध उद्धवघोष बसला होता.

कांहीं वेळानंतर विश्वेश्वरानंदानें प्रश्न केला, " महाराज, आतां पुढें काय करावें याबद्दल कांहीं ठरविलें आहे काय ? आतां विलंब उपयोगाचा नाहीं. आतांच राष्ट्रकूटराजाचा दूत गौडेश्वराचा जबाब ऐकण्यास सभेंत येईल त्यांस उत्तर द्यावें लागणार."

गौडेश्वर हळूच मान वर करून म्हणाले, " काय उत्तर देऊं महाराज, माझें मस्तक भ्रमण होत आहे."

विश्वेश्वरानंदांनीं म्हटलें, " गौडाधिपति, दोनच मार्ग काय ते आतां मला सुचतात. त्यांतील पहिला मार्ग सरळ आहे. तो हा कीं, राष्ट्रकूटराजाच्या मागणीचा स्वीकार करणें आणि रघुवीरसिंहाची कन्या उद्धवघोषाकडे परत पाठविणें. दुसरा मार्ग कठीण आहे. तो हा कीं राष्ट्रकूटराजाशीं युद्ध पुकारणें, गुर्जरराजाशीं पुन: लढाईस तोंड देणें, चक्रायुधाच्या राज्याचा नाश करणें आणि शेवटीं पुष्कळ वर्षांच्या प्रयासानें उभारलेल्या या राज्यास मुकणें. या दोन मार्गांशिवाय तिसरा कोणताहि मार्ग मला सुचत नाहीं."

कमळसिंह म्हणाला, " महाराज, प्रभु विश्वेश्वरानंद म्हणतात तेंच खरें आहे. या दोन मार्गांशिवाय तिसरा मार्गच नाहीं. राष्ट्रकूटराजाच्या दूत आतां येईल; म्हणून आतां चित्त स्थिर ठेवा."

धर्मपाळदेव भीष्मदेवांकडे पाहून म्हणाले, " तात ! आपण मला पितृतुल्य आहांत, तेव्हां या भयंकर विपत्तींतून माझा उद्धार करा. माझ्या वडिलांनीं गोकर्णदुर्गस्वामिनीला वचन दिलेलें होतें कीं, कल्याणीचा विवाह मजबरोबर होईल. पण हा वेळपर्यंत संधि न आल्याकारणानें लग्नाचा योगायोग जुळून आला नाहीं. पिताजीनीं ज्या रात्रीं रघुसिंहाच्या दुर्गाचें रक्षण

केलें, त्या रात्रीं त्यांच्या आज्ञेनें कल्याणीला घेऊन मी एकटा गोकर्णदुर्गाचा त्याग करून गेलो होतों. दोन दिवस जनशून्य अरण्यांत भटकल्यानंतर जेव्हां पराक्रमसिंह आणि वचनपाळ यांची भेट झाली, तेव्हांपासूनच कल्याणी माझी भावी पत्नी असा सार्वत्रिक समज ाला. गुर्जर सेनेनें ज्या दिवशीं गोकर्ण दुर्गावर हल्ला चढविला, तेव्हां दुर्गस्वामिनीनें आपल्या कुमारी कन्येचा हात माझ्या हातीं देऊन ती मला समर्पण केली व कोणत्या तरी सुरक्षित जागीं तिला घेऊन जाण्यासाठीं बजाविलें.

या तिच्या आज्ञेप्रमाणें मी तिला ढेकरीं नगरास घेऊन जात असतांना मार्गात गुर्जर सैन्याच्या तुकडीनें आमच्यावर हल्ला केला. त्यावेळींसुद्धां आमच्याजवळ कोणी सैनिक नसल्यामुळें आम्ही उभयतां वनांत पुष्कळ रखडलों. मार्गांत मला मूर्च्छित करून दरोडेखोरांनीं कल्याणीदेवीचें हरण केलें. तदनंतर मींच एकटचानें तिची सुटका केली. शेवटीं गुणवंत आल्यामुळें आमचा बचाव झाला. ढेकरी नगरांत कल्याणीदेवी माझी धर्मपत्नी आणि गौडची पट्टमहादेवी म्हणून गणली गेली. जरी कल्याणीदेवीशीं विधिपूर्वक माझा विवाह झालेला नाहीं, तरी जगाच्या दृष्टीनें ती माझी धर्मपत्नी केव्हांच होऊन चुकली आहे.

एक पंधरवडचापूर्वी हर्षवर्धनाच्या मामाचे पुत्र भंडीवंशधरमहाराज चक्रायुध माझे पाहुणे होते. गंगेच्या कांठीं पितृश्राद्धाच्या दिवशीं मी चक्रायुधांना आश्रयदान दिलें होतें. हजारों गौडीयवीरपुरुषांनीं चक्रायुधासाठीं प्राणार्पण करून गौडेश्वरांचें नांव उज्वल केलेले आहे. अत्याचारी गुर्जर-सेनेचा त्यांनीं अनेकदां पराजय केलेला आहे. पण शेवटीं बौद्धसंघाच्या स्थविर साधूंच्या सुवर्णलालसेमुळें माझ्या पदरीं अपेश आले व मोठ्या कष्टानें जिंकून घेतलेले कान्यकुब्जचें राज्य जेव्हां गुर्जर सेनेनें परत घेतलें आणि जेव्हां वर्धमान आणि पौडवर्धन मुक्तिसुद्धां जिंकून घेतली, तेव्हां निरुपायानें आम्हांला राष्ट्रकूटराजांची मदत मागणें भाग पडलें. गौड साम्राज्याच्या भयंकर विपत्तीच्या वेळीं दक्षिणापथचे अधिपति गोविंदांनीं नागभट्टाबरोबर युद्ध केलें आणि त्यांच्या साहचामुळ शत्रुसेना गौडराज्यांतून पलायन करून गेली. त्यांच्या कृपेमुळें कान्यकुब्जचें राज्य चक्रायुधाला

पुन: प्राप्त झालें. या वेळीं मित्र गोविंदांनीं मला जी विनंति केली, ती एखाद्या दुसऱ्या प्रसंगीं केली असती तर त्याचे विशेषसें कांही वाटलें नसतें, परंतु आज मात्र ती ऐकून मनास भारी उद्वेग वाटत आहे. आतां कल्याणीचा त्याग केल्यास कोणी क्षत्रिय युवक तिच्याशीं लग्न करावयास तयार होईल काय ? मातृपितृविहिन अनाथ कन्येला स्वर्गस्थ दुर्गास्वामिनीनें माझ्या हातीं दिलें आहे, तिचा आतां मी कोणत्या प्रकारें त्याग करूं ? इकडे राष्ट्रकूटराजाची विनंति मान्य न केल्यास त्यास राग येऊन तो गुर्जर-सेनेशीं मिळून पुन: आर्यावर्तांत धुमाकूळ घालील आणि मग कान्यकुब्ज आणि गौडसाम्राज्याचा नाश हा ठरलेलाच ! तात, तुम्हीच सांगा, आतां या प्रसंगीं मी काय करूं ?"

भीष्मदेव मस्तक खालीं घालून निमूटपणें स्तब्ध राहिला. तें पाहून वृद्ध संघस्थविर उठून उभा राहून म्हणाला, " महाराज, या आयुष्यांत धर्माचा रस्ता मात्र एकच मोकळा राहिला आहे आणि तो राजा व प्रजा या उभयतांस सारखाच आहे."

धर्मपाळदेव म्हणाले, "धर्माचा रस्ता कोणता प्रभु ? मला तर कांहीं कळत नाहीं."

" अनाथ दु:खिताचें रक्षण करणें हा सर्वांत श्रेष्ठ धर्म आहे. कल्याणी आश्रयविहीन आणि अनाथिनी आहे. धर्मदृष्टया ती आपली पत्नी आहे. चक्रायुध जरी आपला आश्रित असला, तरी आपण जसे राजे तसा तोहि राजा आहे. चक्रायुधाच्या राज्यांत तो नसला तर त्याची जागा दुसरा एखादा राजा भरून काढूं शकेल, परंतु कल्याणीला दुसरा भ्रतार मिळणें अशक्य ! आपण तिचा त्याग केल्यास दुसरा कोणीहि क्षत्रिय तिचें पाणि-ग्रहण करणार नाहीं. गौडेश्वर ! त्या दु:खी बालेचें पाणिग्रहण करणें हाच खरा नीतिमार्ग ! "

वृद्ध भीष्मदेव आसनावरून ताडकन् उडी मारून म्हणाला, " साधु, महास्थविर साधु, खरोखर हाच खरा नीतिमार्ग ! महाराज, क्षत्रियांचा धर्म तो हाच ! मीसुद्धां हेच आपणाला सुचविणार होतों. परंतु गौडसाम्राज्याच्या भावी दुरावस्थेची कल्पना मनांत उद्‌भवल्यामुळें माझ्यानें स्पष्ट तसें सांगवलें नाहीं,"

गौडाधिपतीनें सिंहासनावरून उठून म्हटलें, " प्रिय सामंतगणहो ! धर्माची आज्ञा हाच आपला रस्ता होय. गोविंदांच्या दूताला काय जबाब द्यावयाचा तें मीं आतां नक्की ठरविलेलें आहे. तुम्ही सर्व सामंतांनीं मिळून जरी आतां मला कल्याणीचा त्याग करावयाची सल्ला दिली, तरी तसें मी कदापिही करणार नाहीं. गौडराज्याचें जर मंगल होत असेल तर गौडसिंहासनाचा त्याग करावयासही मी तयार आहें; पण कल्याणीचा त्याग माझ्यानें कदापिही करवणार नाहीं. "

सर्वांनीं शांतपणें गौडेश्वरांचें भाषण ऐकून घेतलें. नंतर कमळसिंहानें आसनावरून उठून गौडेश्वरांना कडकडून मिठी मारली. भीष्मदेव, प्रमथसिंह व रणसिंह वगैरे सामंतांनीं सम्राटांना वेढून घेतलें. सर्वांनीं एकच जयनिनाद केला. गुप्त बैठकीच्या दिवाणखान्याबाहेर असलेल्या सेनानायकांना तो युद्धसूचक निनाद वाटून त्यांनींहि उच्चारवानें जयघोष केला. कांहीं वेळानंतर अमात्य गर्गदेव म्हणाले, " महाराज, सभागृहांत जाण्याची कांहींहि आवश्यकता नाहीं. राष्ट्रकूटराजदूताला येथेंच बोलवावें. याच जागीं गौडेश्वरांचा जबाब काय तो त्याला ऐकूं द्या ! "

गौडेश्वरांची या गोष्टीस संमति मिळतांच एक दंडधर गर्गदेवांच्या आज्ञेनुसार राष्ट्रकूटराजाच्या दूतास बोलावून आणण्यासाठीं निघून गेला. एका तासभरानें राष्ट्रकूट राजदूत त्या ठिकाणीं येऊन पोहोंचला. त्या वेळीं सारी सभा अगदीं तटस्थ झाली होती. धर्मपाळदेवांच्या एका बाजूला गर्गदेव व दुसऱ्या बाजूला भीष्मदेव उभे राहिले. दूत आसनस्थ झाल्यावर भीष्मदेव म्हणाला, " दूत ! परमेश्वर भट्टारक परम सौगत महाराजाधिराज गौडाधिपतींच्या आज्ञेनें त्यांच्या व सर्व गौडीय सामंताच्या समक्ष त्यांच्यावतीनें मी राष्ट्रकूटराज गोविंदांच्या विनंतीस असें उत्तर देतों कीं, गोकर्णदुर्गाच्या राजनंदिनीशीं गौडेश्वर कधींच विवाहसूत्रानें बद्ध झालेले आहेत. जरी विधियुक्त विवाह झालेला नाहीं, तरी गांधर्व लग्न झालेलें असून क्षत्रियांत अशीं लग्नें योग्य समजली जातात. क्षत्रिय धर्मानुसार प्रथम पत्नी तीच पट्टाभिषिका—महाराणी—गणली जाते. लोकांत चर्चा होईल म्हणून गौडेश्वर दुसऱ्या पत्नीचें पाणीग्रहण करूं इच्छित नाहींत. म्हणून गौडेश्व-

रांना स्वजामात बनविण्याची जी सदिच्छा राष्ट्रकूटराजांनीं प्रदर्शित केलेली आहे. ती नाइलाजास्तव गौडेश्वरांना अमान्य करावी लागत आहे, या बद्दल खरोखरच फार वाईट वाटतें. राष्ट्रकूटराज गौडेश्वरांचें परमहितचिंतक मित्र बिकट प्रसंगीचें बंधु–विपत्तींतून त्यांना सोडविणारे उद्धारक आहेत. ही गोष्ट जरी खरी आहे, तरी गौडेश्वरांना त्यांच्या कन्येचें पाणिग्रहण करतां यावयाचें नाहीं. दक्षिणापथाचे अधीश्वरांना कळवा कीं, धर्मपाळदेव या एका गोष्टींखेरीज त्यांच्या इतर कोणत्याहि आज्ञेचें पालन करावयास तयार आहेत. परंतु या मागणीचा स्वीकार करणें धर्मबाह्य असल्यामुळें त्यांचा सर्वस्वी निरुपाय आहे.

• •

## ४५

योग्य वेळीं कल्याणीदेवीचा विवाह धर्मपाळदेवांबरोबर झाला. कल्याणीदेवी आतां गौडसाम्राज्याची पट्टमहादेवी म्हणून अभिषिक्त झाली. महाकुमार वाक्पाळ गौडीय सामंताबरोबर एक लाख फोजेनिशीं पंचनदांत गुर्जराजाचा मुलुख जिंकण्यास निघून गेला. पहातां पहातां या गोष्टीस सहा महिने उलटून गेले.

गौडीयसेनेनें गंगा आणि यमुना पार होऊन शतद्रु आणि विशापामधील प्रदेशांवर आक्रमण केलें. हिंवाळयाच्या सुमारास असा समाचार आला कीं, राष्ट्रकूटराज गोविंद आणि महानायक जयवर्धन यांनीं भिल्लमाळची राजधानी जिंकून घेतलेली असून गुर्जरराजानें गोविंदाची ताबेदारी स्वीकारून तह करावयाची आपली इच्छा प्रदर्शित केलेली आहे.

वाक्पाळाच्या बाहुबळानें शतद्रु आणि विशापांच्या कांठच्या प्रदेशावरील गुर्जरराजाची सत्ता संपुष्टांत आली. शेंकडों वर्षांनंतर कौरव पांडवांच्या वंशजांना पुनः साम्राज्याची प्राप्ति झाली. अखिल आर्यावर्तांत गौडीय वीराचें यशोगान गाण्यांत येऊं लागलें. वाक्पाळाचें सैन्य जेव्हां विशापापार होऊन विशाल इरावतीच्या कांठी जाऊन पोहोंचलें, तेव्हां जंगी फौजेनिशी दक्षिणापथचा अधीश्वर गोविंद कान्यकुब्जांत आल्याचें वृत्त गौड देशांत

समजलें. त्यानें गुर्जरराजाबरोबर केलेल्या तहनाम्यावर सही करण्यासाठीं गौडेश्वरांच्या प्रतिनिधीला कान्यकुब्जास पाचारण केलें. या तहामुळें आपल्या राज्याची हद्द उत्तरेस यमुना व दक्षिणेस नर्मदानदीपर्यंत असल्याचें गुर्जरराज नागभट्टानें कबूल केलें; आणि पंचनदवासी गुर्जरांशीं आपण तह करणार नाहीं अशी कबुलायत दिली. वाक्पाळानें दूताचें द्वारें असा समाचार पाठविला कीं, भोज, मत्स्य, कुरु, यदु, यवन, गांधार आणि कीर वगैरे देशांत गौडीयसेनेच्या बाहुबळानें पुन: गौडची राजसत्ता प्रस्थापित झालेली आहे. महामंत्री गर्गदेव तहनाम्यावर सही करण्यासाठीं गौडाहून कान्यकुब्जास गेला. वसंत ऋतु येतांच दीर्घकाळपर्यंत लांबलेल्या या गुर्जरयुद्धाची समाप्ति झाली असें आतां सर्वांस वाटलें.

अकस्मात एके दिवशीं असा समाचार आला कीं, भीष्मदेव मगधांत परत आलेला असून थोड्या दिवसांत सम्राटांना भेटावयासाठीं गौडास यावयाचा आहे. हा समाचार ऐकतांच धर्मपाळदेवांना मोठी चिंता उत्पन्न झाली. त्यांनीं वृद्ध महानायक भीष्मदेवांना महाकुमार वाक्पाळाच्या मदतीस पंचदानास पाठविलेलें होतें. तो एकटाच परत येत असल्याचें ऐकून नानाप्रकारच्या शंकाकुशंका धर्मपाळदेवांच्या मनांत उद्भवल्या.

एके दिवशीं संध्याकाळीं भीष्मदेव राजमहालाच्या द्वारापाशीं आला व त्यानें सम्राटांच्या भेटीची इच्छा दर्शविली. प्रतिहारी व दंडधर यांनीं लगेच त्यास सम्राटांस नेऊन भेटविलें. भीष्मदेवास पाहून धर्मपाळदेवांनीं आसनावरून उठून कंपित स्वरांत त्यांस विचारलें, " तात, समाचार काय आहे? आपण एकटेचसे परत आलांत ? "

वृद्ध भीष्मदेव आसनावर बसून धर्मबिंदु पुशीत म्हणाला, " वत्स ! भयंकर संकट येऊन ठेपलें आहे. मजबूत पायावर गौड साम्राज्य स्थापित झालें खरें, पण दैव अजून अनुकूल असल्याचें दिसत नाही. "

" कां बरें असें म्हणतां ? "

" इरावतीच्या किनारी असतांना राष्ट्रकूटराज गोविंदानें आपणांशीं युद्ध पुकारल्याचें अशुभ वर्तमान मला कळलें आहे. त्याच्या सैन्यानें यमुनेच्या कांठचा आपला सर्व प्रदेश जिंकून घेतलेला असून स्थान्वीश्वर आणि

पृथुदकदुर्गांत त्याची एक लाख सेना घुसलेली आहे. त्यापेक्षांसुद्धां अधिक फौज घेऊन राजपुत्र कक्क हा मथुरा येथें तळ देऊन राहिलेला आहे. कान्यकुब्जांतील राष्ट्रकूटराजाचें सैन्य विजयोत्सवांत मग्न न राहतां युद्धाच्या तयारीस लागलेलें आहे.

पंचनदांतील युद्ध संपलें खरें, पण महाकुमार वाक्पाळांना मागें फिरतां येणें अशक्य आहे. भिल्लमाळांतून वत्सपाळ आणि जयवर्धन यांना गुर्जरराजाच्या अनुमतीशिवाय परततां येणें शक्य नाहीं. गौडांत इकडे आपण एकटेच असल्यामुळें प्रमथसिंह आणि कमळसिंह यांनीं मला येथें पाठविलेलें आहे. राष्ट्रकूटराजानें युध्दास सुरवात करण्याचें कारण काय ?

उत्तरापथ आणि दक्षिणापथांत आतां दुसरा कोणीहि शत्रु उरलेला नाहीं. नागभट्ट कैदेंत आहे, चक्रायुध गोविंदाच्या ताब्यांत आहे; मग गोविंदाला अशा प्रकारें युध्द करण्याचें प्रयोजन कोणतें ? कारण उघड आहे. वत्स ! भयंकर संकट ओढवलेलें आहे. सारी गौडीयसेना माळवा आणि पंचनदांत आहे. या वेळीं जर गोविंदानें गौडदेशावर आक्रमण केलें, तर साम्राज्याचें रक्षण कोण करील ?"

" तात, गोविंदाला असें करण्याचें कारण काय ? "

" त्याच्या कन्येचें पाणिग्रहण करण्याचें आपण नाकारलें ही गोष्ट विसरलात का ?"

" नाहीं, विसरलों नाहीं."

" दक्षिणापथच्या अधीश्वरानें आपण होऊन आपली कन्या गौडेश्वरांना अर्पण करावयाचा आपला मनोदय व्यक्त केलेला होता; पण त्यांची ही विनंति आपण अमान्य केली. हें वृत्त उत्तरापथ आणि दक्षिणापथ येथें खेडोखेडींहि जाहीर झालेले आहे. राष्ट्रकूट हा अपमान विसरलेला नाहीं. गोविंद राजनीतींत कुशल आहे. नागभट्टांत जोंपर्यंत शक्ति होती, तोंपर्यंत आपल्या मैत्रींत त्यानें बिघाड पडूं दिला नाहीं. आतां तें युध्द संपलें. तशांत गौडेश्वर आतां अगदीं हलाख झाले आहेत. व गौडीयसेना विदेशांत आहे; या संधीचा फायदा घेऊन त्यानें आतां युध्द आरंभिलेले आहे. ही वेळ खरी आणीबाणीचीं आहे. या वेळीं वृध्द व बालकांना घेऊ-

नच गौडसाम्राज्याचे रक्षण करावें लागणार. हा वृद्ध एवढ्याचकरितां पंचनदांतून येथें आलेला आहे.''

'' तात, विरर्थक बळाचा अपव्यय करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी आपण होऊन सिंहासनाचा त्याग करून वाक्पाळाचीं सिंहासनावर स्थापना करतों. तो अविवाहित आहे. तेव्हां राष्ट्रकूटराजकुमारीचें पाणिग्रहण करून तो तिला पट्टमहादेवीं करील.''

'' तसें केलें तरी गोविंदाच्या मनांतील अपमानाचें शल्य दूर होणार नाहीं. युध्द नक्की करावेंच लागणार.''

'' कां बरें ? आपलीं कन्या गौडसाम्राज्ञी झाल्याचें पाहूनहि त्याच्या मनाला संतोष वाटणार नाहीं काय ? ''

'' नाहीं, कान्यकुब्जाच्या वाटेनें राष्ट्रकूटराजाचे सैनिक असें सांगत फिरत आहेत कीं, धर्मपाळदेवांचा अभिमान जिरवून राढीय सामंतकन्येला गौडाच्या सिंहासनावरून दूर करावयास हवें ! धर्मपाळदेव जोंपर्यंत स्वतः राष्ट्रकूटराजकन्येचे पाणिग्रहण करणार नाहींत, तोंपर्यंत ही अनलज्वाळा शांत होणार नाहीं ? ''

'' तर काय युद्ध करावेंच लागेल म्हणतां ? ''

'' होय, तसें केल्याशिवाय आतां गत्यंतरच नाहीं. एवढ्याचसाठीं मी तांतडीनें पंचनदाहून गौडास आलों. वृद्धांच्या युध्दांत माझ्यासारखा वृद्धच सेनानायक कर्णधार होण्यास योग्य ! हा भीष्मदेव गोपाळदेवाच्या पुत्राच्या सेवेंत आत्मोत्सर्ग करावयासाठींच आलेला आहे. ''

इतकें बोलतांबोलतां वृद्ध भीष्मदेवांच्या क्षीण नेत्रांतून अश्रूंचें दोन बिंदु त्याच्या शुभ्र मिशांवर पडले. तें पाहून धर्मपाळदेवांनीं कृतज्ञतेनें त्याच्या पायांवर मस्तक ठेविलें. वृद्धाने त्यांना उठवून म्हटलें, '' यांत वाईट वाटून कां म्हणून घेतां ? माझें वय आतां झालेले आहे. वृद्धावस्थेंत गोपाळ-देवाच्या पुत्राखातर जीवन विसर्जन करणें यासारखी गौरवास्पद दुसरी गोष्ट ती कोणती ? आतां विलंब लावण्यांत अर्थ नाहीं, तयारीस लागा. पंचवीस हजार फौजेनिशीं शत्रूच्या एक लाख सेनेचा आपणांला आतां प्रति-कार केला पाहिजे.

शोणनदीचा किनारा आणि मंडला पर्वताशिवाय गौडसाम्राज्याला दुसरें एकहि रणक्षेत्र नाहीं गुर्जरयुद्धांत हें शेंकडोंवार अनुभवाला येऊन चुकले आहे. साधारण सैन्याच्या बळावर शोणनदीच्या किनाऱ्यावर युध्द करणें जोखमीचें आहे. म्हणून मी मगधांतील सर्व सेना मंडला येथें एकत्रित केलेली आहे. गौडराज्यांत युध्द करण्याजोगे कोणकोण आहेत ?

मातृभूमीच्या रक्षणार्थ जीव कुर्बान करण्यास कोण तयार आहेत ? जे कोणी असे असतील, त्यांना मजबरोबर पाठवा. वत्स ! वाराणशीहून मंडला कांहीं फार दूर नाहीं, तेव्हां मी उद्यांच येथून निघेन. ''

अश्रुपूर्ण नेत्रांनीं धर्मपाळदेव म्हणाले, '' तात, पंचनदांतून युध्दाचे भयंकर परिश्रम करून आल्यावर जर मी आपणांला मंडला येथें युध्दार्थ धाडीन, तर लोक मला काय म्हणतील ? मी जिवंत असतां आपणांला युध्दाच्या तोंडी दिल्यास या आर्यावर्तात चिरकालपर्यंत लोक माझी निंदा करतील.''

'' ऐकून घ्या सम्राट ! मी काय म्हणतो तें. हा वृद्ध तयारच होऊन आलेला आहे. गौडसाम्राज्यांत यावेळीं तुम्ही अगर मी यांवाचून कोणीहि कर्णधार नायक नाहीं- एकानें साम्राज्यद्वार संभाळाचें व दुसऱ्यानें गौडाचें रक्षण करावें.

मी मगधाचा नायक म्हणून मगधाचें रक्षण करणें हें माझें मुख्य कर्तव्य आहे. तुम्ही स्वतःच जर मंडला येथें जाऊं पहाल, तर तुमच्या मृत्युमुळें समग्र गौडसाम्राज्य धुळीला मिळेल. आपण जिवंत राहिलांत तर गौडसाम्राज्य अबाधित राहील. आतां निरर्थक गोष्टींत कालक्षेप करूं नका तयारीस लागा आणि जे कोणी मार्गें परतून येण्याची आशा बाळगीत नसतील, अशांना मजबरोबर पाठवा.''

इतके म्हणून भीष्मदेव तेथून चालता झाला; परंतु धर्मपाळदेव निस्तेज मुखानें दिवाणखान्याच्या खिडकीपाशीं उभा राहिला. व पाहतां-पाहतां या युध्दाचें वर्तमान साऱ्या गौडदेशांत पसरलें. तेव्हां सर्व गौडवासी शोकसागरांत निमग्न झाले.

अजूनहि गौडांत चैतन्य खेळत होतें. भयंकर विपत्ति कोसळलेली

पाहून मायभूमीच्या रक्षणार्थ शेंकडों वृद्ध सैनिक राज्याच्या निशाणा· भोंवती गोळा झाले. त्यांनीं वृद्ध महानायकाविषयीं इत्थंभूत हकिकत ऐकली होती. जिवंत बचावून मागें परत फिरण्याचा आणि जगण्याच्या आशेवर पाणी सोडून हे सर्वजण वृध्द भीष्मदेवाबरोबर गौडसाम्राज्यद्वाराचें संरक्षण करावयास निघून गेले.

• •

## ४६

गौडसाम्राज्याची पट्टमहादेवी असूनहि कल्याणीदेवीच्या मुखावर बिलकुल हास्य दिसत नव्हतें. आपल्याखातरच धर्मपाळदेवांना राष्ट्रकूटराजाबरोबर भयंकर युध्द करावें लागलें आहे हें ती समजून चुकली. ज्याचें इष्टमित्र, आप्त, सगेसोयरे युध्दासाठीं गेले होते किंवा जाण्याच्या तयारींत होते, ते जरी उघड उघड बोलत नसले तरी शेंकडों पत्नी आणि माता मनांतून आपणांवर शापांचा वर्षाव करीत असतील या गोष्टींचीं सारखी रुखरुख तिच्या मनाला लागून राहिली.

स्वेच्छेनें तळहातावर शीर घेऊन गौड देशाच्या द्वाररक्षणार्थ भीष्मदेवाबरोबर मंडला येथें जाणारांची संख्या जवळ जवळ पांच हजार होती· बाकीच्या सैन्यासह गौडेश्वर राजधानीचें रक्षण करावयाच्या तजबिजींत गुंतले होते. हत्यारें धारण करावयास असमर्थ असलेलीं मुलेंबाळें, स्त्रिया व वृध्द यांना दूरच्या खेडोखेडीं पाठविण्यांत आलें, तीन वर्षेपर्यंत पुरेल इतकीं अन्नसामुग्री राजधानींत गोळा करून ठेवण्यांत आली; आणि भागीरथी आणि कालिंदी नदींतून पिण्यासाठीं पाणी नगरांत मुबलक मिळूं शकेल अशी व्यवस्था करण्यांत आली. गौडराजधानीचा याप्रमाणें पूर्ण बंदोबस्त केल्यावर धर्मपाळ राजवंशी महिलांना घेऊन कोणत्या तरी सुरक्षित जागीं जाण्याच्या तयारीला लागले. उत्तर राढदेशांतील ढेकरीच्या किल्ल्यांत

महादेवी देद्ददेवी व पट्टमहादेवी कल्याणीदेवीला नेऊन ठेवण्याचा नक्की विचार ठरला. परंतु निघावयाच्या दिवशीं त्या दोघींनींहि ही गोष्ट नाकारली. धर्मपाळदेवांनीं त्यांची पुष्कळ प्रकारें समजूत करण्याचा प्रयत्न केला. पण तो निष्फळ ठरला. शेवटीं मंडलाचें रक्षण करावयासाठीं दुसऱ्या सैन्याची जमवाजमव करण्याच्या उद्योगास ते लागले.

मंडलासाठीं हें जें दुसरे सैन्य एकत्रित केले, तें दोन हजारांपेक्षां जास्त नव्हतें. गौडेश्वर स्वत: तें सैन्य घेऊन मंडला येथें जावयास निघाले.

ज्या दिवशीं प्रभातकाळीं धर्मपाळदेवांनीं गौड नगराचा त्याग केला, त्या दिवशीं कल्याणीदेवी गच्चीवर उभी राहून प्रयाण करीत असलेल्या गौडीयसेनेचीं निशाणें पहात उभी होती इतक्यांत विमलादेवीनें मागाहून येऊन तिच्या पाठीवर हात ठेवला. त्यासरशीं कल्याणीदेवीनें दचकून मागें वळून पाहिलें. विमलादेवी म्हणाली, " महादेवी, कसला विचार चालला आहे ? स्नानाला नाहीं का चलायचें ?"

" ताई, तुम्ही मला महादेवी म्हणून हांक मारतां ? मला कीं नाही या गोष्टीची भारी लाज वाटते. "

" मग कोणत्या नांवानें मी आपणांला हांक मारावी म्हणतां ?"

" माझें कल्याणी हें नांव घेऊन."

" असें कसें होईल ? "

" कां बरें, यांत हरकत कोणती ? "

" आपण आतां गौडसाम्राज्याच्या पट्टमहादेवी झाला आहांत, तेव्हां नांवानें आपणांला हांक मारल्यास लोकांत माझें हंसें होईल."

" ताई, तुम्ही महादेवी या नांवानें मला हांक मारली म्हणजे माझ्या हृदयाचा दाह होतो, त्या वेळीं माझ्या मनांत असें येते कीं, माझ्याखातर श्वशुरकुळाचा उच्छेद होत आहे—स्वामींच्या सत्यानाशाला मीच कारणीभूत होत आहे—सोन्यासारख्या राज्याची माती होत आहे आणि लाखों जीव मृत्युमुखीं पडत आहेत. घरोघरी पुत्रविहीन माता, पतिहीन विधवा आणि पितृहीन बालकें निरंतर माझ्याखातर शापांचा वर्षाव करीत आहेत. ताई

मी गौडसाम्राज्याची पट्टमहादेवी नाहीं तर कुळाचा आणि राज्याचा नाश करणारी राक्षशीण आहे."

" नाहीं, नाहीं, असें कां म्हणन म्हणतां ? तुम्ही तर राज्याच्या लक्ष्मी आहांत; पूजेची वेळ आतां होत आली आहे आणि आपल्या सासूबाई तिकडे आपली वाट पहात आहेत तरी आतां चला पाहूं लौकर."

दोघीजणी त्यानंतर गच्चीवरून खाली उतरल्या. असंख्य दासी आणि पुरमहिलांबरोबर गौडेश्वरी गंगा नदीवर स्नानाला निघाली. राजमहालयाच्या ज्या घाटावर एके दिवशीं धर्मपाळदेवांनीं भंडीचें वंशज चक्रायुधयांना अभयदान दिले होतें. त्याच घाटावर त्या सर्व स्नानास उतरल्या. सर्वांअगोदर पट्टमहादेवीनें स्नान उरकलें, नंतर कल्याणीदेवी ओल्या वस्त्रानिशीं घाटावर येऊन उभी राहिली. इतक्यांत एकाएकीं आम्रवृक्षाच्या आडून एक कृष्णवर्ण अंध मुलगा तेथें येऊन म्हणाला, " ताई, तुम्ही कोठें आहांत ?"

विस्मयानें कल्याणीदेवीनें विचारले, " बाळ. कोणरे तूं ?"

" मी काणा ताई !"

" कोण ? काणा !"

" होय."

" तुला काय पाहिजे बाळ ?"

" मला कांहींहि नको. मी फक्त आपणांला भेटायला आलों आहे. तुम्ही केव्हां जाणार आतां ताई ?"

" कुठें बाळ ?"

" ज्या जागीं दुःख, शोक, जरा, व्याधि आणि मृत्यु नाहीं तेथें."

" ती जागा कोणती ?"

" ती मला माहीत नाहीं; परंतु कुणीसे मला सांगितलें आहे कीं, त्या जागीं सगळीं माणसें कांहीं जाऊं शकत नाहींत तरी पण तुम्हांला जातां येईल."

" मुला, तूं कोण आहेस ?"

" मी एक आंधळा आहे ताई !"

" तुझें नांव काय बाळ ?"

" कोणी मला आंधळा म्हणतात आणि कोणी काणा म्हणतात. या-शिवाय मला दुसरें नांव नाहीं. "

" दुसरें कोणी तुझ्या नात्यागोत्याचें आहेत कां ?"

" ज्याप्रमाणें तुम्ही माझ्या ताई आहांत; तशाच मला कांहीं बहिणी, भाऊ, माता आणि पिता आहेत. "

दोघेंहि जण याप्रमाणें गोष्टी बोलत बोलत भागीरथीच्या किनाऱ्या-वर आलेल्या आम्रकुंजांत आलीं. पट्टमहादेवीला पाहून त्या कुंजाच्या रण-णार्थ असलेल्या स्त्रिया तेथून दूर निघून गेल्या. एका विशाल प्राचीन झाडामागें उभें राहून गौडेश्वरीनें त्या अंध मुलाला विचारले, " बाळ' जेथें शोक किंवा दुःख नाहीं असा प्रदेश तरी कोणता ? "

अंध मुलानें उत्तर दिले, " हा प्रदेश कोठें आहे तें मला माहित नाहीं. तरी पण त्यानें असा एक प्रदेश असल्याचें मला सांगितलें आहे. तो प्रदेश–तें राज्य तुमच्यासाठीं आहे. तेथील सिंहासनाची रिकामी असलेली जागा तुम्ही भरून काढा. "

" असे कुणी सांगितले आहे ? "

" त्यानें सांगितलेले आहे ?"

" तो म्हणजे कोण ?"

" आहे एक जण. पण तो कोण हें मी जाणत नाहीं. त्याला रूप, रस, गंध वगैरे कांहीं नाहीं. तरी पण असा कोणी तरी आहे खास ! माझ्यासारख्या अंधांना तो मार्ग दाखवितो, पायांला एक कांटाहि बोचूं देत नाहीं. एखाद्या सेवकाप्रमाणें तो क्षुधितांना अन्न व तृषार्तांना पाणी देत असतो. असा तो कुणीतरी आहे. त्याला मी पाहूं अगर स्पर्श करूं शकत नाहीं. मात्र दूर अन्तरावरून शुष्कपर्णांच्या मधुर ध्वनिप्रमाणें त्याचें शब्द माझ्या कानावर येतात. त्याचा आवाज मी ऐकतों पण तो माझ्या दृष्टीला पडत नाहीं."

" मग त्यानेंच का तुला येथें धाडलेलें आहे ? काय सांगितलें आहे त्यानें ?"

" त्यांनीं मला नुकतेंच असें सांगितलें आहे कीं, मातोश्री कल्याणी-देवी या वेळीं गंगेंत स्नान करीत आहेत; जेव्हां त्यांचें स्नान आटोपून त्या बाहेर येतील, तेव्हां त्यांना असें कळवा कीं, तुम्ही आतां लवकरच आपल्या स्थानीं प्रयाण करून आपल्या राज्यांत जा. ते तुम्हांला घेऊन जाण्यासाठीं येतील. आपल्या जाण्यानें जरी आपल्या पतीच्या हृदयाला धक्का बसेल, आपल्या पित्याच्या वेळचें वृद्ध नोकर उद्धवघोष शोकग्रस्त होतील, तरी त्याबद्दल आपण बिलकुल वाईट वाटून घेऊं नका. अखिल जगाच्या सुखासाठीं आणि हितासाठीं आपला जन्म झालेला आहे. आपण देहत्याग केल्यास आपल्या अनेक जन्मींच्या पुण्यफळानें गौडदेशाचा उद्धार होईल; आणि गौडवासीयांच्या शोकाची समाप्ती होईल. त्यानें असें सांगितलेले आहे कीं' तुम्ही भिऊं नका, तुमच्या पायाला एक कांटाही बोंचणार नाहीं माताजी ! तुम्ही येथील नाहीं, या जगांतील पण नाहीं. आमचा देश, आपलें जगत्, आपली वाट पहात आहे. या जगांत पुष्कळ, दुःख आणि कष्ट आहेत, म्हणून होईल तितक्या त्वरेनें आपण देहाचा त्याग करून तेथें जा. "

" जाईन जरं बाळ ! पण त्याला इतकंच विचार कीं, माझ्या जाण्यानें माझ्या श्वशुरकुळाचं अमंगळ होण्याचं थांबेल का ? गौडराज्यांत पुनः शांति प्रस्थापित होईल का ? गौडवासीयांचा शोक आणि दुःखावेग शमेल का ? "

" होय, त्यानें असेंहि सांगितलेले आहे कीं ज्या दिवशीं तुम्ही गौड-वासीयांसाठीं आत्मोत्सर्ग कराल त्या दिवशीं या जगांत शांती पसरेल. आपल्या पुण्यरूपी शीतल जलाच्या सिंचनानें धगधगत असलेला अग्नि शांत होईल, मी जातों आतां, तुम्ही या मागून. मी पण तुमच्याच बरोबर असेन. तो मला बोलावीत आहे, म्हणून मी जातों. तुम्ही पण या बरें ! "

इतकें बोलून विद्युत् वेगानें तो अंध मुलगा तेथून निघून गेला. कल्याणीदेवी त्या आम्रवृक्षाखालीं निस्तब्ध उभी राहिली. तिचें सर्व शरीर थर-थर कांपूं लागलें.

इतक्यांत संन्यासी विश्वेश्वरानंद एखाद्या उन्मत्ताप्रमाणें धांवत धांवत घाटावर येऊन उभा राहिला आणि अत्यंत व्याकुळचित्तानें चारी बाजूंना पाहूं लागला. दूर एक दासी उभी होती. तिला त्यांनीं प्रश्न विचारला, " इकडे एखादा अंध मुलगा तुझ्या पाहण्यांत आला आहे काय ? "

दासीनें उत्तर दिले, " नाहीं प्रभु ! असा कुणी अंध मुलगा मी तर येथे आलेला पाहिला नाहीं. "

विश्वेश्वरानंदांनीं पुन: प्रश्न केला. " कल्याणीदेवी कुठें आहे ?"

" पट्टमहादेवी नुकतीच स्नान करून या आम्रकुंजांत गेलेली आहे."

नंतर स्वामी विश्वेश्वरानंदांच्या सांगण्यावरून दासी, पुरमहिला व द्वाररक्षिका आम्रकुंजांत कल्याणीदेवीचा शोध करूं लागल्या. इतक्यांत खुद्द विश्वेश्वरानंदांना देवी कल्याणी एका प्राचीन आम्रवृक्षाच्या छायेंत थरथर कांपत उभी असलेली दिसली. तें पाहुन त्यांनीं तिला विचारले, " बाळे, काय झाले आहे ? "

कांहीं उत्तर न देतां कल्याणी डोळे पुसूं लागली. विश्वेश्वरानंदांनीं विचारलें, " बाळे, दक्षिणापथांतून मागें परततांना एका अंध अनाथ मुलाला आम्ही बरोबर आणलें होते. तो इकडे तुझ्यापाशीं आला होता कां ?"

" होय पिताजी, आला होता ? "

" अरें र र ! घात झाला. कल्याणी ! त्यानें तुला काय सांगितले आहे ? "

" फारच शुभ वर्तमान पिताजी ! तो सांगून गेला आहे कीं, तो मला बोलावीत आहे. स्वामींच्या मंगलासाठीं, श्वशुरकुलाच्या मंगलासाठीं गौडराज्य आणि गौडवासीयांना शोक आणि दु:ख शमविण्यासाठीं मला जावयालाच हवें. पिताजी मी मोहजालांत मुग्ध बनलेली आहे म्हणून मी आतां कोणत्या मार्गानें जाऊं, तें तुम्हीच सागा ?"

हें ऐकून एखाद्या बालकाप्रमाणें वृद्ध संन्यासी रडूं लागला. कांहीं वेळानंतर तो म्हणाला,--

" बाळे, तो मार्ग कोणता, कसला आणि बोलावणारा कोण तें आज साठ वर्षांचे वय झालें तरी मला स्वतःलाच कळत नाहीं. तुझें हें राज्य, हें सिंहासन, हे पतिदेव आणि हें सगळें ऐश्वर्य सोडून तूं कुठं जाणार बाळे ?"

● ●

## ४७

एका बाजूला विशाल गंगानदी कलकल निनाद करीत वहात होती. दुसरीकडे गगनचुंबित विंध्यपर्वत उभा होता. या दोहोंतून एक अरुंद रस्ता निघालेला आहे. हाच एक रस्ता मगध आणि अंग देशांतून गौडांतून आलेला आहे. या स्थळीं पश्चिम दिशेनें दुसरा एक रस्ता विंध्यपर्वताला ओलांडून आलेला होता. अशा बिकट स्थळीं पर्वतशिखरावर दगडांनीं बांधलेला भयंकर मंडलादुर्ग आलेला होता, लोक म्हणत कीं, पूर्वीं त्या दुर्गावरून लोखंडी गोळे फेकून अरुंद रस्त्यानें पर्वतावर चढत असलेल्या शत्रुसैन्यास गौडावर आक्रमण करतां येणें अशक्य करतां येण्याजोगें होतें.

एके दिवशीं दिवसाच्या पहिल्या प्रहरीं एक घोडेस्वार त्या दुर्गाखालीं येऊन उभा राहिला, आणि पर्वतावर जाणाऱ्या आडव्यातिडव्या रस्त्यानें दुर्गावर चढूं लागला. द्वाररक्षकानें त्याला ओळखून द्वारें सताड उघडून दिलीं. घोडेस्वार त्यानंतर किल्ल्यांत दाखल झाला. त्या वेळीं उदंडपुरचा महासामंत वृद्ध भीष्मदेव दुर्गाच्या अंगणांत बसला होता. त्याला अभिवादन करून घोडेस्वार म्हणाला, " महाराज, राष्ट्रकूट राजाच्या सैन्यानें काल संध्याकाळीं चंपानगर जिंकून घेतलेले आहे; आणि तें आतां मंडलादुर्गावर आक्रमण करील."

भीष्मदेव म्हणाला, " त्यांनीं जेव्हां नगरांत प्रवेश केला, तेव्हां कोणी त्यांना अटकाव केला होता का ?"

" नाहीं, नगरवासीयांनीं आपल्या आज्ञेनें नगराच्या प्रतिहाऱ्यांना बंदींत टाकलें होतें. राष्ट्रकूटराजानें नगरांत प्रवेश केल्यानंतर त्याचीं मुक्तता केली. "

" राष्ट्रकूट सेनेचा सेनानायक कोण होता ? "

" राष्ट्रकूटराजा गोविंद आणि त्याचा भाऊ कक्कराज ! "

" ठीक, तुम्ही आतां विश्रांति घ्या. "

एका क्षणभरांतच भीष्मदेवाच्या हुकुमानें दुर्गांचें रक्षण करणारें दहा हजार सैनिकांचें सैन्य दुर्गांत जमा झाले. वृद्ध महानायक अंगणाच्या एका बाजूला उभा राहून मोठ्या आवाजानें म्हणाला, " बहादुरसैनिक हो, उद्यां पहांटेस शत्रुसैन्य मंडालादुर्गावर आक्रमण करील. दहा हजार सैनिकांना सात दिवस पुरेल इतक्या धान्याची बेगमी किल्ल्यांत केलेली आहे. म्हणून अर्धपोटी राहून आपण पंधरा दिवस जेमतेम काढूं या; पंधरवरड्याहून जास्त दिवस मात्र आपला आतां निभाव लागणें कठीण आहे. अजूनही ज्यांची परत घरीं जाण्याची इच्छा असेल, त्यांनीं खुशाल जावें. मंडला-दुर्गाच्या रक्षणार्थ ज्यांना आतां राष्ट्रकूटराजाशीं युद्ध करावें लागणार आहे त्यांनीं मागें जिवंतपणीं परतून येण्याची आशा उराशीं बाळगतां उपयोगाचें नाहीं. या भीषण युद्धांत गौडसाम्राज्याची भाग्य परीक्षा होणार आहे. आपला जीव प्यारा असेल, ज्यांना आपल्या आप्तेष्टांचे मुखावलोकन करावयाचें असेल, त्याच्या खातर अजूनही मार्ग मोकाळा आहे.

ज्यांना कोणाला दुर्गाचे रक्षण करावयाचे असेल, त्यांनीं आतां तयार व्हावें. बधु हो, उद्यांचे युद्धांत जरी गौडेश्वरांचा विजय झाला; तरी आपणांला मागें परतून जातां यावयाचें नाहीं."

हें ऐकून एक सैनिक पुढें होऊन महानायकास अभिवादन करून म्हणाला, " महाराज, आपल्या बरोबर जे कोणी मंडलाच्या रक्षणार्थ आलेले आहेत, त्यांपैकीं कोणाचीहि परत मागें फिरावयाची इच्छा नाहीं. दहा सहस्त्रांपैकीं एकहि दुर्गत्याग करावयास तयार नाहीं."

संध्याकाळीं विंध्यपर्वताच्या पायथ्याशीं हजारों सैनिकांच्या चुडी पेटल्या, राष्ट्रकूटराजाचें सैन्य येत आहेसें पाहून भीष्मदेव युद्धासाठीं सज्ज झाला. दुसरें दिवशीं प्रभातीं सूर्योदय होण्यापूर्वीच राष्ट्रकूटराजाच्या सेनेनें किल्ल्यावर हल्ला चढविला. पर्वतावरील अरुंद मार्गानें सर्व सैन्य एकाच वेळीं चढून जाणें अशक्य असल्यामुळें पहिला आणि दुसरा प्रहर लोटला.

तरी राष्ट्रकूटराजाचें सैन्य किल्ल्यालगत पोहोंचूं शकलें नाही. मुठभर गौडीय आणि मागधीय सेनेला त्यामुळें त्यांना हटविता आलें. त्यानंतर राष्ट्रकूटच्या सेनानायकांनीं चोहींकडचीं गिरीशिखरे काबीज करून घेण्याचा प्रयत्न चालविला.

लक्षावधि राष्ट्रकूट सेनेनें पर्वतावरील अनेक स्थळीं हल्ले चढविले. भीष्मदेवानें दोन हजार सैन्य आपल्यापाशीं ठेऊन घेऊन बाकी पर्वत मार्गांच्या रक्षणार्थ पाठविले. मोठमोठ्या शिलांच्या आघातांनीं पुष्कळ राष्ट्रकूट-सैनिक गारद झाले, परंतु शेवटी असंख्य सैन्यबलानें गौडीयसेनेचें कांहीं न चालून ती आस्ते आस्ते मागें हटूं लागली. एक राष्ट्रकूट सैनिक पतन पावतांच दुसरा त्याची रिकामी जागा भरून काढूं लागला. परंतु गौडीय सेनेची तशी गोष्ट नव्हती. त्याचीं पडलेलीं प्रेतें उचलून न्यावयासहि कोणी मिळेना संध्याकाळ होण्यापूर्वीं पर्वतशिखरावर लढत असलेलें गौडीयसैन्य अगदीं थकून गेलें. ह्या संधीचा फायदा घेऊन राष्ट्रकूटच्या सैन्यानें फिरून जोराचा हल्ला चढविला. आतां पर्वतशिखराच्या रक्षणार्थ निष्कारण मनुष्यबळ खर्ची पडत आहे.

हें जाणून भीष्मदेवानें तेथील गौडीय सेनेला मागें परतण्याचा हुकूम फर्माविला आणि आतां तो गौडच्या मार्गाचें रक्षण करावयाचा शिकस्तीनें प्रयत्न करूं लागला,

संध्याकाळ उलटून गेली तरी युद्ध बंद होण्याचें लक्षण दिसेना. हजारों मशाली चोंहीकडे पेटल्या. गिरीशिखरांचा मार्ग आटोक्यांत येतांच राष्ट्रकूटसेनेनें एकाच वेळीं दुर्गावर आणि गौडच्या मार्गावर हल्ला केला, आतां मात्र युद्धाचें पारडें साफ बदललें. त्या घनघोर अन्धारांतही मूठभर गौडीयसेना राष्ट्रकूटसेनेस पुढें पाऊल टाकूं देईना.

अन्धारांत मंडलादुर्ग हस्तगत होणें कठीण असें राष्ट्रकूटाधीश गोविंदालाहि वाटूं लागलें. यावेळीं भीष्मदेवाचें निम्याहून अधिक सैन्य कमी झालें होतें. हजार सैनिक दुर्गांत व सुमारें हजार पर्वतावर काय ते शिल्लक उरलें होते.

मध्यरात्रीच्या काळोखांत किल्ला ताब्यांत येणें अशक्य असें वाटून

युद्ध बंद करण्याची राष्ट्रकूटराज आज्ञा गोविंद करणार तोंच एकाएकीं मंडलादुर्गाच्या मागील बाजूस गंगेच्या तिरीं पर्वतशिखरावर हजारों मशाली पेटलेल्या दिसून आल्या. तें पहातांच आनंदातिशयानें राष्ट्रकूटसेनेनें एकच जयघोष केला.

त्या जयनिनादानें तो सारा गिरीप्रदेश कंपायमान झाला. आणि चिमुकली गौडीयसेना भयभीत झाली. गोविंदानें सायंकाळच्या सुमारास दहा सहस्रसेनेला विंध्यपर्वताच्या पिछाडीला एखादा मार्ग सांपडतों कीं काय हें पहावयास पाठविलें होतें.

मंडलादूर्गाच्या पाठीमागें मशालींचा उजेड पहातांच तेंच सैन्य दुसरीकडे मंडलादुर्गावर आक्रमण करीत असल्याचें गोविंदाला दिसून आलें.

गौडीय आणि मागधीयसेनेला आपणांस कोठून कुमक येईल अशी आशाच नव्हती. तें दुसरें सैन्य राष्ट्रकूटराजाचेच असावें अशीच त्यांची ठाम समजूत होती. युद्धव्यवसायांत काळचाचें पांढरे केंस झालेल्या वृद्ध भीष्मदेवाला तर खास वाटूं लागले कीं, पुढून व मागून आपण शत्रूंच्या पूर्ण कचाटचांत सांपडलों आहोंत. आतां युद्ध लांवून लांबून तें कितीसें लांबणार ? या आधुनिक भीष्माचार्यांनें एकवार डोळे भरून गौडाकडे दृष्टिपात केला. त्यानंतर सर्व सरदारांस उद्देशुन तो गहिंवरून म्हणाला,—

" सरदारहो, आतांची आणीबाणीची वेळ आपल्या लक्षांत येवून चुकलीच असेल. आतां बचाव होणें दुरापास्त आहे. दुर्गांतच आपण स्वत:ला कोंडून घेतलें तर आठवडाभर कसाबसा निभाव लागेल. पण तें आयतेंच गोविंदाच्या पथ्यावर पडेल. वेडचापुरतें थोडे सैन्य येथें ठेवून बाकी फौजेनिशीं तो आपल्या डोळ्यादेखत गौडावर चालून जाईल."

त्याच वेळीं मंडलाच्या मागील बाजूला अनेक सैनिकांनीं एकच जयघोष केला. तो ऐकून भीष्मदेव अगदी व्याकुल चित्तानें म्हणाला.

" आतां वेळ नाहीं, दुर्गाच्या पिछाडीस शत्रूसैन्य येऊन ठेपलेले आहे, म्हणून माझे शूर सरदारहो, आपण शिल्लक असणारांनीं आज शत्रूवर मरणाची बिलकूल क्षिति न बाळगतां तुटून पडलें पाहिजे."

महानायकासन्मुख एक सरदार उभा होता. त्यानें जयध्वनि करतांच

दोन सहस्र गौडीय वीरांनीं त्याचें अनुकरण करून आकाशपाताळ अगदीं एक करून सोडले. भीष्मदेव त्या सरदारास उद्देशून म्हणाले,

" गुणवंत ! दुर्गास आग लावा. "

गुणवंताच्या हुकूमाप्रमाणें लगेच किल्ल्यांत जागोजागीं आग लावण्यांत आली. पहातां पहातां मंडलादुर्गाचे भयंकर अग्निकुंडांत रुपांतर झाले त्याच वेळीं घडाक्यासरशीं किल्ल्यानें मुख्य सिंहद्वार उघडले गेलें.

गौडीय आणि राष्ट्रकूटसेना विस्मयचकित होऊन पाहते तों ऐंशी वर्षांचा वृद्ध महानायक उजव्या हातांत चक्रध्वज घेऊन वीस वर्षांच्या एखाद्या तरण्याबांडाप्रमाणें किल्ल्याच्या पायऱ्या झपाझप उतरत आहे. तें पाहून गौडीयसेनेनें भयंकर सिंहगर्जना केली. त्यासरशीं सन्मुख असलेली राष्ट्रकूटसेना भयभीत होऊन किंचित् मागें सरकली. घोर अंधाऱ्या रात्रीं मंडलादूर्गातून निघत असलेल्या भयंकर अग्निज्वाला जणूं गगनाशीं जाऊन भिडत होत्या.

त्या प्रकाशांत गौडीयसेना जिवावर उदावर होऊन विद्युत्‌वेगानें शत्रूवर तुटून पडली. राष्ट्रकूटचें सैन्य एकेक पाऊल मागें हटूं लागलें. खुद्द गोविंद त्या क्षेत्राच्या अग्रभागीं उभा राहुन आपल्या सैन्यास धीर देऊं लागला; तरी गौडीयसेनेची गति तो थांबवूं शकला नाहीं. तिन्हीं बाजूंनीं राष्ट्रकूटसेनेनें गौडीय आणि मागधीय वीरांना वेढून टाकले; तरी पण शेवटीं गोविंदाला हळूहळू माघार घ्यावी लागली.

दोन सहस्त्र गौडीय वीरांपैकीं जेव्हां जवळ जवळ चारशें सैनिक शिल्लक राहिले, तेव्हां गिरीमार्गावरील शत्रुसैन्य निघून गेले होते. या वेळीं रात्रीचा तिसरा प्रहर उलटला होता. दुर्गांतील अग्नि हळूहळू शांत होऊं लागला होता. अशा वेळीं वृद्ध महानायक भीष्मदेव पर्वतमार्गाच्या पश्चिम दिशेला एकाएकीं मटकन खालीं बसला. गुणवंत त्यांच्या मागोमाग होताच, त्यानें वृद्धाचें मस्तक हातानें गच्च धरलें. वृद्धाला भयंकर अशा तेरा जखमा झाल्यामुळें त्यांतून रक्तस्त्राव होत होता. तरीहि तो वीरचूडामणी म्हणाला, " गुणवंत, चक्रध्वज घेऊन उभे रहा. तो जर सैनिकांच्या दृष्टीस पडणार नाहीं, तर त्यांची हिंमत खचेल. उठा, माझी जागा आतां तुम्ही घ्या.

एकहि सैनिक शिल्लक असेपर्यंत युध्द थांबवूं नका."

इतकें बोलून वृद्ध उठण्याचा प्रयत्न करूं लागला; परंतु ग्लानीमुळें त्याच्यानें तसें करवेना, शिल्लक राहिलेले सैनिक व सरदार त्या भीष्माचार्याभोंवतीं गोळा झाले. या संधीचा फायदा घेऊन राष्ट्रकूट सेनेनें परत आक्रमण केलें. थोडयाच वेळांत भीष्मदेवानें इहलोकाचा त्याग करून स्वर्गी प्रयाण केलें. गुणवंत चक्रध्वज हातीं घेऊन शत्रूला तोंड द्यावयास तयार झाला. चारशें श्रांत गौडीय वीरांवर ताज्या दमाच्या राष्ट्रकूटसेनेनें चाल केली. पण पुन त्यांना मागेंच हटावें लागलें.

उष:काल झाला, तेव्हां रक्तानें न्हालेले आणि युद्धाच्या परिश्रमानें गलित झालेले बावीस गौडीय आणि मागधीय वीर चक्रध्वजापाशीं येऊन उभे राहिले. दुर्गात प्रज्वलित झालेला अग्नि आतां शांत झाला होता; तरी पण अर्धदग्ध स्थानांतून अद्यापिहि धूर निघत होता. उषेच्या प्रकाशांत विंध्यपर्वताचीं निळसर शिखरें श्वेतवर्ण दिसत होतीं. पांच सहस्त्र सेनेपैकीं चक्रध्वजाभोंवतीं उभे असलेले हे बावीस वीरच काय ते शिल्लक उरलें होते. गुणवंतालाहि बऱ्याच जखमा झाल्या होत्या. दुर्बलतेमुळें त्याच्या हातांतील चक्रध्वजहि आतां गळून पडला. तेव्हां गौडीयवीरांनीं तो चक्रध्वज एका हातांत व तरवारी दुसऱ्या हातांत घेऊन धारातीर्थी देह ठेवण्याचा कृतनिश्चय केला. इतक्यांत मंडलादुर्गाच्या सिंहद्वारापाशीं एक घोडेस्वार येऊन ठेपला.

त्याच्या मागोमाग जयध्वनि करीत एक मोठें सैन्य येत होतें. चौदा गौडीय वीर आतां चक्रध्वजाचें रक्षण करावयास सज्ज झाले. तो घोडेस्वार म्हणाला, " उद्धवघोष, तो चक्रध्वज दिसत आहे. चला आपण तेथेंच जाऊं या."

धर्मपाळदेव आणि उद्धवघोष पुढें चालूं लागले आणि गौडीयसेना जयघोष करीत त्यांच्या मागून निघाली. सम्राटांना पाहतांच चौदाहि गौडीयवीरांनीं त्यांना लष्करी थाटाची सलामी दिली. झोकांड्या खात गुणवंत गौडेश्वरापाशीं आला आणि त्यानें चक्रध्वज त्यांच्या हातीं दिला.

शेवटीं गौडीयसाम्राज्याच्या द्वाराचें रक्षण झालें खरें, पण पांच सहस्त्र वीरांपैकीं चौदाच काय तें जिवंत राहिले होते.

● ●

—— ४८

अश्रुपूर्ण नेत्रांनीं चक्रध्वज हातांत घेऊन गौडेश्वर घोड्यावरून खालीं उतरले आणि त्यांनीं भीष्मदेवाच्या मृत देहास वंदन केलें. धर्मपाळदेव चक्रध्वज घेऊन वृद्ध महानायकाच्या शवाजवळ येऊन बसले. मागें असलेली पांच हजार गौडीयसेना पर्वत ओलांडून तेथें येऊन पोहोंचली. उद्धवघोष सम्राटाजवळ उभा होता. तो म्हणाला, " महाराज, शत्रूचें सैन्य इतक्यांतच आपणांवर चढाई करील, तरी विलंब न करतां महानायकाच्या मृतदेहास अग्निसंस्कार करावयाची आज्ञा असावी."

एकाएकीं गौडेश्वरांच्या मुखावर फेरफार दिसूं लागला. ते म्हणाले, " उद्धवघोष, भीष्मदेवाच्या देहास मी अग्निसंस्कार कारणार नाहीं. माझ्या नंतर जो कोणी गौडाच्या सिंहासनावर अधीष्ठित होईल, तो हे कार्य करील. उद्धव, माझ्यासाठीं पांच हजार गौडीयवीरांनीं जीवन समर्पण करून या स्थानाचें रक्षण केलेलें आहे. त्या पांच हजारांतून मात्र चौदाच काय ते जिवंत राहिले आहेत. मी आतां परत गौडाला जाईन असें का तुम्हांला वाटतें ? आज या मंडलांत गौड आणि राष्ट्रकूट यांच्यांत अभूतपूर्व युद्ध होईल–आजचा दिवस तो युद्धाचा शेवटचाच दिवस हें पक्कें लक्ष्यांत असूं द्या ! "

सम्राटांचें हें भाषण ऐकतांच वृद्धाच्या दोन्ही नेत्रांत नवीन तेज झळकलें. तो म्हणाला, " महाराज, फार उत्तम गोष्ट आहे. मग विलंब कां ? आतांच युद्धाचा काय तो निकाल लागूं द्या ! "

दोघेजण भीष्मदेवाचा मृतदेहाचा त्याग करून पायथ्याशीं येऊन उभे राहिलें. पण धर्मपाळ विस्मयानें पाहतात, तों तेथून दूर वृक्षांच्या झाडींत तळ देऊन असलेल्या राष्ट्रकूटच्या सैन्यांत कसलीच हालचाल दिसेना. छावणींत अनदीं सामसूम होती. त्या छावणींतून दोघे पुरुष उघड्या मस्तकानें व उघड्या पायाने त्यांच्याकडे येऊं लागले. त्यांनीं जवळ आल्यावर रुमालाने आपले डोळे झांकून घेतले. ते दूत आहेत असें समजून गौडीय सैनि-

कांनीं त्यांना धर्मपाळदेवापाशीं आणून उभे केलें. गौडेश्वरांनीं त्यांना डोळयांवरील रुमाल दूर करण्यास सांगिलें. तेव्हां ते म्हणाले, " महाराज, आम्ही महाराष्ट्रीय ब्राह्मण असून दक्षिणापथचे अधीश्वर गोविंद यांच्या आज्ञेनें गौडीय सेनापतीजवळ आलों आहोंत. चला, आम्हांला गौडीयसेनापतीकडे घेऊन चला."

तें ऐकतांच एक सैनिक म्हणाला, " महाराजाधिराज गौडेश्वर स्वतः तुमच्यापुढें उभे आहेत. "

" महाराजाधिराज गौडेश्वरांचा विजय असो ! "

गौडेश्वरांनीं विचारलें, " आपण कोणत्या हेतूनें येथें आला आहांत ?"

" गेल्या रात्रीं ज्यांनीं मंडलाचें रक्षण केलें, त्याची भेट घ्यावयास आम्ही आलों आहोंत."

" कां बरें ? "

" दक्षिणापथचें अधीश्वर गोविंद त्यांना भेटूं इच्छितात."

" मगधाचे अधीश्वर महानायक भीष्मदेवांनीं काल मंडलादुर्गाचें आणि गिरीमार्गांचें रक्षण केलें होतें. परंतु गोविंदांना आतां तें भेटूं शकणार नाहींत; कारण ते फार लांबच्या यात्रेस निघून गेले आहेत."

इतकें म्हणून धर्मपाळदेवांनीं दोघां ब्राह्मणांस भीष्मदेवाच्या शवापाशीं नेलें. त्यावेळीं सैनिक युद्धक्षेत्रांतून शेंकडों भाले व बरच्या एक करून भीष्मदेवाच्या चितेची तयारी करीत होते. दोघेहि ब्राह्मण तें शव पहातांच अत्यंत लज्जायमान झाले आणि गौडेश्वरांचा निरोप घेऊन आपल्या छावणीकडे परत निघून गेले.

सुमारें दोन घटका उलटल्यावर एका सैनिकानें येऊन गौडेश्वरांना कळविलें कीं, " पुनः ते ब्राह्मण याच बाजूला येत आहेत." धर्मपाळदेवानीं त्यांना घेऊन येण्यास सांगितलें.

कांहीं वेळानंतर ते येऊन पोहोंचतांच धर्मपाळदेव म्हणाले, " काय समाचार आहे ?"

सम्राटाना आशीर्वाद देऊन ते म्हणाले, " गौडेश्वरांचा विजय असो!

महाराजाधिराज गोविंद स्वत: गौडेश्वरांना भेटावयास येत आहेत. आज्ञा झाल्यास ते नि:शस्त्र गौडेश्वरांची भेट घेतील."

धर्मपाळदेवांनीं आश्चर्यचकित होऊन विचारलें, " कां बरें त्यांनीं स्वत:च येण्याची तसदी घेतली. "

" महाराज, तें आम्हांला ठाऊक नाहीं."

" फार उत्तम, त्यांना येथें बोलावून आणा. "

हें ऐकून दोघेहि ब्राह्मण तेथून निघून गेलें. लौकरच एका सैनिकानें येऊन सम्राटांनां कळविलें कीं, " राष्ट्रकूटच्या छावणींतून दोघे पुरुष याच बाजूला येत आहेत. "

या वेळीं धर्मपाळदेव एका वृक्षाखालीं गवताळ जमिनींवर बसले होतें; सैनिकाच्या तोंडचे हे शब्द ऐकून ते उठून उभे राहिले. गौडेश्वरांनीं पाहिलें तों श्वेतवस्त्र परिधान केलेला, उंचेला आणि गौरवर्ण असा एक पुरुष छावणीकडे येत आहे. धर्मपाळदेवांनीं गोविंदाला केव्हांही पाहिलें नव्हतें, तथापि ते खुद्द राष्ट्रकूटराज आहेत हें त्यांनीं ताडलें. गौडेश्वर त्यांना यथोचित सन्मान देण्यासाठीं द्वारापाशीं येऊन उभे राहिले; आणि जेव्हां राष्ट्रकूटराज गोविंद जवळ येऊन पोहोंचले, तेव्हां त्यांना तरवारीनें अभिवादन करून ती तरवार त्यांनीं दूर भिरकावून दिली. राष्ट्रकूटराजांनीं विचारलें, " आपणच का गौडेश्वर ? "

प्रत्युत्तर मिळालें, " होय, मीच धर्मपाळदेव. "

लगेच त्या उंचेल्या पुरुषानें धर्मपाळांना दृढालिंगन दिलें. धर्मपाळदेव विस्मयचकित होऊन त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागले. बाहुपाशांतून मुक्त करून तो पुरुष म्हणाला, " गौडेश्वर, महापुरुषाच्या भेटीस्तव, त्यांची पदधूलि मस्तकावर धारण करण्यासाठीं मी आलों आहे."

गौडेश्वर धूळीनें मलिन झालेल्या ललाटावरून धर्मबिंदू पुशीत म्हणाले, " महाराज, आपण काय म्हणतां ते माझ्या लक्षांत येत नाहीं."

" गौडेश्वर, कालचें युद्ध पाहून मीं मुग्ध बनलों आहे. अशा रण-धुरंधर सेनापतीच्या दर्शनाची मी सकाळींच इच्छा प्रदर्शित केली होती, पण ती दिव्य विभूति आतां या जगांत नाहीं हें ऐकून मनास भारी उद्वेग

वाटला. धर्मपाळदेव, मी आतां वयाने प्रौढ आहे, किशोरावस्थेपासून युद्ध-व्यवसाय करीत आहे. माझ्या पित्याबरोबर मी उत्तर आणि दक्षिणापथांत अनेक युद्धांत भाग घेतलेला आहे. परंतु इतके असीम वीरत्व, असाधारण समरकौशल्य आणि अद्वितीय भीमपराक्रम मीं कोठेंही पाहिलेला नाहीं. चला, मला भीष्मदेवाच्या शवाकडे घेऊन चला. ''

दोघेजण हळू हळू महानायकाच्या मृत देहाजवळ येऊन उभे राहिले, राष्ट्रकूटराजानें मृत देहाला प्रणाम करून वृद्ध महानायकाची पदधूलि आपल्या मस्तकावर टाकली. भीष्मदेवाच्या शवाजवळ एक घायाळ झालेला सैनिक बसला होता; त्यानें जयध्वनि केला. त्याबरोबर जवळ उभ्या असलेल्या पांच सहस्त्र गौडीय वीरांनीं त्याचेंच अनुकरण करून सर्व वातावरण अगदीं दुमदुमून सोडलें.

गोविंद उठून उभा राहिला आणि गौडेश्वरांचा हात धरून म्हणाला, '' गौडेश्वर, माझा अपराध क्षमा करा. माझी शोणित-पिपासा आतां शांत झालेली आहे. दग्ध आर्यावर्त आतां शांत झालें आहे. ''

इतक्यांत त्या घायाळ सैनिकानें राष्ट्रकूटराजाला कडकडून मिठी मारून म्हटलें, '' राष्ट्रकूटराजेश्वर, आपण खरे वीर पुरुष आहांत,वीरपूजा कशी करावी हें आपणांला उत्तम रीतीनें अवगत आहे. तुमचे सदा मंगल होवो असा तुम्हांला आशीर्वाद आहे.''

तो घायाळ सैनिक दुसरा कोणीहि नसून गुणवंत होता. मध्येंच धर्मपाळदेवांनीं त्याच्या हाताला धरून म्हटले, '' गुणवंत, शांत व्हा ! आपण काय म्हणतां तें माझ्या लक्षांत आलें नाहीं. आपण छावणींत परत जा आणि युद्धाच्या तयारीस लागा. ''

मस्तक नम्र करून गोविंद म्हणाला, गौडेश्वर, युध्दसमाप्ति कधींच झालेली आहे. आतां पुनश्च युध्दाला सुरवात व्हावयाची नाहीं.

उन्मत्ताप्रमाणें चीत्कार करून गौडेश्वर म्हणाला, '' नाहीं महाराज, तसें होणार नाहीं. युध्द केल्याशिवाय आतां दुसरा उपाय नाहीं. आतां मी माझें हे मुख गौडनगरांत कोणालाहीं दाखविणार नाहीं. या गिरिगव्हरांत पांच सहस्त्र गौडीय राजभक्त सैनिकांनीं, स्वामिनिष्ठ वीरांनीं माझ्याखातर

आत्मसमर्पण केलें आहे, ते मी विसरूं शकणार नाहीं. राष्ट्रकूटराज, छाव–णींत मागें फिरा आणि युद्धाच्या तयारीस लागा. मंडला हेच धर्मपाळदेवाचें समाधिक्षेत्र आहे. आज संध्याकाळपूर्वी दहाहजार गौडीय सैनिकांच्या चितेची शय्या रचावयाची आहे. आतां वेळ नाहीं. जा, युध्दाला तयार व्हा ! उद्यां वाक्पाळ गौडेश्वर झाल्यावर त्याच्या बरोबर राष्ट्रकूटराजनंदिनीचें लग्न करून आपली इच्छा पूर्ण करून घ्या. "

तें ऐकून कंपित स्वरांत राष्ट्रकूटराज गोविंद म्हणाला, " धर्मपाळ, तुम्ही मला पुत्राच्या जागीं आहांत; आपली शपथ घेऊन मी सांगतों की, माझ्या हातून आतां अमंगल होणार नाहीं. माझ्या अपराधाची क्षमा करा. आतां युध्दसमाप्ति झाली असून मी स्वतःचा पराभव कबूल करतों. भीष्म-देवानें या मंडलांच्या रणक्षेत्रांत काल रात्रौ मला अनेकदां पराभूत केले आहे. "

गौडेश्वराचें पाय लटलटां कांपूं लागले. ते आतां मूर्च्छित पडतात कीं काय अशी भीती वाटून गोविंदानें त्यांस पोटाशीं धरून म्हटले, " वत्स ! माझ्यापायीं तुम्ही अनेक कष्ट केलें आहेत; गोविंद जोंपर्यंत जिवंत असेल, तोंपर्यंत तुमच्या एका केंसालाहि धक्का लागावयाचा नाहीं. "

धर्मपाळदेवांना प्रबल मूर्च्छा आली.

राष्ट्रकूट, मगध आणि गौडच्या सैनिकांनीं एक विशाल चिता तयार केली. तिच्यावर भीष्मदेवाचा मृत देह ठेवून अग्निसंकार करण्यांत आला. एक हजार वर्षापूर्वी विंध्यपर्वताच्या पायथ्याशीं ज्या ठिकाणीं भीष्मदेवाला अग्निसंस्कार करण्यांत आला, तेथें एक स्मृतिस्तंभ उभारला गेला. त्याचा अवशेष अजूनहि तेथें दृष्टीस पडतो. जोंपर्यंत भरत खंडांत सद्धर्म होता, तोंपर्यंत सद्धर्मी भीष्मदेवाच्या देहास ज्या स्थळीं अग्नि-संस्कार करण्यात आला, त्या स्थळीं उभारलेल्या विशाल स्तंभाची पूजा करीत असत.

त्या दिवशीं संध्याकाळीं धूळीनें मलिन झालेला एक घोडेस्वार गिरि-गव्हराच्या मुखापाशीं येऊन पोहोंचला. त्यानें घोडयावरून खालीं उतरून गौडेश्वराजवळ येऊन म्हटले,

" महाराज ! मी आनंदानंद. प्रभु विश्वेश्वरानंदानें मला तुमच्याकडे पाठविलेले आहे. राज्याच्या हितासाठीं महादेवी कल्याणीदेवीनें लोकनाथाच्या पायांजवळ देहत्याग केला आहे. युद्धाचें आतां प्रयोजन नाहीं. आपण आतां गौडांत मागें फिरावें, "

हा समाचार ऐकून उद्धवघोष एखाद्या बालकाप्रमाणें रडूं लागला. गौडेश्वरांचे मस्तकें भ्रमूं लागले. त्याच रात्री राष्ट्रकूटराज गोविंद, धर्मपाळदेव, उद्धवघोष, आनंदानंद आणि राष्ट्रकूटसेनापति कक्कराज वगैरे पन्नास सरदार आणि इतर अंगरक्षक गौडाकडे जावयास निघाले.

●●

## ४९

प्रभातकाळीं गौड नगराच्या एका भागांत गंगाकाठीं एक दासी पूजासाहित्य घेऊन पुरोहिताची वाट पहात होती. राजमार्गांत अजूनहि माणसांची ये-जा दृष्टीस पडत नव्हती. दासी बसल्या बसल्या नगराच्या मार्गांकडे पहात होती.

याप्रमाणें एक घटका उलटून गेल्यावर एक मनूष्य दुरून येतांना तिच्या दृष्टीस पडला. त्यासरशीं दासी उत्सुकतेनें उठून उभी राहिली. कांहीं मार्ग चालून आल्यावर सरळ राजमार्ग सोडून तो मंदिराजवळ आला तेव्हां दासीनें विचारले,

" महाराज, आज तुम्ही येथें कोठून ?"

तो आगंतुक राजपुरोहित शिवशंकरशर्मा होता. तो म्हणाला,

" मालती ! आज पुष्कळ दिवसांनीं मी वृद्ध शिवाची पूजा करावयासाठीं आलों आहे. शंकरापाशीं मी कधींहि कांहीं मागितलें नाहीं. आज एक प्रार्थना करावयासाठीं मी आलों आहें. "

" कोणती प्रार्थना आहे ?"

" प्रार्थना दुसरी कसली असणार ? आज महाराज यावयाचे आहेत असे मीं ऐकलें आहे. तेव्हा महादेवाला प्रार्थना करावयाची आहे कीं, कृपा करून महाराजांची महादेवीची शेवटची भेट होऊं दे. "

" काय, महादेवी अद्यापि जिवंत आहेत ? "

" होय. "

" तर मग मी जाते. आपण शिवाचे ध्यान करा. पूजासाहित्य मी तयार करून ठेवले आहेच. पुजारी आल्यावर त्यास पूजा करावयास सांगा."

" मालती, आज माझें मन भारी चंचल झाले आहे, तेव्हां मला कांहीं सुचावायचे नाहीं. पण तूं आतां जाणार कुठें ?"

" महादेवीचें एकवार शेवटचे दर्शन घेण्यासाठीं. अशा सतीच्या दर्शनानें पुण्यच लाभेल. महाराज्ञीची पदधूलि मस्तकावर धारण केल्यास मला मुक्तीचा लाभ होईल. "

उत्तराची वाट न बघतां दासी तेथून गेली. शिवशंकरशर्मा स्नान आटोपून मंदिराच्या दारावर लवंडलें. अर्ध्या घटकेनंतर दुरून त्यांना घोड्याच्या टापांचा ध्वनि ऐकूं आला. कांहीं क्षणांतच एक घोडेस्वार येऊन उभा राहिला आणि मोठ्यानें विचारूं लागला, " मंदिरांत कोण आहे ?"

" शिवशंकरशर्मा त्याचा कंठस्वर ऐकून टुणकन् उडी मारून उठला व म्हणाला, " कोण आनंदानंद ? महाराज धर्मपाळदेव गौडाला येत आहेत कां ?"

घोडेस्वारानें सांगितलें. " होय, तुम्ही कोण ? "

" मी शिवशंकरशर्मा, जय विश्वनाथ !"

" काय समाचार ? "

" लौकर लोकनाथाच्या मंदिरांत जा. महादेवीचें प्राण अद्याप घुटमळत आहेत. "

कांहींएक न बोलतां घोडेस्वारानें तेथून प्रयाण केलें. लगेच राजमार्गावर कित्येक घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकूं आला. तेव्हां शिवशंकरशर्मा शिवलिंगाला उद्देशून म्हणाला, " वृद्धेश्वर देव, माझा अपराध मनावर घेऊं नका. मी पण महादेवींच्या दर्शनास जातों. आपल्या पूजेचें आज आपणच पाहून घ्या. "

इतकें बोलून शिवशंकरशर्मा मंदिराच्या द्वारांत पूजासाहित्य ठेवून उतावळीनें तेथून निघून गेला.

त्या दिवशीं प्रभाती गौडाच्या दरवाजापाशीं पहारा करीत असलेल्या द्वाररक्षकांना महाराजाधिराज धर्मपाळदेव फक्त चौघांसह आलेले पाहून भारी विस्मय वाटला. त्यांनीं राष्ट्रकूटराज गोविंदांना कधींहि पाहिलें नव्हतें. आनंदानंदाकडून त्यांच्याविषयीं ऐकतांच त्यांना अधिकच नवल वाटूं लागलें. पहातां पहातां हा समाचार गौडांत चोंहीकडे पसरला. राष्ट्रकूटराज, सर्व दक्षिणापथाचे अधीश्वर, ध्रुवपुत्र गोविंद एकटेच गौडेश्वरांबरोबर गौडनगरांत आले होतें.

लोकनाथाच्या मंदिरासन्मुख आज असंख्य माणसें जमा झालीं होतीं. महामंत्री गर्गदेव मंदिराच्या आंतील मंडपांत गवताच्या आसनावर बसले होतें. त्यांच्या पुढयांत तुपाची समई होती. दूर स्तंभांच्या मागें परिचारिका उभ्या होत्या. मंदिराच्या द्वारांत बसून विश्वेश्वरानंद हळूहळू प्रज्ञापारमिताचें पठण करीत होते. मंदिराच्या मध्यभागीं वृद्ध महादेवी देद्‌देवी कल्याणीदेवीचें मस्तक मांडीवर घेऊन बसली होती. ब्रह्मशिलेच्या मध्यभागीं बनविलेल्या लोकनाथाच्या मूर्तीच्या पायांपाशीं कल्याणीदेवी गवतावर पडली होती. तिच्याजवळ मल्लिकादेवी आणि विमलादेवी बसल्या होत्या. मंदिराच्या आंत तुपाचा दिवा जळत होता. सर्वांनीं मौन धारण केले होतें. मात्र देद्‌देवी मधून मधून पदरानें आपले डोळें पुशीत होती. आज कित्येक दिवसांपासून कल्याणी झिजत चालली होती. शुद्ध कांचनाप्रमाणें असलेला तिचा देह पीतवर्ण झाला होता. कल्याणीदेवींनें क्षीण स्वरांत विचारलें, “ माताजी ! कोण आलें आहे ? ”

देद्‌देवी डोळे पुशीत पुशीत म्हणाली, “ बाळे. अद्याप तर कुणीहि आलें नाहीं. ”

इतक्यांत गोविंद, धर्मपाळ, उद्धवघोष, विद्याधर उर्फ गुणवंत आणि आनंदानंद यांनीं मंदिराच्या आंगणांत प्रवेश केला. पावलांचा आवाज ऐकतांच दचकून मंत्री गर्गदेव आसनावरून उठून उभे राहिले. दुरून या सर्व मंडळींस येतांना पाहून विश्वेश्वरानंद पठण करावयाचें सोडून उठून उभे राहून म्हणाले, “ धर्मपाळदेव, आलांत कां तुम्हीं ? ”

हें ऐकतांच मल्लिकादेवी आणि विमलादेवी मंदिराच्या एका कोंप-

त्यांत लाजेनें दडून उभ्या राहिल्या. धर्मपाळदेव, गोविंद आणि विश्वेश्वरानंद तिघेहि मंदिराच्या आंत आले. देद्‌देवीच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. रुद्ध कंठानें ती राजमाता म्हणाली, " वत्स ! कल्याणीदेवी आपणाला सोडून चालली आहे."

व्याकुलतेनें धर्मपाळदेव म्हणाले, " कल्याणी, काय झालें ग ? "

पतीचा कंठस्वर ऐकून कल्याणीदेवीचे दोन्ही नेत्र एकाएकीं उज्वल झाले. तिनें गौडेश्वरांना आपल्याजवळ येऊन बसण्याविषयीं खूण केली. धर्मपाळ कल्याणीदेवीच्या जवळच जमिनीवर बसले. तें पाहून राष्ट्रकूटराज गोविंदहि त्याच्याजवळ येऊन बसला. थोडा वेळ स्तब्ध राहिल्यावर विश्वेश्वरानंद म्हणाले, " धर्मपाळ, चक्राचें परिवर्तन झालेलें आहे. देशांत उडालेल्या हाहा:काराने कल्याणीच्या हृदयास घरें पडलेलीं आहेत. आपल्यासाठींच गौडराज्याचें, गौडवासीयांचे, पालवंशाचे आणि तुमचें अनिष्ट होत आहे अशी तिची समजूत झाली आहे. त्यामुळें कल्याणीदेवीचें हृदय विद्ध होऊन ती आतां मरणाच्या दारीं बसली आहे. "

धर्मपाळदेव कल्याणीला अश्वासन देत म्हणाले, " कल्याणी ! आतां दु:खाचे दिवस संपले आहेत, युद्ध समाप्त झालें आहे, हें पहा राष्ट्रकूटराज गोविंद एकटेच मजबरोबर गौडाला आले आहेत, "

" आपले शेवटचें दर्शन घडेपर्यंत माझा जीव घुटमळत होता. आतां आपण आलांत, तेव्हां मी जातें. " अत्यंत क्षीण स्वरांत मृत्युशय्येवर पडलेली कल्याणी म्हणाली.

धर्मपाळदेवानीं कल्याणीचे दोन्ही हात धरून रुद्धकंठानें विचारले, " कोठें जातेस, कल्याणी ?"

" आतां माझी घटका भरत आल्यामुळें तो मला नवीन जगांत आणि नवीन राज्यांत बोलावीत आहे. "

" हे तुला कोणी सांगितले ? तो कोण ?"

मागून विश्वेश्वरानंद म्हणाले, " धर्मपाळ, दक्षिणापथांतून परत येतांना रस्त्यांत एका आंधळया मुलाची भेट झाली होती; आणि त्याला आम्ही येतांना गौडास आणले होते. तो कल्याणीला सांगून गेला कीं,

तिच्या मुक्तीचा दिवस नजीक आला आहे. अनेक जन्म धारण करून तिनें, निर्वाणाचा मार्ग स्वत:साठीं खुला करून घेतला आहे.

या वेळीं तिची सर्व बंधनें मुक्त होणार आहेत. तिला वाटलें कीं स्वत:च्या आत्मत्यागानें गौडेश्वर, गौडराज्य आणि गौडवासी यांचे अनिष्ट ग्रह शांत होतील, धर्मपाळ, त्या अंध मुलाच्या सांगण्यावरून कल्याणी-देवीनें लोकनाथाच्या पायांपाशीं आत्मबलिदान केलें आहे. "

इतकें बोलत असतां वृद्ध संन्याशाचा कंठ भरून आला; आणि त्याच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या.

अत्यंत क्षीण स्वरानें कल्याणीदेवी म्हणाली,–

" राजन्, माझ्यासाठीं जी माणसं अनाथ झालेली आहेत, ज्या स्त्रिया पती व पुत्रविहीन झालेल्या आहेत, त्यांना आपण आश्रय द्या ! "

गाभाऱ्यांतील तुपाचा दिवा विझण्याच्या पंथास लागला. अगदीं त्याच वेळीं गौडीय पट्टमहादेवी कल्याणीचा जीवनदीप निर्वाण मार्गास लागण्यास सुरवात झाली. तिचे मुख फिक्के झालेले पाहून धर्मपाळदेव मोठ्यानें म्हणाले.

" अरे, कोणी तरी जा आणि लवकर राजवैद्यांना बोलावून आण ! "

पण धर्मपाळदेवांच्या खांद्यावर हात ठेऊन विश्वेश्वरानंद म्हणाले, " वत्स ! वैद्याच्यानें बरा होण्याजोगा हा रोग नाहीं. तुम्ही मंडलाला गेल्यापासून कल्याणीनें अन्नपाणी वर्ज केलें आहे. "

ते ऐकून उन्मत्तासारखा चीत्कार करून गौडेश्वर म्हणाले, " देवी ! कल्याणी ! "

हळूहळू मिटलेलें डोळे पुन: उघडले गेलें. क्षीण स्वरांत उत्तर मिळाले, " काय तुम्ही मला हांक मारलीत ? मी कुठंशी गेल्यें होते ? "

" कल्याणी ! कोणत्या अपराधास्तव तूं माझा त्याग करून जात आहेस ? सिंहासन, राज्य, देश यापैकीं मला कांहींहि नको. कल्याणी, मला तूंच एक हवीस. नारायणघोषानें ज्या दिवशीं गोकर्णदुर्गावर चढाई केली, त्या दिवसापासूनच तूं माझी व मी तुझा झालों. मी तुला जाऊं देणार नाहीं. " अश्रूपूर्ण नेत्रांनीं धर्मपाळदेव म्हणाले.

" माझे अनंत अपराध मनांत आणूं नका. मी आपणाला कष्ट देण्यासाठीं आल्ये होतें. पण आता मी जातें. आपण सुखानें राष्ट्रकूटराजकन्येबरोबर----जरूर----लग्न----करा."

हा वेळपर्यंत राष्ट्रकूटराज गोविंद पाषाणमूर्तीप्रमाणें अगदीं निश्चल बसला होता. त्याच्या नेत्रांतूनहि टपटपा अश्रू गळूं लागले. व्याकुलचित्तानें तो म्हणाला,

" बाळे, सर्व अपराध माझा आहे. त्याच्यासाठीं तूं कां म्हणून प्रायश्चित्त घेत आहेस ? नागभट्टाच्या पराजयानंतर बलहीन गौडांत रक्ताची जी नदी वाहूं लागली, त्याबद्दल सर्वस्वी हाच नराधम जबाबदार आहे. मला क्षमा कर. तूं निष्कारण आपल्या जीवाचा नाश करून घेतलास. तुझें राज्य, तुझें सिंहासन आणि तुझें प्रिय पतिदेव यांना सोडून आयुष्याच्या ऐनभरांत तूं कुठें चाललीस बाळ ? "

" पिताजी ! कर्मफळाप्रमाणें साऱ्या गोष्टी घडत असतात, मला---क्षमा करा--"

एकाएकीं कल्याणीदेवीचे मुख पुनः फिक्के दिसूं लागले. तरी पण अत्यंत कष्टानें खोल आवाजांत ती म्हणाली-

" स्वामिन--जरूर---लग्न--करा बरं !"

कल्याणीदेवीला बाहुपाशांत घट्ट कवटाळून धर्मपाळ एखाद्या बालकाप्रमाणें अश्रुपात करूं लागले.

इतक्यांत आर्तनाद करीत वृद्ध उद्धवघोष मंदिरांत प्रवेश करून कल्याणीदेवीच्या पायांवर पडला आणि स्फुंदत स्फुंदत म्हणाला.

" बाळे, तूं जावेस आणि मी तें उघडया डोळयांनीं निमुटपणें, पहावें एवढ्यासाठीं कां रघुसिंहांनीं तुला माझ्या स्वाधीन केलें होतें ? कल्याणी गौड साम्राज्याची जरी तूं पट्टमहादेवी असलीस, तरी माझी मूळचीच लहानगी कल्याणी आहेस. बाळे, मलाही तुजबरोबर घेऊन चल. गोकर्णांचे स्मशान पहावयास कां आतां तूं मला मागें जिवंत ठेऊन जात आहेस ! "

खोल जात चाललेले कल्याणीचे नेत्र हळूहळू पुनः उघडले. अगदीं क्षीण स्वरांत कल्याणी म्हणाली, " उद्धव, आनंदानें---सुखानें--तुम्ही---रहा---माझ्यामागें बिलकूल---शोक---करूं---नका. "

एखाद्या पाषाण प्रतिमेप्रमाणें गौडेश्वर बसलेले होते. ते एकाएकी चीत्कार करून म्हणाले, " कल्याणी, मी तुला जाऊं देणार नाहीं. मग तूं जाशील कशी ? मला सोडून तुला जातां येणार नाहीं."

स्वामी विश्वेश्वरानंद म्हणाले, " उद्धव, रघुसिंहाची कन्या, पती, राज्य, स्वदेशबांधव आणि श्वशुरकुलाखातर आत्मोत्सर्ग करीत आहे. उठा, तिचें अमंगल चिंतू नका."

कल्याणीच्या क्षीण मुखमंडलावर विमल हास्याची रेषा उमटली. पण ती क्षणभरच ! विश्वेश्वरानंद कंपित स्वरांत म्हणाले, " धर्मपाळ ! कुणाला धरून राहिला आहांत आतां ? कल्याणी तर केव्हांच गेली आहे !"

● ●

## ५०

कल्याणीच्या मृत्युनंतर गौडीय सेनेनें चक्रायुधाला कान्यकुब्जाच्या सिंहासनावर पुन: बसविलें. धर्मपाळदेवानीं राष्ट्रकूटराज दुहिता वण्णादेवी हिचें पाणिग्रहण केलें. धर्मपाळदेव आणि युवराज देवपाळ यांच्या कारकीर्दींत गुर्जर सेनेनें पुन: कधीं यमुनेच्या पैलतीरीं पाऊल ठेविले नाहीं. नागभट्ट आणि त्याचा पुत्र रामभद्र, त्याचप्रमाणें गोविंद आणि त्याचा पुत्र अमोघवर्ष यांनीं पुन: कधीं आपल्या राज्याची सीमा वाढविण्याचा प्रयत्न केला नाहीं. दीर्घ काळपर्यंत गौडसाम्राज्य भोगून धर्मपाळदेव दिवंगत झाले. त्यांच्या पश्चात् वण्णादेवीच्या पोटी जन्मास आलेला त्यांचा मुलगा देवपाळदेव गौडीय सम्राटपदावर आला. वृद्ध महानायक भीष्मदेव आणि राजकुमारी कल्याणीदेवी यांच्या अपूर्व आत्मत्यागाच्या सुदृढ पायावर गौड साम्राज्याची इमारत रचिली गेली. जोंपर्यंत गौडीय साम्राज्य अस्तित्वांत होतें आणि जोंपर्यंत गौडराष्ट्रांत बुद्धधर्माचे पालन होत होते, तोंपर्यंत गौडवासी कल्याणीदेवी आणि भीष्मदेव यांच्या अलौकिक कीर्ति यशोगान गात होते. ज्या स्थळीं भीष्मदेवाच्या मृत देहाचा अग्निसंस्कार करण्यांत आला, त्या जागीं एका समाधि–मंदिराची स्थापना करण्यांत आली. अजूनही ते जीर्णावस्थेंत लोकांच्या दृष्टीस पडते. कल्याणीचें समाधि मंदिर त्रिशरण–बुद्धभट्टारकाच्या नांवानें अद्यापिही ओळखलें जातें.

●

# सुरस साक्षर माला

( तिरंगी आकर्षक कव्हर )

★ प्रत्येकी ५० नये पैसे ★

★

| | |
|---|---|
| रघुवंश | मुद्राराक्षस |
| हर्षचरित्र | कादंबरी |
| नागानन्द | मेघदूत |
| असे होते बापूजी | वर्धमान महावीर |
| लोकमान्य टिळक | सम्राट करकण्डू |
| शाकुंतल | नलोदय |
| ज्ञानाचा शोध | अनोळखी जगांत |
| विश्वचि माझें घर | पृथ्वीची कहाणी |
| जंगलांतील सफर | प्राण्यांच्या जगांत |
| हवेची कहाणी | शरीराच्या शोधांत |
| अंतराळांतील चमत्कार | निसर्गाशीं झुंज |
| प्राण्याची जन्मकहाणी | इतिहासाचा शोध |
| कीटकांच्या राज्यांत | मानवाची कथा |
| पक्षीच पक्षी | वनस्पतीच्या जगांत |
| पक्षांच्या राज्यांत | पक्षांच्या सहवासांत |
| फुलेंच फुलें | माकडाचा माणूस |
| पहिला माणूस | कलावंत माणूस |

★

— सुरस ग्रंथमाला, सोलापूर. —

